॥ श्रीविठ्ठलप्रसन्न ॥

# मुमुक्षूचें सिंहावलोकन

म्हणजेच

## मुमुक्षूंतील निवडक निबंध



### भाग पहिला.




संपादक व प्रकाशक

लक्ष्मण रामचंद्र पांगारकर बी. ए.

मुमुक्षु कचेरी, पुणें शहर.





किंमत रु. १०८

# सिंहावलोकनाची प्रस्तावना.



येथ मी जें जें बोले । तें प्रभु ! तुमचेंचि शिकविलें ।
म्हणोनि अवधारिजो आपुलें । आपण देवा ! ॥ १८ ॥
हें सारस्वताचें गोड । तुम्हीचि लाविलें जी झाड ।
तरी आतां अवधानामृतें वाड । सिंपोनि कीजे ॥ १९ ॥
मग हें रसभाव फुलीं फुलेल । नानार्थफळभारें फळां येईल ।
तुमचेनि धर्में होईल । सुरवाड जगा ॥ २० ॥
तुम्हां संतांचिये सभे । ऐसी सलगी कीर करूं न लभे ।
परि मानावें जी तुम्हीं लोभें । अपत्या मज ॥ १६ ॥ ( ज्ञाने० अ० ११)

१ श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या दिव्य वाणीनें संतश्रोत्यावाचकांस म्ह० जनीजनार्दनास मुमुक्षूची सविनय प्रार्थना आहे कीं:—" येथें जे जे बोल निघतील ते ते हे प्रभो ! तुमच्याच शिकविण्याचा प्रभाव आहे, म्हणून आपलेंच मनोगत माझ्या मुखानें आपणच ऐका. हा महाराष्ट्र सारस्वताचा गोड वृक्ष तुम्हींच लाविला आहे म्हणून आतां यापुढें अवधानामृत शिंपून त्याला मोठा (वाड) करणें तुमच्याकडेच आहे ! तुम्हीं त्याला अवधानामृतानें वाढविलेंत कीं तो फोपावत जाऊन रसभावफुलांनीं फुलेल, नानार्थफलभारांनीं समृद्ध होईल, तुमच्या ह्या उदार व प्रेमळ वर्तनानें सर्व जगाला सुख होईल व ह्या पुण्यकर्माचें श्रेय तुम्हांलाच मिळेल ! तुम्हां संतश्रोत्यावाचकांना इतक्या सलगीच्या धिटाईनें विनंति करण्याचा माझा अधिकार नाहीं, पण या अपत्याला तुम्हीं जनीजनार्दनानें प्रेमानें सांभाळावें व मानावें अशी माझी लडिवाळपणाची विनवणी आहे !"

२ ही माझी विनवणी उपचाराची नाहीं, सद्भावाची आहे. लेखकानें मनोभावें सरस्वतीची सेवा केली आणि जनतेनें त्याकडे उपेक्षादृष्टीनें पाहिलें तर त्याला खेद वाटणें स्वाभाविक आहे. बाणभट्टाला, भवभूतीला व इतर अनेक विद्वानांना हा अनुभव आला आहे व अनेकांना येत असतो. लिहायचें असतें वाचण्यासाठीं. लिखिताला कोणी वाचकच भेटेले नाहींत तर त्या लिखिताचे श्रम व्यर्थ होतात ! नऊ महिनें गर्भारपणाचे कष्ट सोसून आईनें अपत्याला जन्म दिला आणि तें जर अंग धरून बाळसेदार झालें व लोकांनीं वाहवा केली तर तिला केल्या श्रमाचें चीज झालें असें वाटतें; नाहीं तर तिच्यासारखी दुःखी तीच ! कवितेला रसिक, ग्रंथाला वाचक, गुणाला ग्राहक भेटला म्हणजे—कन्येला उत्तम

वर मिळाल्याचें जें समाधान पितरांना वाटतें–तेंच समाधान कवीला, ग्रंथकाराला व गुणवंताला वाटत असतें; नाहीं तर निराशेच्या दुःखभाराखालीं बिचारा चिरडून जातो. बाणभट्ट आपला जगांतला अनुभव सांगतातः--

**बोद्धारो मत्सरग्रस्ताः प्रभवः स्मयदूषिताः ।**
**अबोधोपहताश्चान्ये जीर्णमंगे सुभाषितम् ॥**

म्ह० जाणते मत्सरानें ग्रस्त होऊन पाय सदा मागेंच ओढणारे असतात, धनवंत व सत्ताधीश पुरुष आपल्याच तोऱ्यांत राहून हेळणा करितात, बाकीचे सामान्य जन–ते काय बापडे नेणतेच असतात, यामुळें स्फूर्ति अंगांतल्या अंगांतच जिरून जाते! "जे कोणी आमची उपेक्षा, हेळणा, निंदा, कुत्सा करणारे आहेत त्यांनीं हें लक्षांत ठेवावें कीं,हा आमचा प्रयत्न त्यांच्यासाठीं नाहीं! माझा समानधर्मा कोणी असेल किंवा निर्माण होईल तोच माझ्या श्रमाची व गुणाची किंमत करील, कां कीं ही पृथ्वी अफाट आहे व काल अनंत आहे" असे निराशेचे उद्गार समकालीन विद्वानांनीं उपेक्षिल्यामुळें भवभूतीला काढावे लागले आहेत! 'ग्रंथकाराला उपेक्षेसारखें अनर्थावह दुसरें संकट नाहीं' असें डॉ. जॉन्सननें म्हटलें आहे. असो, ज्या काळांत हे उद्गार निघाले त्या काळाहून भिन्न अशा लोकशाहीच्या काळांत आपण आज वावरत आहोंत. आपले महाराष्ट्र ग्रंथकारही पहिल्यापासून जनीजनार्दनालाच भजणारे आहेत; शिवाय महाराष्ट्र सारस्वताचा वृक्ष श्रीकृष्णाच्या द्वारकेंतल्या पारिजातवृक्षासारखा अत्यंत पवित्र आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराज, मुकुंदराज, नामदेवराय, नाथराय, तुकोबाराय, समर्थ, वामन, मोरोपंत, श्रीधर, व महिपती, असल्या पुण्यपुरुषांनीं त्याला निरपेक्षप्रेमानें वाढविलें आहे व ज्ञानेश्वरी, दासबोध, नाथभागवत यांसारखीं परमावधीचीं मधुर अमृतफलें त्याला आलीं आहेत. अर्वाचीन काळांतही त्याच्या गद्यशाखांचा विस्तार होऊन निबंधमालाकार, रहस्यकार लो. टिळक, विश्वनाथपंत राजवाडे, शंकरराव देव, हरिभाऊ आपटे इत्यादिकांनीं महाराष्ट्र सारस्वताची उत्कृष्ट सेवा केली आहे. महाराष्ट्र सारस्वताचा वृक्ष अत्यंत मनोहर, उज्ज्वल, पावन व चतुर्विध पुरुषार्थाच्या दिव्य फळांनीं मोहरला आहे. परतत्वस्पर्शानें महाराष्ट्र वाङ्मय पवित्र झालें आहे.

३ जननी, जन्मभूमी, व जन्मभाषा, यांवर महाराष्ट्रजनतेचें नितांत प्रेम आहे. महाराष्ट्रासारख्या पुण्यपावन देशांत 'मुमुक्षू' चा जन्म होऊन या पुण्यपरिसरांत व पुण्यसंस्कारांतच त्याची वाढ झाली आहे. वर सांगितल्याप्रमाणें निराशेच्या ढगांनीं त्याच्या अंतराळांत केव्हांही प्रवेश केला नाहीं. महाराष्ट्र सारस्वताच्या महावृक्षाला जीं भक्तिसुखाचीं, अद्वयामृताचीं, ज्ञानवैराग्यादिकांचीं रसभरित दिव्य फळें आलेलीं आहेत त्यांचें निरंतर आकंठ सेवन करण्याचें महद्भाग्य ज्याला पूर्वपुण्यानें लाभलें आहे असा कोणता पुरुष निराशेच्या अंधतमांत चांचपडत

राहील ? जीवाचें जन्मदारिद्र्य घालवून त्याला स्वानंदसाम्राज्यपटावर आरूढ करण्याचें सामर्थ्य ज्या महाराष्ट्र सारस्वताच्या अंगीं स्वभावसिद्ध आहे त्याच्या अंकावर प्रेमानें लोळणारें त्याचें अपत्य काय निराशा, दुःख, क्लेश, आधिव्याधिजन्य पातकें यांच्या डबक्यांत डुबत राहील ? छे ! नांवच घेऊं नका. राजहंसाच्या पिल्याला मोत्याचाच चारा मिळणार, चकोराला चंद्रकिरणाचेच खाजें मिळणार यांत संशय कशाला ? महाराष्ट्र सारस्वताची योग्यताच तशी आहे.

**जैसा सुखासनाचा मार्गु । तैसा महाराष्ट्रप्रसंगु ।**
**अंगीं बाणे राजयोगु । रोकडाचि ॥**
**ये मराठीचेनि पल्लवें । जीव उगमातें पावे ।**
**तरी कासया उलथावें । पानाचे कवळे ? ॥**
**वापी कूप देवपाणी । मध्यें सखोल अर्थपाणी ।**
**तें सुदेशी सैंदणी भरूनी । आहाच कीजे ॥**
**अर्थ ज्ञान पद प्रासें । वरी बैसती प्रमाणें सुरसें ।**
**ते मऱ्हाठी पुरवील भडसे । विद्वज्जनांचे ॥**
**धन्य धन्य हे मऱ्हाठी । हे ब्रह्मविद्येची कसवटी ॥**
**हा द्वारशीलेचे पोटीं । परिसु जोडिला ॥** ( त्र्यंबककृत बालबोध )

ह्याप्रमाणें मराठी सारस्वताचे पोवाडे एका मराठी सिद्धानेंच सह्यशृंगीच्या शिखरावरून शके १५०० च्या सुमारास गाईले आहेत ! मराठी वाङ्मयामृताचें सेवन केल्यानें सुखासनाचा मार्ग सांपडतो व अंगीं रोकडा राजयोग बाणतो हें त्र्यंबकस्वामींचें म्हणणें त्यांच्या स्वानुभवाचेंच आहे. जो जितक्या निष्ठेनें वाङ्मयोपासना करील तितका कमीअधिक अनुभव त्यालाही येत असतो. मराठीची कास धरिल्यानें जीव उगमाला पावतो, मराठी भाषा विद्वज्जनांचीही हौस पुरविते, मराठी भाषा ही ब्रह्मविद्येची कसोटी आहे, हा परिस आहे.–हें बोलणें यथार्थच आहे. ' माझी वेल्हाळ देशी नवी ' याप्रमाणें महाराष्ट्रभाषेचे जनक व प्राकृतकवीश्वराचार्य श्रीज्ञानेश्वरमहाराज यांनीं मराठी भाषेवरचें आपलें प्रेम व्यक्त केलें आहे. माझे बाल 'मऱ्हाठे' आहेत पण ते ' अमृतातेंही पैजा जिंकणारे ' आहेत, माझी मराठी भाषा ' नागर ' आहे, साहित्याचें ती लेणें आहे अशा प्रकारें मराठीचें त्यांनीं कौतुक केलें आहे आणि ज्ञानेश्वरी व अमृतानुभव हीं दोन अनर्घ्य रत्नें महाराष्ट्र शारदेच्या अंगावर चढविलीं आहेत. त्यांचा कित्ता गिरवून नंतर झालेल्या अनेक संतकवींनीं मराठी भाषेचें वैभव अपार वाढविलें आहे. **धर्म, राजकारण** आणि **व्यवहार** या तिहींचेंही भरपूर शिक्षण मराठी भाषेच्या द्वारें मिळण्याची ज्यांनीं सोय करून ठेविली आहे त्या प्राचीन व अर्वाचीन ग्रंथकारांचे महाराष्ट्रावर फार मोठे उपकार झाले आहेत. श्रीज्ञानेश्वर, श्रीनाथ, श्रीसमर्थ

व श्रीतुकोबाराय यांनीं संस्कृतांतले अध्यात्माचें भांडार ' जाणांनेणांसकळां '–साठीं खुलें केलें असून दृष्टांतमिषानें व्यवहारही शिकविला आहे. समर्थांनीं समाजशास्त्राचा व राजकारणाचाही ' आधीं केलें मग सांगितलें ' या न्यायानें स्पष्ट विचार सांगितला आहे. मुक्तेश्वर, वामन, मोरोपंत, श्रीधर यांनीं रामायणी व भारती कथा प्रेमानें गाइल्या असून वरील महात्म्यांच्या धर्मकार्यास मोठेंच साह्य केलें आहे. महिपतबावांनीं संतकथा गाऊन संतचरित्रांची गोडी जनतेस लावली आहे. गेल्या शतकांत मराठी गद्याचा उदय होऊन जुने कागदपत्र, ऐतिहासिक लेख, सनदा, शिलालेख, बखरी, पोवाडे, प्राचीन कविता वगैरे उजेडांत आणण्याचे दीर्घ प्रयत्न साने, पारसनीस, राजवाडे, खरे, तेंडुलकर, देव, पराडकर इ० मंडळींनीं व काव्यसंग्रह व भा० इ० सं० मंडळानें फार आस्थेनें, व निरपेक्ष देशभक्तीनें केले आहेत. या शतकांत झालेल्या स्वतंत्र ग्रंथांत विष्णुशास्त्री यांची निबंधमाला व लो. टिळकांचें गीतारहस्य यांची योग्यता कांहीं विशेष आहे. निबंधमालेची भाषा अत्यंत चित्तवेधक व चटकदार असून तिच्या अंगीं रसरसणाऱ्या देशभक्तीनें तिनें अनेकांस कार्यप्रवण केलें आहे. लोकमान्यांच्या अलोट बुद्धिमत्तेचें, विद्वत्तेचें, व राष्ट्रकार्याचें रहस्य हें रम्य चित्र आहे. मराठी भाषेंत चरित्रें, नाटकें, कादंबऱ्या, इतिहास, व्याकरण, कोश, शास्त्रीय ग्रंथ इत्यादि अनेक प्रकारच्या ग्रंथांची भर पडत आहे. याप्रमाणें पाश्चात्यांच्या संसर्गानें वाङ्मयदृष्टीनें महाराष्ट्राची बरीच झपाट्यानें चांगली प्रगति होत आहे. अशा ह्या मराठी भाषेच्या गद्यकाळांत आपले हातून जी थोडीफार सेवा आजवर झाली तिचा आढावा वाचकांपुढें ठेवून पुढील कार्यास त्यांचें प्रोत्साहन व आशीर्वाद मागावें या हेतूनें हें ' सिंहावलोकन ' करीत आहे.

४. ' **मोरोपंतांच्या चरित्रा** 'च्या प्रस्तावनेंत ( पृ० २४ ) मीं इ. स. १९०७ मध्यें लिहिलें आहे. " मला ग्रंथवाचनाची गोडी बाळपणापासूनच होती, पण विद्यार्थिदशेंत निबंधमालेनें माझी वाचनप्रीति वाढविली व ग्रंथकर्तृत्वाची महत्त्वाकांक्षा प्रथम इंग्रजी सातवी यत्ता पास होण्यापूर्वीच ( इ० स० १८९० ) प्रदीप्त केली. कॉलेजचा अभ्यास पुरा होण्यापूर्वी मी इतिहास, काव्य, साहित्य, चरित्रें वगैरेवर बरेच ग्रंथ ( इंग्रजी संस्कृत व मराठी ) अशा विशेष दृष्टीनें वाचले त्या सर्वांत मला चरित्रवाचनाची गोडी अधिक लागली. थोर मनुष्य कसाकसा तयार होत जातो; आपत्तींतून व अडचणींतून पार पडून तो लौकिकाला व यशाला कसा चढतो; साधु, कवि, योद्धा, मुत्सद्दी, ग्रंथकार हे आपलें शील कसें बनवितात व रावाचे रंक अगर दगडाचे देव कसे होतात हें बारकाईनें पाहण्यांत मोठें आत्मशिक्षण आहे व याच कारणांसाठीं चरित्रग्रंथवाचनाइतकें बोधप्रद व आनंददायक दुसरें वाचन नाहीं असें माझ्या मनानें घेतलें... युरोपांत थोर पुरुषांच्या पश्चात् त्यांच्याविषयीं इत्थंभूत माहिती मिळवून सर्व हकीकत सुसंगत रीतीनें प्रसिद्ध करणारे ग्रंथकार निर्माण होतात तसे ते आमच्याकडे उत्पन्न झाले

पाहिजेत. आमच्या राष्ट्रांतले थोर पुरुष मुख्यतः आमचे संतकवि हेच होत. हे राष्ट्राचे प्रेरक आत्मे होत. अनेक उज्ज्वल कल्पना राष्ट्रांत उत्पन्न करणें, राष्ट्रांतील समाजसंस्था व पूर्वपरंपरा यांविषयीं व आपल्या पूर्वजांविषयीं सदभिमान जागृत ठेवणें, धार्मिक, सामाजिक व नैतिक घडामोडींचीं चित्रें लोकांपुढें उदात्त भावना जागृत राहील अशा तऱ्हेनें मांडणें—हें महत्कार्य संतकविच बोभाट्यावांचून करितात; म्हणून संतकवींच्या चरित्राकडे आपण आपलें लक्ष वळवावें व महाराष्ट्र संतकवींची सेवा करण्यांत व ती करितां करितांच आपली व समाजाची उन्नति करण्यास झटावें असे माझे विचार युनिव्हर्सिटीच्या अभ्यासक्रमांतून सुटण्यापूर्वी ( इ० स० १८९८ ) ठरून गेले." ह्या आपल्या कृतसंकल्पाप्रमाणें बी. ए. झाल्यावर चारपांच वर्षें पंढरीस राहून पंतांच्या हातची सर्व हस्तलिखित कविता पाहिली व ठिकठिकाणीं हिंडून व सतत शोध करून सात–आठ वर्षांत त्यांचें चरित्र तयार करून तें १९०७ मध्यें प्रसिद्ध केलें. पंतचरित्राच्या उपसंहारांत मीं पुन्हां लिहिलें आहे. " किती दिवसरात्री पंतांच्या व त्यांच्या ओळखीमुळें महाराष्ट्र सत्कवींच्या संगतींत मी घालविल्या आहेत ! खचित सत्संगतीनें देहांतच पुनर्जन्म होतो, ' नव्या नव्या सृष्टींतल्या चमत्कृति ' दृष्टीस पडतात, भगवंताच्या चरणीं विश्वास व प्रेम जडतें, आंतबाहेर निरुपाधिक आनंदाचा समुद्र भरला आहे अशी भावना होऊन जडत्व गळूं लागतें, शब्दांशीं खेळतां खेळतां शब्दगर्भाकडे जाण्याचा मार्ग सांपडतो, व इंद्रियांना हा अभ्यास होऊं लागला कीं, निरंतर प्रेमाश्रुस्नान होऊन प्राप्त झालेल्या नरदेहाची धन्यता वाटते ! श्रीपांडुरंगानें आपल्याहून अभिन्नतनु अशा संतांच्या लीला गाण्यास प्रोत्साहन देऊन संतचरणरजाची पदवी द्यावी एवढीच त्याचे चरणीं प्रार्थना आहे." (पृ० ५७४). ही प्रार्थना नारायणानें खचित ऐकली आहे. असो. १९०७ च्या फेब्रुवारींत मुमुक्षु निघाला तो (फक्त एक वर्ष १९१८मध्यें बंद राहून) आजवर १६ वर्षें मीं चालविला आहे. असो. इ० स० १८९८ ते १९२३ पर्यंतच्या २५ वर्षांच्या काळांत मुमुक्षूच्या कामगिरीशिवाय माझ्या हातून मराठी वाङ्मयाची जी थोडीफार सेवा नारायणानें घेतली आहे तिचा आढावा पुढें देत आहें:—

## आजपर्यंतच्या कार्याचा आढावा

१ **"मराठी भाषेचें स्वरूप"** ( इ० स० १८९८ ) ह्या ४८ पृष्ठांच्या निबंधांत महाराष्ट्र सारस्वताचा संक्षिप्त इतिहास दिला होता. बी. ए. च्या परीक्षेस बसण्यापूर्वी हा लिहिला असून 'ग्रंथमाला' मासिकांत तेव्हांच छापला होता.प्रसिद्ध झालेला हाच माझा पहिला निबंध होय. इ. स. १८९३ मध्यें ' कालिदास आणि भवभूति ' यांवर प्रथम लिहिलेला निबंध अप्रकाशितच राहिला.

**२ निबंधमालेचें स्वरूप आणि कार्य**
**३ महाभारताचे मराठी अवतार** } हे दोन्ही निबंध मुंबईच्या 'सरस्वतिमंदिर' मासिकपुस्त-

कांत (१९०४) प्रसिद्ध केले होते. पहिला निबंध ६० पृष्ठांचा असून दुसऱ्याचीं पृष्ठें ४८ होतीं. निबंधमालेचे मूळ अंक मोठ्या प्रयासानें मिळवून व सगळे अनेकवार वाचून पहिला निबंध कै. विष्णुशास्त्री चिपळोणकर यांच्या निधनतिथीच्या दिवशीं व्याख्यानासाठीं मूळ तयार केला होता. यांत निबंधमालेचें सर्वांगांनीं समालोचन केलें आहे. दुसऱ्या निबंधांत मराठींत एकंदर १८ कवींनीं महाभारताचें भाषांतर रूपांतर वगैरे केल्याचें दाखविलें असून मुक्तेश्वरी भारत व श्रीधराचा पांडवप्रताप ह्या ग्रंथांचें संपूर्ण समीक्षण केलें होतें. याचसालीं ' अनुभवयोगिराज ' काव्य दोन सर्गांत प्रसिद्ध झालें. ' निबंधमालेचें स्वरूप आणि कार्य ' हा निबंध विष्णुशास्त्र्यांच्या अल्पचरित्रासह इ० स० १९२२ मध्यें स्वतंत्रपणें पुन्हा छापला आहे. किं. ०१०. 'महाभारताचे मराठी अवतार' या निबंधाचा उपयोग इ० स० १९२२ मध्यें छापलेल्या ' **कविवर्य मुक्तेश्वर** —चरित्र आणि काव्यविवेचन ' ह्या ग्रंथांत करून घेतला आहे. पृ. सं. १५० किं. रु. १.

४ " **मोरोपंती वेंचे** " (१९०५) मोरोपंतांच्या काव्यसमुद्रांतून ' ईश्वर-विषयक कविता ' ' कविता आणि कवि ' ' उपदेशपर कविता ' ' वर्णनपर कविता ' ' कथानकपर कविता ' ' चक्रीरामायण ' व ' विविधविषयपर कविता ' ह्या सात सदरांखालीं पंतांच्या कवितेंतले निवडक वेंचे दिले असून ग्रंथाला ३४ पृष्ठांची काव्यशास्त्रावर प्रस्तावना जोडली आहे. हा ग्रंथ हैद्राबाद उस्मानिया युनिव्हर्सिटीनें मराठीसाठीं नेमला आहे. दुसरी आवृत्ति १९२१ किं. रु. १०१२.

५ " **भक्तिमार्गप्रदीप** " ह्या पुस्तकाचा महाराष्ट्रभर किती प्रसार होऊन तें सर्वलोकप्रिय झालें आहे हें सांगण्याची आवश्यकता राहिली नाहीं.प्रदीपानें १८वर्षांत भक्तिमार्गप्रसाराची मोठी कामगिरी केली आहे. प्रदीपाच्या अनुकरणानें या जातीचीं आणखी पुस्तकें निघालीं असून धर्मसेवेचें काम चांगलें झालें आहे ही मोठी संतोषाची गोष्ट आहे. भक्तिमार्गप्रदीपाच्या ह्या १८ वर्षांत महाराष्ट्रभर ८०००० प्रती पसरल्या आहेत. ह्याच्या आवृत्त्या पुढीलप्रमाणें निघाल्या आहेत:—

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ ली | १९०४ | प्रती | १००० | किं. ०४ |
| २ री | १९०५ | ,, | १०००० | ,, ०४ |
| ३ री | १९०८ | ,, | ८००० | ,, ०४ |
| ४ थी | १९१० | ,, | ७००० | ,, ०४ |
| ५ वी | १९११ | ,, | ८००० | ,, ०४ |
| ६ वी | १९१३ | ,, | ६००० | ,, ०४ |
| ७ वी | १९१४ | ,, | १०००० | ,, ०४ |
| ८ वी | १९१७ | ,, | १०००० | ,, ०६ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ९ वी | १९१८ | प्रती | ६००० | किं. | ०६ |
| १० वी | १९२० | ,, | ७००० | ,, | ०८ |
| ११ वी | १९२२ | ,, | ५००० | ,, | ०८ |

एकूण ७८०००

७ " **मोरोपंत-चरित्र आणि काव्यविवेचन** " ( १९०७ ) पृ. सं. ६२५ सदर ग्रंथ आठ वर्षांच्या संशोधनाचें व परिश्रमांचें फळ आहे. ठिकठिकाणीं हिंडून, जुने कागदपत्र पाहून व पंतांची कविता त्यांच्या मूळ हस्तलिखित प्रतींवरून शोधून हा ग्रंथ रचला आहे. हा नुक्ताच मुंबई युनिव्हर्सिटीनें बी. ए. च्या परीक्षेसाठीं नेमल्याचें समजतें. नवी आवृत्ति लवकरच निघायची आहे.

८ " **कविरामायण** " ( १९०९ ) संस्कृत व हिंदी रामायणें आणि मराठी रामायणें व रामकथापर स्फुट आख्यानें यांतून सर्व कवींचे उत्कृष्ट उतारे संगतवार घेऊन हें ' कविरामायण ' निर्माण केलें आहे. किं. ०४

९ " **श्रीएकनाथचरित्र** " ( १९१० ) श्रीनाथमहाराजांचें समग्र चरित्र १२ प्रकरणांत वर्णिलें आहे. सहा हजारांची पहिली आवृत्ति संपून दुसरी १९२२ मध्यें निघाली आहे. किं. ०१२

१० " **श्रीएकनाथी भागवत** " ( १९१० ) निर्णयसागर प्रेसचे माजी मालक शेट तुकाराम जावजी यांच्या विनंतीवरून हा प्रेमळ व प्रासादिक ग्रंथ टीपा देऊन प्रस्तावनेसह तयार केलेला निर्णसागरमध्यें प्रसिद्ध झाला आहे. याच्या दोन आवृत्त्या संपल्या. तूर्त ग्रंथ मिळत नाहीं.

११ " **श्रीज्ञानेश्वरचरित्र व ग्रंथविवेचन** " ( १९१२ ) याचीं ११ प्रकरणें आहेत. पहिलें प्रकरण ' ज्ञानेश्वरकालीन महाराष्ट्र ' हें असून त्यांत राजकारण, विद्या व धर्म या तिहींचा इतिहास दिला आहे. पुढील सात प्रकरणें चरित्रात्मक असून त्यानंतर विपुल निवडक उतारे देऊन विवेचन केलें आहे. पृ. २८०; दुसरी आवृत्ति छापत आहे.

१२ " **मारुतिउपासना** " ( १९०८ ) यांत मारुतिरायांचें चरित्र दिलें असून पुढें भीमरूपी स्तोत्रें, अभंग, पदें वगैरे आहेत. याच्या आजवर चार आवृत्त्या निघाल्या. किं. ०४.

१३ " **पारिजातकांचीं फुलें** " ( १९१३ ) आकारानें लहान पण अर्थगांभीर्यानें भरदार अशा अल्पाक्षररमणीय स्फुट विचारांचें ( गेटीच्या मॅक्झिम्सप्रमाणें ) हें पुस्तक चटकदार झालें आहे. तिसरी आवृत्ति चालू आहे. कि. ०८.

१४ " **सार्थ व सटीक नारदभक्तिसूत्रें** " ( १९१४ ) श्रीनारदांच्या ८४ भक्तिसूत्रांवर संस्कृत व मराठी समर्पक उताऱ्यांसह सविस्तर विवरण केलें आहे. याच्याही तीन आवृत्त्या निघाल्या आहेत. पृ. सं. १०० किं. ८८.

१५ " **नवविधाभक्ति** " ( १९१५ ) नवविधा भक्तीचें यांत क्रमशः विवरण केलें आहे. किं. ८४.

१६ " **सटीप ज्ञानेश्वरी** " ( १९१७ ) सर्व ज्ञानेश्वरी ग्रंथ टीपा देऊन येथील आर्यभूषण प्रेसच्या स्वाधीन केला आहे. छापून प्रसिद्ध होईल तेव्हां खरें ! सात अध्याय स्टीरिओ केले आहेत ! या गोष्टीस सात वर्षें झालीं !!

१७ " **निरंजनमाधवाची कविता** " भाग पहिला ( १९१९ ) ह्या कवीचा सर्व हस्तलिखित काव्यसंग्रह मला २० वर्षांपूर्वी नाशकास सांपडला. कवि १५० वर्षांपूर्वीचा आहे. भक्ति, प्रसाद व काव्य हे तीनहि गुण याच्या कवितेंत आहेत. याची पांच हजार कविता आहे. पहिल्या भागांत स्तोत्रसंग्रह ( २० उत्तम स्तोत्रें ) व सांप्रदायपरिमळ ( आत्मचरित्रपर हजार ओव्यांचें सुंदर प्रकरण ) एवढें छापलें आहे. बाकीची कविता अद्याप छापावयाची आहे. पृ. सं. १८० किं. रु. १

१८ " **आनंदलहरी** " ( १९२० ) वीस वर्षांत वेळोवेळीं लिहिलेलीं स्वतःचीं ४० स्फुट काव्यें यांत संगृहीत केलीं आहेत. किं. ८१२.

१९ " **श्रीतुकारामचरितामृत** " (१९२०) श्रीतुकोबारायांचें चरित्र अभंगवृत्तांत ( हजार चरणांत ) गाइलें असून तें नित्यपाठास योग्य झालें आहे. किं. ८५.

२० " **श्रीतुकारामचरित्र** " ( १९२० ) हा ५२५ पृष्ठांचा गद्यग्रंथ प्रसिद्धच आहे. याचीं १५ प्रकरणें झालीं असून तुकोबारायांचें संपूर्ण सांग चरित्र संशोधन व अभ्यास करून शक्य तितकें सर्वांगसुंदर केलें आहे. किं. ३ रु.

२१ " **संतचरित्रमाला** ' ( १९२२ ) यांत आद्यशंकराचार्यांपासून आरंभ करून कांहीं प्राचीन व बरेचसे अर्वाचीन अशा ४३ संतांचीं चरित्रें प्रसिद्ध केलीं आहेत. यांतील २६ चरित्रें मी स्वतः लिहिलीं असून बाकीचीं इतरांच्या हातचीं आहेत.

२२ " **भक्तिमणिमाला** " ( १९२३ ) यांत मूळ भागवतांतलि निवडक ५०० श्लोक घेऊन त्यांचें ससंदर्भ विवरण केलें आहे.

२३ " **सार्थ दासबोध २४ सार्थ मनोबोध** " वरील तीनही ग्रंथ २ महिन्यांत प्रसिद्ध होतील. सांप्रत श्रीसमर्थ **रामदासचरित्राचें** काम चालू आहे. याप्रमाणें ह्या २५ वर्षांत सुमारें २५ ग्रंथ श्रीगणेशशारदांच्या सेवेस अर्पण केले आहेत.

आतां आहे तैसा दिसतो प्रकार । पुढील विचार देव जाणे ॥ १ ॥
भक्तां नारायण नुपेक्षी सर्वथा । कृपावंत ऐसें कळों आलें ॥ २ ॥

---

५ मुमुक्षु साप्ताहिक मी इ० स० १९०७ च्या प्रारंभीं सुरू केला व मध्यें एक वर्ष ( मे १९१८ ते मे १९१९ ) खेरीज करून मुमुक्षु अव्याहत १६ वर्षे चालला आहे. १९२१ च्या जानेवारींत त्याचें रूपांतर मासिक पुस्तकांत केलें. मुमुक्षूंत माझ्या लेखांशिवाय इतर अनेकांचे लेख प्रसिद्ध झाले असून बऱ्याच लेखांचें ग्रंथरूपानें पुनरुत्थान झालें आहे ! वरील पुस्तकांपैकीं नं. १३।१४।१५।१७।२१।२२ हीं सहा पुस्तकें प्रथम लेखरूपानें मुमुक्षूंत अवतरलीं व नंतर त्यांनीं ग्रंथांचीं रूपें धारण केलीं. मुमुक्षूला ह्या १६ वर्षांच्या काळांत अनेक भाविक, विद्वान् व अनुभवशीर लेखकांनीं निरपेक्षपणानें साह्य केलें आहे व याबद्दल मुमुक्षु त्यांचा फार आभारी आहे. आमचे गोवेकर मित्र **रामचंद्र कृष्ण** व **विठ्ठल कृष्ण कामत** या उभय बंधूंनीं प्रथमपासून ' मुमुक्षू ' वर आत्मीयत्वाचेंच प्रेम केलें आहे. दोघेही बंधु दृढ उपासक व अत्यंत प्रेमी आहेत. विठ्ठलरावांनीं ' सिंहाचलवासी ' या सहीनें उत्तरेकडील तीर्थक्षेत्रांचीं वर्णनें दिलीं, मुलांचीं मधुर गाणीं गायिलीं,' चिदंबरदीक्षित' इ०संतांचीं चरित्रें दिलीं, व वाचकांची परमार्थ बुद्धि वाढीस लागेल असे अनेक लेख मुमुक्षूंत प्रसिद्ध केले.रामभाऊंची ' नामयज्ञ ' व ' यज्ञपुच्छ ' या सुंदर लेखांवरून वाचकांस माहिती आहेच. उभय बंधु उंच कोटीचे साधक आहेत. आतां महाराष्ट्रांत गाजलेले **'गोविंदसुत' ऊर्फ परशुराम गोविंद चिंचळकर** यांचे ' परमार्थविचारमाला ' व ' रहस्यनिरीक्षण ' हे प्रसिद्ध ग्रंथ प्रथम क्रमशः मुमुक्षूंत प्रसिद्ध झाले व ते वाचकांस आवडल्याची प्रचीति आली तेव्हांच त्यांनीं ते पुस्तकरूपानें प्रसिद्ध केले. ' शांति आणि सुख ' ह्या सुंदर ग्रंथाचे कर्ते **माधवराव हरि मोडक** यांच्याही खनपटीला बसून त्यांना ' खेड तात्विक बोल ' बोलायला मुमुक्षूनें लावलें. सातारचे **वामनरावजी फणसळकर** यांचे मुमुक्षूंतील लेख पुढें ' वेदांतादर्श ' नामक ग्रंथरूपानें प्रसिद्ध झाले. **किनरे** ' यांची विवेकानंदावरील ' लेखमाला प्रसिद्ध करून त्यांना मुमुक्षूनेंच महाराष्ट्र वाङ्मयाच्या पटांगणांत पुढें ढकललें आहे. आमचे कविमित्र **माधवराव गोविंद भिडे**-कीं आणखी २० वर्षे लेखणी हातीं घ्यायची नाहीं असा ज्यांचा संकल्प--त्यांना १९१६ ते १९१८ पर्यंत तीन वर्षे मुमुक्षुप्रेमानेंच संपादकीय खुर्चीवर बसाविलें व त्यांचा 'मननामोद' वाचकांच्या आनंदास कारण झाला. **राजोपाध्ये** यांची विवाहसंस्थेवरील भारदस्त लेखमाला वाचक अजून विसरले नसतील. ही नामावाळि आणखी लांबवीत नाहीं. तात्पर्य इतकेंच कीं मुमुक्षूंतील माझे व इतरांचे बरेच लेख ग्रंथाच्या कायम स्वरूपांत परिणत झाले आहेत व लोकप्रिय होऊन त्यांच्या कित्येक आवृत्त्याही निघत आहेत. ' रामदासीबावा,' ' टिळकांचें चरित्र व उक्ति,' ' मुमुक्षूचे उद्गार—भाग १ । २' हीं चार पुस्तकें १९०९ च्या वावटळींत जीं वाहवलीं तीं पुन्हां हातीं लागलीं नाहींत ! असो. गेल्या सोळा वर्षांत

मुमुक्षूनें या प्रकारची कामगिरी केली आहे. संतवचनाधारें सनातनधर्मतत्वांचें विवरण करून महाराष्ट्रीयांत स्वधर्मप्रीति व भगवद्भक्ति उत्पन्न व्हावी या धोरणावर मुमुक्षूनें आपलें काम चालविलें आहे. त्यांतील माझे धार्मिक व वाङ्मयात्मक लेख पुस्तकरूपानें प्रसिद्ध करावेत अशा अनेकांच्या सूचना असल्यामुळें पहिल्या तीनचार वर्षांतले निवडक लेख सिंहावलोकनरूपानें आज प्रसिद्ध होत आहेत. पुढील वर्षांतील निवडक लेख यथाकाल असेच प्रसिद्ध होतील.

पुणें, मुमुक्षु कचेरी.<br>
गोकुळाष्टमी, शके १८४५ } **लक्ष्मण रामचंद्र पांगारकर**



# अनुक्रमणिका.







# मुमुक्षूचें ' सिंहावलोकन. '

## ॥ पहिलें मंगलाचरण ॥



आर्या.

श्रीरामा ! जयरामा ! जयजयरामा ! विभो ! घनश्यामा ।
तुझिया पदकमलाहुनि आधार जगत्त्रयीं नसे आम्हां ॥ १ ॥
विषयसुखाभासाला मानस विटलें, दया करा देवा ! ।
स्वोन्नत्यर्थ झगडतों परि आपुला अभयकर शिरीं ठेवा ॥ २ ॥
योगक्षेम तयांचा चालविसी येति जे तुला शरण ।
निजधन त्यांतें अर्पिसि सद्भावें करिति जे तुझें स्मरण ॥ ३ ॥
बापा ! संचित जाळीं, दयाकरा ! तूंचि होसि पावकसा ।
आरोग्य, यश, सुसंपत्, दे मजला, धांव, धांव; पाव कसा ॥४॥
मायानिर्मित दुःखें दुःसह परि तीं अपाप ओसरतीं ।
सरतीच यातना जरि जीव जगन्नायका ! तुला स्मरती ॥ ५ ॥
व्यंकटरमणा ! संकट वारुनि दावीं अकंटक सुपंथ ।
खंत कशास करूं ? यश-सुख दे, पाहों नको नको अंत ॥ ६ ॥
परवशताचि निरय परि त्यांतुनि सोडील एक सत्कर्म ।
सर्व सुखाचें वर्माचि धर्म, इतरथा न पाविजे शर्म ॥ ७ ॥
त्या धर्मी मति गुंतो, जसि कां गूळासि गुंतते माशी ।
पुरुषार्थसाधनीं बा ! धर्माचि जीवासि येत कामाशीं ॥ ८ ॥
दे बुद्धींत सुनिश्चय, तैसा दे सुप्रसाद वाणींत, ।
सर्वेंद्रियांत भगवत्प्रेम, शिरो मन न विषयघाणींत ॥ ९ ॥
हरिपदिं मुमुक्षु सजला स्वपरार्थ वर प्रभूत मागाया ।
लावा या स्वचरित्रें संतचरितें प्रभूत्तमा ! गाया ॥ १० ॥

मार्थाविषयीं जो अंध आहे; 'हातीं द्रव्याची जपमाळ। कांताध्यान सर्वकाळ' यांत ज्याचें सारें आयुष्य फुकट जात आहे, व त्याची ज्याला खंतीही वाटत नाहीं; द्रव्यदारेचें भजन करण्यांत जो चूर होऊन गेला आहे;—त्याला समर्थांनीं बद्ध असें म्हटलें आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे 'जयासि नाहीं आत्मज्ञान। हें मुख्य बद्धाचें लक्षण.' आपण कोण आहोंत, कोठें आहोंत, काय करीत आहोंत याविषयीं पूर्ण अज्ञान असून कनक, कांता व कादंबरी (सुरा) यांच्या सेवनांत ज्याचा कालक्षेप होत आहे व असें असून पश्चात्तापाचा ज्याला थोडाही घाम फुटत नाहीं तो बद्ध. स्वच्छंदविहार करण्याचें ज्याला स्वातंत्र्य नाहीं, सर्व कार्यांत दुसऱ्याच्या ओंजळीनें ज्याला निरंतर पाणी प्यावें लागतें तो बद्ध. ज्याच्या सर्वस्वावर पराची सत्ता चालते तो बद्ध. कनक, कांता व कादंबरी (द्रव्य, दारा व दारू) यांत अहोरात्र निमग्न झाल्यामुळें आत्मज्ञानविमुख झालेला जो प्राणी तो बद्ध. 'संकोचोनि लहान' झालेला, देहाला आत्मा समजून देहाचीच अहर्निश बडेजाव करण्यांत गुंतलेला, स्वधर्म व स्वदेश यांच्या उदात्त विचारांला पारखा झालेला व केवळ देहपोषणाच्या विचारांत गुरफटलेला जो प्राणी किंवा जें राष्ट्र त्याला **बद्ध** म्हणावें.

३. याप्रमाणें बद्धावस्थेंत असलेल्या जीवाला (किंवा राष्ट्राला) कालांतरानें खेद झाला; चंदनभ्रांतीनें ज्या संसारसर्पाला उराशीं आवळून धरिलें होतें त्यानें आपल्या स्वभावधर्माप्रमाणें दंश केल्यामुळें अनंत तापांनीं तो होरपळून निघाला; प्रपंचाविषयीं उदासीनता उत्पन्न झाल्यामुळें आपल्या हातून पूर्वीं घडलेल्या दोषांविषयीं त्याला खरा अनुताप झाला; उदर भरण्यासाठीं जीं जीं पापें, दुष्कर्में आचरिलीं, लांड्यालबाड्या—चुगल्याचहाड्या केल्या, देव, धर्म, संत, सदाचार व सच्छास्त्र या परमपूज्य पंचकाविषयीं अवहेलना केली, त्याबद्दल त्याला अंतर्यामीं पस्तावा वाटूं लागला; कनककांताकादंबरीच्या यथेच्छ सेवनानें पूर्वीं जो मदअहंकार शिगेला चढला होता तो अन्नान्नदशा झाल्यामुळें ओसरूं लागला; आत्मपरीक्षण करायला, दुसऱ्याचे

गुण घ्यायला व आपले दोष जाणून टाकायला तो तयार झाला; आपण भोगीत असलेलीं सुखदु:खें आपल्याच बऱ्यावाईट कर्मांचीं फळें आहेत, व यासाठीं सुखैषी जीवानें पुण्यकर्मेंच केलीं पाहिजेत हें तत्वज्ञान शिकूं लागला; आपल्या संचितकर्मांची होळी होऊन पूर्वोक्त दु:स्थितींतून आपण मुक्त व्हावें अशी तीव्र इच्छा करूं लागला; याप्रमाणें सर्व प्रकारच्या दुष्ट बंधनांतून मुक्त होण्याची त्याला तीव्र इच्छा झाली कीं, तो एक पाऊल पुढें गेला—तो **मुमुक्षु** या पायरीला जाऊन पोंचला. बद्धाला आपल्या बद्धपणाची जाणीव झाली कीं, तो मुमुक्षु झाला. मुमुक्षा मंद असेल तर जीव पिपीलिकामार्गानें जाईल व तीव्र असेल तर विहंगममार्गानें जाईल, पण मुमुक्षु मोक्षपंथाला लागल्याशिवाय राहणार नाहीं.

**स्वार्थ सांडून प्रपंचाचा । हव्यास धरिला परमार्थाचा ।**
**अंकित होईन सज्जनाचा । ह्मणे तो मुमुक्षु ॥ दास० १–६–८ ॥**
**अवगुणांचा करुनि त्याग । जेणें धरिला संतसंग ।**
**तयासि बोलिजे मग । साधक ऐसा ॥**
**जो संतांसीं शरण गेला । संतजनीं आश्वासिला ।**
**तो साधक बोलिला । ग्रंथांतरीं ॥ दास० १–५–९ ॥**
**साधु वस्तु होऊन ठेला । संशयो ब्रह्मांडाबाहेरी गेला ।**
**निश्चय चळेना ऐसा झाला । या नांव सिद्ध ॥ १–५–१० ॥**

जीव अनुतापयुक्त झाला कीं मार्गस्थ झाला असें समजावें. अनुताप, सज्जनसंगतीची आवड, अवगुणत्याग, सत्संगलाभ, संतजनांचें आश्वासन, सद्गुरुकृपा व ब्रह्मप्राप्ति अशी ही सप्तपदी मुक्तिनोवरी पर्णायाची ज्याला आस्था असेल त्याला चालून जावी लागते.

४ मुमुक्षावस्था बळावली कीं तिसरी म्हणजे साधकाची स्थिति प्राप्त होते. आत्मज्ञान झाल्यावर त्याच्या दृढतेसाठीं निश्चित साधनांचा अवलंब करून असाध्य वस्तु साध्य करून घेण्यासाठीं कंबर कसणारा, असत्क्रिया टाकून सत्क्रिया आचरणारा, वैराग्य व अभ्यास हे दोन मित्र सांगातें घेऊन उद्यमाच्या खंबीर अश्वावर आरूढ होऊन मोक्षपंथाला वेगानें निघणारा, साक्षेपी, उत्साही, धैर्यवंत व सत्संगी जो

ठेवायला हरकत नाहीं; कोणाच्याही इतिहासांत, वाङ्मयांत व राजकारणांत जें जें म्हणून उत्कृष्ट असेल तें तें घेण्यास बिलकूल कसूर करूं नये; पण सर्वकाल आपलें **विशिष्टपण** हरप्रयत्नानें कायम राखावें.

७. योगमार्ग, कर्ममार्ग, ज्ञानमार्ग व भक्तिमार्ग असे ईश्वरप्राप्तीचे चार मार्ग आहेत. हे सर्वच मोक्षदायक व एकरूप आहेत, पण महाराष्ट्र साधुसंतांनीं सामान्य जीवांचा अधिकार ध्यानांत आणून **भक्तिमार्गच** सर्वसाध्य, सुलभ व सर्वोत्कृष्ट म्हणून सांगितला आहे. त्या चोखाळलेल्या मार्गानें बिनधास्त जाणें हेंच श्रेयस्कर आहे. श्रीज्ञानेश्वर, श्रीनामदेव, श्रीएकनाथ, श्रीतुकाराम व श्रीरामदास हे आमच्या भागवतधर्माचे म्हणजेच महाराष्ट्रधर्माचे उपदेष्टे कुलगुरु आहेत; श्रीपंढरपूर, आळंदी, देहु, पैठण व सज्जनगड हीं आमचीं महाक्षेत्रें आहेत; गीता, भागवत आणि संतांच्या उक्ति व ग्रंथ यांत प्रतिपादिलेलीं धर्मतत्वें हींच आह्मांस इहपरगतिदायक आहेत; ईश्वराचीं सगुण व निर्गुण दोन्हीं स्वरूपें आहेत, तरी प्राधान्येंकरून सगुणोपासनाच मुमुक्षूला अधिक श्रेयस्कर आहे, व तिच्या सिद्ध्यर्थच मूर्तिपूजा साधुसंतांनीं अनुमोदिली आहे. **हा जो भागवतधर्म किंवा महाराष्ट्रधर्म तो आह्मां महाराष्ट्रीयांचा राष्ट्रीयधर्म आहे.** हिंदुराष्ट्राच्या या पूर्वपरंपरेशीं सुसंगत व भागवतधर्मसंमत अशा प्रकारचें धोरण 'मुमुक्षू'च्या धार्मिक व नैतिक लेखांचें राहील एवढें आम्ही येथें अभिवचन देतों. श्रीराम व त्यांचे भक्त यांची 'मुमुक्षू'वर अविरत कृपादृष्टि असो.

---

१ अंधेरांतून उजेडांत तसें दुःखांतून सुखांत आल्यावर सुखानुभव अधिक सुखकर होतो:—

सुखं हि दुःखान्यनुभूय शोभते
धनांधकारेष्विव दीपदर्शनम् ॥ ( मृच्छकटिक )

The hues of bliss more brightly glow
Chastised by sabler tints of woe [ Gray. ]

# २. ईश्वरविषयक संवाद.



## संवाद पहिला.

१. गेल्या कोजागिरी पूर्णिमेच्या दिवशीं मध्यरात्रीच्या सुमारास चिंचवडक्षेत्रीं श्रीमोरयागोसावी यांचें दर्शन घेऊन नजीकच्या रम्य घांटावर मी एकटाच आपल्याशीं विचार करित बसलों होतों. भगवान् शंकर ह्या वेळीं संचार करित करीत जर ह्या गांवीं 'को जागर्ति?' ह्मणजे 'जागा कोण आहे' असा शोध घेण्यास यावेळीं आले असले तर त्यांना येथें कोणी जागृत मनुष्य भेटेल काय ? गावांत दोन चार ठिकाणीं जागरण करणाऱ्या लोकांचे अड्डे आहेत; पण पत्ते व सोंगट्या खेळण्यांत, हुतुतू घालण्यांत, आरडाओरड करण्यांत, वायफळ गप्पा झोंकण्यांत व पांचट थट्टामस्करी करण्यांत हे लोक गुंग झाले आहेत; व हे आणखी कांहीं वेळानें चहाचे पेले, कॉफीच्या बशा व दुधाच्या तपेल्या रिचवून पहांटेस घाटावर स्नानाला येतील ! पण हे जागृत आहेत काय ? कठोपनिषदांत 'उत्तिष्ठत, जाग्रत, प्राप्य वरान्निबोधत' असा जो उपदेश केला आहे त्याप्रमाणें हे लोक खरे जागे आहेत काय ? आपण कोण आहोंत, व कोठें जाणार याची यांना ओळख आहे काय ? ह्या रात्रीं जागे राहण्याचा ज्यानें प्रघात पाडला त्या महात्म्याचें लोकांनीं जाग्रण करून चहाचे पेले रिचवावेत एवढेंच 'अंतिम साध्य' होतें काय ? कोजागिरी पूर्णिमेच्या मध्यरात्रीं सभोंवार निरभ्र चंद्रप्रकाश पडला असतांना अशा प्रशांत रम्य वेळीं मनुष्यानें एकटें बसून स्वस्वरूपाचा शोध घ्यावा; मायामोहाच्या घोर निद्रेंतून जागे होऊन आपल्या ठिकाणीं आपला आपण शोध घ्यावा:—

**ठायींच बैसोनि करा एक चित्त। आवडी अनंत आळवावा ॥ १ ॥**

अशा प्रकारच्या जागृतपणांत वेळ घालवावा हें योग्य नव्हे काय ? पण अशी अवस्था आज ह्या चिंचवड क्षेत्राची नाहीं आणि

नाहीं, पदोपदीं तुझे मनोरथ भग्न होतात, व तूं विश्वांतल्या अनेकांच्या सत्तेखालीं चालतोस ह्मणून तुला ईश्वर ह्मणतां येत नाहीं.

**मित्रः**—अनेकांची सत्ता ह्मणजे जर ईश्वर, तर आमच्या पुणें शहरांतले लोक आजकाल म्हणतील तें करूं शकतात; मग त्यांनाच ईश्वर कां ह्मणूं नये ?

**मीः**—पुण्यांतले, नाहीं कलकत्त्यांतले, किंवा लंडनचे लोक घेतलेस तरी म्हटल्यावेळीं कांहीं त्यांना पाऊस पाडतां येत नाहीं किंवा नको ह्मटलें असतां बंद करितां येत नाहीं ! पुण्यांतल्या लोकांना जर स्वसत्तेनें वागतां येतें, तर पुण्यास प्लेगच कां येता व झोंपड्यांत त्यांना राहयला कां जावें लागतें ? त्यांना प्लेग नको आहे हें तर उघड आहे, त्यांनीं प्लेगला एकदम नोटीस दिली असती कीं ' तूं ह्या क्षणींच येथून चालता हो ! ' पण प्लेगला ऐकायला लावायचें आहे कोणाच्या हातांत ? हैद्राबादेला निजाम सरकार, रेसिडंट, शेंकडों अमीरउमराव व दहावीस हजार फौज तयार असतांना दोन दिवसांत शहर जलमय होऊन गेलें, व लाख माणसें मेलीं ! कोणाच्या ध्यानीं मनीं नसतां असा अकस्मात् प्रळय ओढवला. निजाम सरकारच्या मनांत होतें काय कीं आपलें हें शहर जलमय होऊन जावें ह्मणून ? निजामच्या व रेसिडंटाच्या पलीकडे विश्वांत कोणाची तरी सत्ता आहे. साऱ्या जगावर ज्याला सत्ता चालवितां येते तो सर्व-शक्तिमान् परमेश्वर होय !

**मित्रः**—इंग्रजांची सत्ता जगावर चालते, तर मग इंग्रजच पर-मेश्वर होत !

**मीः**—इंग्रजांची सत्ता जर सर्व जगावर चालती तर सर्व जगाचा नकाशा त्यांनीं तांबडा करून सोडला असता. फ्रान्स, जर्मनी, रशिया, अमेरिका इ० राष्ट्रें स्वतंत्रपणें त्यांनीं टिकूंच दिलीं नसतीं !

**मित्रः**—हिंदुस्थानापुरतें तरी इंग्रजांना ईश्वर मानतोस कां ?

**मीः**—तुझी विचारसरणी फारच कोती आहे. इंग्रजांची हिंदु-स्थानावर शाश्वत सत्ता असती तर नव्या चळवळींचें तेज त्यांना थांबवितां आलें असतें ! ! त्यांची सत्ताही अनंतकाल अशीच टिकेल अशी ग्वाही

द्यायला कोण तयार आहे ? रावणासारख्यांचीं साम्राज्यें गेलीं, ग्रीक, रोमन, मुसलमान इत्यादिकांचीं साम्राज्यें नाहींशीं झालीं, मराठे गेले व मुसलमान गेले ! ईश्वर जसा सर्वशक्तिमान् आहे, तसाच तो न्यायी व दयाळुही आहे. काळ्यागोऱ्यांचा भेद इंग्रजांजवळ आहे, पण ईश्वराजवळ नाहीं. स्वार्थैकपरता इंग्रजांजवळ आहे, समता परमेश्वराजवळ आहे. सर्वशक्तिमत्त्व, ममत्व, व दयाळुत्व जर इंग्रजांत असतें तर आह्मीं त्यांनाही ईश्वर ह्मटलें असतें ! ईश्वराचा वास गुणांजवळ आहे, देहांजवळ नाहीं. इंग्रज तुह्मांआह्मांसारखींच माणसें आहेत. त्यांचा स्वार्थ ते ओळखतात, आमचा आह्मीं अजून ओळखीत नाहीं. त्यांचा आमचा झगडा स्वार्थास्वार्थांमधला आहे. ज्याचें पुण्य ज्यास्त प्रबळ होईल तो दुसऱ्यांस जिंकील. इंग्रजांना जन्ममृत्यु आहे, इंग्रजांना सुखदुःख आहे, इंग्रजांना यशापयश आहे, त्यांच्या सत्तेला संकोचविकास आहे, व वृद्धिनाशही आहे. परमेश्वरी सत्ता सर्वांवर सर्वकाळ सारखी चालते, व त्या सत्तेबरोबर न्याय, समता व दयाळुपण हीं अखंड आहेत. परमेश्वरी सत्तेच्या अनुरोधानें जे चालतात त्यांना यश मिळतें. परमेश्वरी इच्छेच्या ओघाबरोबर जे अनन्य भक्त जातात त्यांनाच सुख मिळतें. आपण सर्व मर्त्य उपाधिमग्न आहोंत; परमेश्वर निरुपाधिक व सुखरूप आहे. आमच्या इच्छा उपाधींच्या अनुकूलप्रतिकूलतेप्रमाणें सफळ—
—निर्फळ होतात, पण ज्याच्या इच्छामात्रेंकरून विश्व चालतें, चंद्रसूर्य व पंचमहाभूतें ज्याच्या आज्ञेनें वर्ततात, ब्रह्मांडांच्या उतरंडी ज्याच्या संकल्पाबरोबर रचतात व खचतात, तो सर्वशक्तिमान्, सर्वज्ञ, सर्वतोमुख दयाळु परमेश्वर मात्र खरा सत्ताधीश आहे, त्याच्या चरणीं माझे अनंतानंत प्रणिपात असोत.

---

## संवाद दुसरा.

**मित्रः**—ज्याच्या सत्तेला विश्वांत कोणी अवरोध करूं शकत नाहीं, पण ज्याची सत्ता सर्व बाजूंनीं आपल्या मनोरथांना अवरोध करिते तो परमेश्वर होय असें तूं म्हणालास. अवरोधकत्व हें तुझ्या मतें परमे-

श्वराचें लक्षण दिसतें. मी आंधळा, दरिद्री व असहाय आहे आणि माझ्या मनांत काशीस असलेल्या एका मित्रास पहावयाचें आलें तर आंधळेपण, दारिद्र्य व असहायत्व हीं सर्व कारणें माझ्या मित्रदर्शनरूप मनोरथास अवरोध करितात म्हणून त्यांनाच तुझ्या व्याख्येप्रमाणें परमेश्वर म्हणावें लागेल ?

**मी**:—तुझ्या बोलण्यांत मोठी चूक आहे. परमेश्वराच्या विविध लक्षणांपैकीं अवरोधकत्व (नियामकत्व) हें एक लक्षण आहे. वस्तुतः तो निर्धर्म व निर्लक्षण ह्म० लक्षणातीत आहे. मला ह्यावरून 'अंध आणि हत्ती' या गोष्टीचें स्मरण होतें. एकदां पांच चार आंधळे हत्तीपाशीं आले आणि हत्तीचें वर्णन करूं लागले ! एकाच्या हातीं हत्तीची सोंड आली व हत्ती गदेसारखा आहे असें तो ह्मणूं लागला ! दुसऱ्याच्या हातीं हत्तीचा कान आला व तो मोठ्या तोऱ्यानें पुढें होऊन ह्मणाला, "छे छे ! तूं मठ्ठ आहेस, हत्ती कसा आहे हें तुला बिलकूल समजलें नाहीं. तें मीच यथार्थ जाणलें आहे. अरे मूर्खा ! हत्ती सुपासारखा आहे ! !" तिसऱ्याच्या हातीं हत्तीचें पोट आलें व दोघांनाही मूर्ख ठरवून तो ह्मणाला, 'हं ! हत्तीचें रूप आह्मींच ओळखलें. हत्ती डेऱ्यासारखा आहे !" चवथ्याच्या हातीं हत्तीचा पाय लागला व हत्ती स्तंभासारखा आहे असें तो म्हणूं लागला ! ! ह्याप्रमाणें प्रत्येक जण आपलेंच मत खरें व इतरांचें सर्वस्वीं खोटें असें प्रतिपादूं लागला व त्या चौघांत शिवीगाळ व मारामार सुरू झाली. इतक्यांत एक डोळस मनुष्य तेथें आला व त्यानें प्रत्येकाच्या मताचा ग्राह्यांश घेऊन सर्वांची समजूत काढली ! हत्तीला स्तंभ म्हणणें जितकें वेडेपणाचें आहे तितकेंच ईश्वराला नियामकत्वाच्या ह्या एकाच लक्षणानें वर्णूं पाहणें अविचाराचें आहे ! तुमचे आईबापही तुमच्या मनोरथांचा अवरोध करतात, बाळपणीं शिक्षक व तरुणपणीं वरिष्ठही तुमच्या मनोरथांस प्रतिबंध करितात, म्हणून ते ईश्वर होत नाहींत. सर्व बाजूंनीं सर्वांना स्वेच्छेप्रमाणें ज्याला अवरोध करितां येतो व ज्याला कोठेंच अवरोध होत नाहीं तो अकुंठगति परमेश्वर होय. तो स्वसत्तारूप आहे व

अखिल चराचर सृष्टीवर त्याची सत्ता चालते. धुंडिराज कवि प्रल्हादकथेंत म्हणतोः—

**भू, जल, तेज, समीर, ख, रविशशिकाष्ठादिकीं असे भरला।**
**स्थिरचर व्यापुनि अवघा तो परमात्मा दशांगुळें उरला!॥१॥**

**मित्रः**—तुझा हत्तीचा दृष्टांत तुझ्याच गळ्यांत येतो. सर्व हत्ती आपणांस एकाच वेळीं दिसत नाहीं. केव्हां त्याची सोंड दिसते, केव्हां कान दिसतात, केव्हां पाय दिसतात, व ज्या वेळीं जें दिसतें त्याचें तसें वर्णन दृष्टांतानें करणें यांत चूक नाहीं. तसेंच निरनिराळ्या बाजूंनीं परमेश्वराकडे पाहणें कांहीं चुकीचें होणार नाहीं. हें जर तूं कबूल करशील तर तीन पोरांची तरुण अनाथ व विधवा आई दृष्टीस पडतांच तुझा परमेश्वर निष्ठुर आहे असें मीं म्हटलें तर तुला खपेल कां? परमेश्वर दयाळु आहे असेंच तुह्मी नेहमीं सांगत असतां. पण परमेश्वर जर निष्ठुर आहे असा प्रत्यय येतो तर त्याची भक्ति तरी कां करा!

**मी**—खुषीनें अगर नाखुषीनें तुम्हीं त्याला लवून राहिलेंच पाहिजे, कारण तुह्मीं सर्व त्याच्या सत्तेखालीं नांदत आहांत! सर्व बाजूंनीं तुम्हीं पूर्ण जखडले आहांत, व महानास्तिकाला सुद्धां मी अमुक गोष्ट स्वसत्तेनें करीनच असें म्हणतां येणेंच शक्य नाहीं! परमेश्वराच्या इच्छेवांचून झाडाचें पानही हालत नाहीं. दोन महिन्यांपूर्वींच तुझी बायको मेली तेव्हां पुण्याचे स्वदेशी विदेशी डाक्तर आणवून एक हजार रुपये चार दिवसांत तूं खर्च केलेस, पण तुम्हांला तिचें आयुष्य पळभर तरी वाढवितां आलें कां! सर्व प्राणी सर्वथा पराधीन आहेत व सर्वांना ज्याच्या नियामक शक्तीपुढें वांकावें लागतें त्यालाच आम्हीं परमेश्वर म्हणतों!

**मित्रः**—पण परमेश्वराला दयाळु कां म्हणायचें तें तर सांग. तो निष्ठुर नाहीं का?

**मी**—बाबा रे! हा विषय इतका जिव्हाळ्याचा आहे कीं, त्यावर चर्चा करायलाही माझें मन धजत नाहीं. जीवाला स्वप्रेरणेनेंच परमेश्वर दयाळु आहे असें वाटलें पाहिजे मला वाटतें. आपल्या आइविषयीं मुलाला जसें सहजप्रेम असतें तसें ईश्वराविषयीं वाटलें पाहिजे. परमेश्वरा-

च्या दयालुत्वाविषयीं शंका घेणें हें महत्पाप आहे. अरे ! दुष्ट खोडी सोडविण्याकरितां आईही मुलाला मारते, म्हणून ती क्रूर होते काय? ठार मारणें फार वाईट आहे, पण जगत्पीडा करणाऱ्या कंसासारख्या दुष्टांचा वध करणें, त्याला ठार मारणें, खून करणें हें होईल काय? अफजुलखानाला मारण्यानें शिवाजी क्रूर ठरतो काय? ठ्ग्या रामोशाला फांशी देणें आपाततः क्रूरपणाचें दिसतें, पण त्यानें शेंकडों बायकापोरांचे आधीं खून केले होते हें आपणांस कळलें म्हणजे त्याच्या फांशीचें समाधान वाटत नाहीं का? हें कां वाटतें बरें? क्रूरपणाला शिक्षा लावण्यांत दयाळूपणा असतो. जगाच्या कल्याणासाठीं कंसाला, रावणाला, हिरण्यकशिपूला, अफजुलखानाला, व ठग्याला मारणें हें परमदयाळूपणाचेंच कृत्य होय! 'दया तिचें नांव भूतांचें पाळण। आणिक निर्दळण कंटकांचें॥'

**मित्रः**—इतरांच्या दृष्टीनें कंसाला मारणें दयाळूपणाचें होईल, पण कंसाशीं हा परमेश्वराचा क्रूरपणाच नव्हे काय?

**मीः**—त्याच्या स्वतःच्या उद्धारासाठींच कंसाला मारणें ही लीला भगवंतच जाणतात! पंत केकावलींत म्हणतातः—

**असंख्य खळ संगरीं निजकरीं तुवां मारिले,**
**न निष्ठुरपणें-कृपा करुनि ते भवीं तारिले।**
**जगज्जनक तूं, मुलें सकळ जीव-या भातुकें**
**दटावुनिहि देसि बा! अमृत नेदिजे घातुकें ९०**

भगवंत दटावुनिहि भातुकें म्हणजे खाऊचा पुडा हातावर ठेवीत असतात. या भगवंताच्या दटावण्याला क्रूरपणा म्हणणें हें विपर्यस्तबुद्धीचें लक्षण आहे. बाप बाह्यात्कारीं मुलाला भय दाखवून त्याच्या हातावर खाऊ ठेवितो, त्याप्रमाणें परमकारुणिक परमेश्वरही आपणांवर जीं संकटें आणतो तीं आपल्या कल्याणार्थच आणीत असतो. आमच्या मोहममतांधदृष्टीला विनाश,छळ, संकटें,आपत्ति, क्लेश, पराभव, दारिद्र्य, दुष्काळ, मृत्यु हे सर्व प्रकार भगवंताच्या निष्ठुरपणामुळें होतात असें वाटतें; पण बाह्यतः अनिष्ट वाटणारीं सर्व अरिष्टें आमच्या आध्यात्मिक उन्नत्यर्थच देव आम्हांवर आणीत असतो! कोणाचाही घातपात करण्याची इच्छा परमेश्वराच्या ठिकाणीं संभवत नाहीं. त्याची दृष्टि सर्वांवर

सारखी असते. जीव आपापल्या वासनांचीं व कर्मांचीं फळें भोगतात. विपर्यस्तबुद्धीनें भगवंताच्या लीलांकडे पाहणारे लोक हेच दानव होत व परमेश्वराच्या इच्छेच्या ओघांत आपल्या इच्छेचा ओघ मिळवणारे पुरुषच देव होत. देव किंवा भक्त ह्यांना स्वतंत्र इच्छाच नसते. भगवंताची इच्छा हीच त्यांची इच्छा असते.

मित्रः—भगवंत दुष्टांचा नाश करितो, पण हिरण्यकशिपूसारख्या स्वमतानुसार स्वपुत्रास शिक्षण देणाऱ्या वीरास त्यानें मारलें हें माझ्या मतें बरें केलें नाहीं.

मीः—हिरण्यकशिपूची बुद्धि फार विपरीत व दुष्ट झाली होती, म्हणून त्याला इतका मोठा झटका द्यावा लागला. रोग जितका प्रबळ तितकें औषध तीव्र असतें. साधा कांटा सुईनें निघतो, मोठ्या जखमेवर जरा जालीम उपाय करावा लागतो व रोग दुःसाध्य वाटल्यास पायही तोडून काढावा लागतो! पण दुःसाध्य रोग्याचा पाय तोडून काढणारा डाक्टर जसा क्रूर नसतो, त्याप्रमाणें महदापत्ति आणणारा व तिच्या द्वारें तुमच्या डोळ्यांत अंजन घालून तुम्हांला जागृत करणारा परमेश्वरही क्रूर नाहीं! तुम्हीं आपली बुद्धि परमेश्वरविन्मुख करून उफराट्या दृष्टीनें त्याच्या कृतींकडे पाहत जाऊं नका.

मित्रः—हिरण्यकशिपूला मारण्यांत क्रूरपणा कसा नाहीं?

मीः—हें उदाहरण तर तुझ्या खासें गळ्यांत पडणार आहे. बहिर्मुखांच्या दृष्टीला हिरण्यकशिपूचा वध हा त्याचा नाश आहे असें वाटतें, पण ही मोठी चूक आहे. प्रल्हादासारखा परमभक्त ज्याच्या पोटीं भगवंतानें घातला त्याचा नाश करायचें त्याच्या मनांत होतें काय? महाभागवत ज्याच्या वीर्यापासून उत्पन्न झाला त्याचें अंतःकरण काय खरोखरच भगवद्द्वेषानें लिडबिडलें होतें? दुसरें प्रमाण असें कीं, मरणसमयीं चुकून देवाचें नांव तोंडून निघालें तरी जीवाला सद्गति मिळते मग साक्षात् भगवंताच्या मांडीवर, भगवंताच्या हातांनीं, भगवंताचें मुखकमल डोळ्यांपुढें असतांना व सर्वेंद्रियें भगवद्रूप झालीं असतांना ज्या हिरण्यकशिपूला मरण आलें त्याचें मरण म्हणजे काय

त्याचा नाश होय ? अर्धवट नास्तिकांना मृत्यूचा उगाच मोठा बाऊ वाटतो व मृत्यु ही आपत्ति आहे असें वाटतें, पण ही त्याची चूक होय. हिरण्यकशिपूचा मृत्यु हा त्याचा नाश नव्हे, ही त्याची सद्गति आहे !

**मित्रः**—हिरण्यकशिपु देवाचा द्वेष तरी करीत असे, पण बळीसारख्या निस्सीम भक्ताचा छळ भगवंतांनीं कां केला हें तूं सांगूं शकशील काय ?

**मीः**—अरे हो ! त्यांत काय गूढ आहे ? तुम्ही उलट्या बाहुल्यांचे लोक ज्याला छळ म्हणतां तो छळ नसून अनुग्रह आहे ! हा सर्व परिग्रह दुःखदायक असल्यामुळें व वारंवार मनाला मोहांत पाडून अधोगतीला नेणारा असल्यामुळें भक्तकल्याणार्थ भक्ताला प्रथम निष्परिग्रह करणें म्हणजे भक्ताचें सर्वस्व हरण करणें भगवंताला भाग पडतें ! बळीचें सर्वस्व हरण करण्यांत भगवंताचा हेतु काय होता हें त्याच्याच मुखानें सांगतोंः—

**करितों अनुग्रह मनांतुनि जयावरि दयाभ्र मी हरि तों ।**
**त्याच्या स्वार्थातें, न पडो घाया तया भ्रमीं, हरितों ! ! ॥ १ ॥**

मी दयाभ्र म्हणजे दयेचा मेघ आहे. ज्याच्यावर मी मनांतून अनुग्रह करितों, त्याचें 'मी—माझें' या भ्रमांत त्यानें पडूं नये म्हणून, मी सर्वस्व हरण करितों ! ज्याचा मद अनावर आहे, ऐश्वर्याचा उन्माद कठिण आहे, म्हणून त्याला निष्कांचन करून ठेवतों.

'आढ्योभिजनवानस्मि कोन्योस्ति सदृशो मया' इत्यादि प्रकारांनीं मनुष्य उन्मत्त होतो, म्हणून आसुरी वृत्ति वनविणारी त्याची आसुरी संपत्ति मी हरण करून घेतों. विपत्ति, दारिद्र्य, क्लेश, संकटें हीं भगवंताची अवकृपा म्हणून लोक समजतात, पण ही अवकृपा नसून हे कांहीं विशेष प्रकारचे उपदेशप्रसंग आहेत. भगवंत आपल्याला हे आपत्तींचे धडे देत असतात, व हे जर आपण शिकले नाहींत तर तो दोष आपला आहे.

**मित्रः**—विपत्तीला भगवंताचा अनुग्रह समजण्याइतके वेडे कोण आहेत?

मोः—हें पहा, हें जग असें उफराटें चाललें आहे कीं लोक शहाण्याला वेडा व वेड्याला शहाणा समजतात ! पण जगाच्या दृष्टीनें वेडे ठरलेले लोक विपत्तीला अनुग्रहच समजतात. कौरवांचा नाश होऊन धर्मराज सिंहासनाधीश्वर झाला तेव्हां कुंतीनें देवापाशीः—

**विपदः सन्तु नः शश्वत् यासु संकीर्त्यते हरिः ॥ १ ॥**

म्हणजे ज्या विपत्तींत हरीचें अखंड स्मरण होतें ती विपत्ति आमच्यावर निरंतर असो, असाच वर मागितला !

**(१) देव भक्तालागीं करूं नेदी संसार । अंगें वारावार करूनि ठेवी ।**

.... .... .... .... .... .... ....

**( २ ) बाइल मेली मुक्त झाली । देवें माया सोडविली ॥ १ ॥**
**विठो ! तुझें माझें राज्य । नाहीं दुसऱ्याचें काज॥ १ ॥**
**( ३ ) बरें झालें देवा दिवाळें निघालें । बरी या दुष्काळें पीडा केली ।।**

.... .... .... .... .... .... ....

ह्या तीन अभंगांत तुकाराममहाराजांनीं तेंच सांगितलें आहे. संपत्ती अथवा विपत्ति, सुख अगर दुःख, जन्म किंवा मृत्यु हीं द्वंद्वें देव आपल्या हितासाठींच आपणावर आणतात. हे परमार्थाचे धडे आहेत. प्रत्येक प्रसंग म्हणजे एक नवा धडा आहे, पण मठ्ठ मुलांप्रमाणें बहुतेक लोक तो विसरून जातात ! हुशार विद्यार्थ्याला गुरु पारितोषिक देतात, व हूड अगर कुचर मुलाला बाकावर उभे करितात, वाटेल ती शिक्षा देतात. दोन्ही विद्यार्थ्यांबद्दल गुरूला सारखीच कळकळ असते. पारितोषिक अगर शिक्षा गुरु शिष्यकल्याणार्थच देत असतो, तसाच परमात्मा सुख अगर दुःख दोन्ही प्राक्कर्म पाहून आपल्या हितार्थ देत असतो. नरहरीचा अवतार हिरण्यकशिपूला शिक्षा करण्याकरितां व प्रल्हादाला बक्षीस देण्याकरितां झाला. दोघेही जीव परमेश्वराचीं लेंकरेंच होत. एक हूड व एक आज्ञाधारक. " जगज्जनक तूं ,मुलें सकल जीव " हेंच जीवशिवांचें नातें खरें आहे. भगवंताची दया हीच आपली खरी जननी व जननी ही तिनें नेमलेली दाई असें पंत म्हणतातः—

**कृपाचि जननी तुझी; सकल जीव दायाद या ।**

**तिणेंचि उपदेशिल्या करिति सर्व दाया दया !**
—केकावलि ९७.

ज्या बळीचा छळ केल्याबद्दल आपण उहापोह करीत आहोंत, त्याबद्दल पंत केकावलींत काय म्हणतात तें पहा:—

**तुम्हींहि बळि बांधिला, म्हणुनि आमुची माय जी**
**मनांत सहजा दया, निपट टाकिली काय जी ! ।**
**सकोप दिसती गुरु, क्षणभरीच, जें तापलें**
**जल ज्वलनसंगमें त्यजि न शैत्य तें आपुलें ॥**
—केकावली ८८

**मित्र:**—गड्या ! तूं आज माझ्या विचाराचा ओघ थोडासा फिरवूं पहात आहेस.

---

## संवाद तिसरा.

परमेश्वराच्या दयाशीलतेबद्दल माझ्या मित्राला मीं ज्या दोन गोष्टी सांगितल्या त्यांचा त्याच्या मनावर बराच परिणाम झालासें दिसल्यावरून त्याच विषयाचें आणखी एकवार उद्घाटण करावें असें मला वाटलें. भगवंताच्या दयालुत्वासारखी जी गोष्ट मनुष्याला गृहीतकृत्यासारखी स्वयंसिद्ध वाटावी ती विपरीत काळाच्या प्रतापामुळें सिद्ध करून दाखविण्याचा तूर्त प्रसंग आला आहे. असो. हिरण्यकशिपूचा वध किंवा बळीचा छळ करण्यांत परमेश्वराचा हेतु जनतेचें कल्याण करण्याचा होता, एवढेंच नव्हे तर त्यांचेंही कल्याण करण्याचा होता व बाह्यत: क्रूरपणाच्या वाटणाऱ्या गोष्टींत सुद्धां परमेश्वराची दयाशीलताच प्रकट असते हें मागील प्रसंगीं दाखविलेंच आहे. विनाश, संकटें, आपत्ति, क्लेश, पराभव, दारिद्र्य, दुष्काळ, मृत्यु इत्यादि अरिष्टें आपणांवर येऊन आदळलीं तरी तीं आणण्यांत आपला उद्धार व्हावा असेंच परमेश्वराच्या मनांत असतें, हें तत्व व्यक्त करून दाखविल्यानंतर मी म्हणालों:—

हिरण्यकशिपु व बळी यांचीं उदाहरणें मीं दिलींच आहेत, आणखी एक अहल्येचें उदाहरण देतों. अहल्येला गौतमानें ' जडशिळा होऊन पड ' असा शाप दिला. हा शाप वस्तुत: परमेश्वराचा कोप होय

असें स्थूलदृष्टीचा मनुष्य म्हणेल, पण या शापामुळेंच तिला राघवाचे पाय लागून ती पुढें मुक्त झाली इकडे अनुसंधान ठेवलें म्हणजे रामदर्शनानंदानें उन्मत्त होऊन ती जसें म्हणाली कीं:—

**शाप न अनुग्रहचि हा, म्हणुनिच तुज बा ! महायशा पाहें ।**

असेंच प्रत्येक सद्भक्तास वाटल्याशिवाय राहणार नाहीं. सच्छील व प्रेमी मनुष्याचें मन सहसा विकृत होत नाहीं. तो दुसऱ्याला दोष देण्यापूर्वी आपल्याच ठिकाणीं दोष पाहूं लागतो. आपल्या मनासारखें झालें नाहीं कीं, परमेश्वरावर रागावणारे वेडेपीर जगांत पुष्कळ आहेत ! पण समर्थ म्हणतात:—

**आपुलिया मनोगताकारणें । देवावरी क्रोधास येणें ।**
**ऐसीं नव्हेत कीं लक्षणें । सख्यभक्तीचीं ॥ २१ ॥**
**देवाचें जें मनोगत । तेंचि आपुलें उचित ।**
**इच्छेसाठीं भगवंत । अंतरूं नये कीं ॥ २२ ॥** (दासबोध द. ४ स. ८.)

**मित्रः**—थोडेसें स्पष्टीकरण पाहिजे.

**मीः**—आपल्या मनोगताप्रमाणें देवाला वांकवूं पाहण्याची इच्छा करणारा मनुष्य खरा भक्त नव्हे. भक्त तोच कीं जो देवाची इच्छा तीच आपली इच्छा, देवाचें जें मनोगत तेंच आपलें मनोगत, देवाचा जो मार्ग तोच आपल्या उद्धाराचा निश्चित मार्ग असें निरंतर भावून कसल्याही प्रसंगीं देवाविषयींची आपली श्रद्धा लवमात्रही ढासळूं देत नाहीं! अनुकूलत्व हें जसें पतिव्रतेचें परम लक्षण आहे तसेंच भक्ताचेंही आहे:—

**पतिव्रते जैसा भ्रतार प्रमाण । आम्हां नारायण तैशापरी ॥ १ ॥**

पतिव्रतेला भ्रताराच्या इच्छेशिवाय दुसरी स्वतंत्र इच्छाच नसते, त्याप्रमाणेंच भक्तालाही भगवदिच्छेवांचून दुसरा कायदा माहीत नसतो. भगवंत हेंच भक्तांचें मुख्य प्रमाण होय, म्हणून भक्त आपल्या इच्छेसाठीं देवावर क्रोधास येत नाहीं.

**मित्र**—पण भक्तानें असा आंधळेपणानें देवावर सारा भार काय म्हणून टाकावा ?

**मीः**—देवाशिवाय दुसरा कोणीही आपणांस संकटीं तारावयाला

समर्थ नाहीं व देव भक्तांचा प्रतिपाळ करितो असा सर्व देशांतल्या व सर्व काळच्या संतांचा अनुभव आहे म्हणून !

**मित्र!**—ही असली आंधळी भक्ति (Blind Faith) आपणाला नको बाबा ! विचाराला (Reasoning) टिकणारी भक्ति पाहिजे.

**मी**—आंधळी भक्ति आणि डोळस भक्ति हा तुमचा भेदच खोटा आहे. ज्ञानदेव, तुकाराम,एकनाथ,रामदास, इत्यादि भक्त आंधळे होते कां डोळस होते ?

**मित्र!**—ते डोळस होते असें कबूल केलेंच पाहिजे !

**मी**—तर मग त्यांच्या अनुभवाच्या उक्तींवर विश्वासही ठेवलाच पाहिजे ! तुकोबांनीं आपल्या आत्मचरित्रांतः—

**भक्तां नारायण नुपेक्षी सर्वथा ॥ कृपावंत ऐसे कळों आलें ॥ १ ॥**

असा आपला खास अनुभव स्पष्ट सांगितला आहे. ‘ देव दयाळु आहे, तो भक्ताचा सर्व प्रकारें प्रतिपाळ करितो, व याचा मलाही जातीनें अनुभव आहे ’ अशा इतर संतांच्याही हजारों उक्ति त्यांच्या ग्रंथांत सहज सांपडतील.

**मित्र**—भक्त अल्लडपणानें देवावर सर्व भार टाकीत असतील, पण देवाला भक्तांची उलट काळजी आहेच याला प्रमाण काय ?

मीः—अरे ! तूं श्रीभगवद्गीता पाहिली आहेस काय ?

**तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् ॥**
**भवामि न चिरात्पार्थ मय्यावेशितचेतसाम् ।** अ. १२-७
**तेषामेवानुकंपार्थमहमज्ञानजं तमः॥**
**नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता ॥** अ. १०-११

इत्यादि शेंकडों ठिकाणीं भगवंतांनीं मोठ्या प्रेमानें अभिवचनें दिलीं आहेत. भक्त आणि भगवंत यांचा अन्योन्यप्रेमा अनिवार असतो.

मित्र—भक्त व देव यांचा अन्योन्यप्रेमा विलक्षण असेल, पण त्याचा आपल्यासारख्यांना काय उपयोग ?

मी—अरे ! उपयोग काय म्हणून काय विचारतोस ! भक्तांची निराळी खाण कां आहे ? ज्या खाणींतून भक्त जन्मास आले त्याच खाणींत आपणही जन्मास आलों आहोंत. ‘ जो नर करणी करील

तो नारायण होईल ' असें साधुवचन आहे ना ? आपणच आपला विचार घेऊं लागावें, आपल्या वृत्तींचा माग घेऊं लागावें, चित्तशुद्धीचा प्रकार नित्य पहात असावा, संत ज्या मार्गानें गेले तो मार्ग न्याहाळीत असावें म्हणजे नको म्हणतांही संतपण आपल्याही अंगीं येऊन जडेल ! शाश्वत काय, अशाश्वत काय, याचा निवाडा करूं लागावें व शाश्वत तेंच घ्यावें म्हणजे साधुपण कांहीं निराळें नाहीं ! उमेद पाहिजे, उत्साह पाहिजे, संतपणाची आवड व तो मिळविण्याचा अभ्यास पाहिजे, म्हणजे सर्व कांहीं जवळ आहे. बद्धाचा मुमुक्षु, मुमुक्षूचा साधक व साधकाचा पूर्ण सिद्ध होण्यास कांहीं युगें कां जावीं लागतात ? ' कल्पनेनें प्राप्त झालेलें जीवत्व संकल्पलोपींच मावळतें ' असें ज्ञानोबारायांनीं स्पष्ट म्हटलें आहे. आपणांवर कोसळलेलीं संकटें किंवा येणाऱ्या आपत्ति अधिकारानुरूप पुण्यवंत व जाणता जीव स्वोद्धारार्थ आल्या आहेत असें समजून परमेश्वरावरचें प्रेम व निष्ठा अभंग ठेवतो हा आपला मुख्य मुद्दा आहे तो तुझ्या लक्षांत असेलच.

**मित्रः**—मीं तुला एका विधवेचें उदाहरण देऊन विचारलें होतें कीं त्या अनाथ गरीब सुशील बाईचा एकुलता एक मुलगा हरण करण्यांत ईश्वराकडे निर्घृणतादोष येत नाहीं का ?

**मीः**—ईश्वर कोणाला जन्म देत नाहीं व कोणाला हरणही करीत नाहीं. जीवमात्र आपापल्या कर्मानुसार सुखदुःखें भोगीत असतात.

**मित्रः**—बरी आठवण झाली. तुझाच मुलगा सीताराम पंधरा दिवसांपूर्वींच वारला तेव्हां तुला काय वाटलें ?

**मीः**—मला क्षणभर दुःख झालें हें मी कबूल करितों. पण दुःख होणें हें केवळ अज्ञानाचें फळ आहे, हा विचार माझ्याही मनांत सतत जागृत असल्यामुळें त्या दुःखाचा उमाळा फार लवकर ओसरला. मी आपल्या मनाशीं असा विचार केला:—" अल्पकाळच्या संगतीमुळें ह्या मुलावर माझें जें प्रेम जडलें त्यापेक्षां परमेश्वरावर माझें प्रेम जास्त असतें तर माझ्या हृदयांत दुःखाची ही ऊर्मीही उद्भवली नसती ! " स्थिरधीस्त तदेव मन्यते कुशलद्वारतया समुध्दृतम् " या प्रकारची

किंवा ‘ विठो तुझें माझें राज्य । नाहीं दुसऱ्याचें काज ” या प्रकारची स्थिरप्रज्ञता माझ्या ठिकाणीं अद्याप उत्पन्न झालेली नाहीं ! पुत्रमोहाच्या अंधकारांत मी चांचपडत रहावें हें परमेश्वराला न आवडून त्यानें माझ्या मुलाला मजपासून दूर केलें असें मीं आपल्या मनाला शिकवीत आहे, शिवाय त्या जीवाला ‘माझा पुत्र’ म्हणावयाचा तरी मला कां अभिमान असावा ! परमेश्वराचा मुलगा, परमेश्वरानें नेला. जसा मीं देवाचा, तसा सीतारामही देवाचा. देवानेंच त्याला जन्मास घातलें व देवानेंच त्याला दूर केलें. जें आपलें नाहीं त्याला आपण आपलें म्हणून म्हणतों व जें आपलें आहे त्याला ओळखण्याची तळमळही करीत नाहीं हेंच अज्ञान होय.

**पैं आपुलें जें साचें । तें कल्पांतींही न वचे**
**हें जाणोनि गताचें । न शोची जो ॥ १ ॥**

ही ज्ञानोबारायांची उक्ति अयथार्थ नाहीं. पुत्र गेल्यामुळें मला अज्ञानास्तव किंचित्काळ वाईट वाटलें खरें; पण मुलगा, स्त्री, कन्या, द्रव्य, कीर्ति, स्थावर–जंगम इत्यादिकांविषयीं तेव्हांपासून मला थोडीशी अनासक्ति वाटूं लागली आहे ! ‘ एक देव आहे खरा । माया नाथिला पसारा ’ हें समर्थवचन साच वाटूं लागलें व ‘ मिथ्या हे अनेक रे । सत्य राम एक रे ’ ही साधूक्ति मनावर ठसूं लागली. परमेश्वरावर शुद्ध, निष्कपट व अखंड प्रेम ठेवलें म्हणजे वियोगाचें भय वाटत नाहीं, पण जर तें इतर वस्तूंवर किंवा प्राण्यांवर ठेवलें तर वियोगाचें भय संयोगकालींही बागुलासारखें भिवविल्याशिवाय राहत नाहीं ! मित्रा ! काय सांगूं ? ह्या विचारामुळें माझ्या मनाची तळमळ शमली व उलट जीवाला सुख वाटूं लागलें ! !

**मित्रः**—लहान, निर्मळ, कोमळ मुलें व प्राणाहून प्रेम करणारी स्त्री यांना शत्रूसारखें मानणें व हीं आपल्या उद्धाराच्या मार्गांतलीं विघ्नें आहेत असें समजणें हें सर्वथा गैरच नव्हे तर अत्यंत पापमूलक आहे असें मला वाटतें ! अरे ! मोरोपंतांच्या चरित्रांतल्या ‘ गृहस्था-

श्रम ' ह्या प्रकरणांतलीं गोड व प्रेमळ पद्यें मला वाचून दाखवून तूंच ना परवां मिटक्या मारीत होतास ?

**बाळमुखींचीं जरि अव्यक्तें अक्षररूपें साधीं।**
**केवळ अमृतचि होतीं वत्सलगुरुजनकर्णीं आधीं ॥ १ ॥**

ही पंतांची साकी तर माझ्या कानांत अजून गुणगुणत आहे !

**मी**:—असें नव्हे रे ! मला कोमल मूल आणि फूल मनापासून आवडतें, व त्यांच्याठायीं देवपणाही जास्त आहे असेंही वाटतें. स्त्रीपुत्रांना आपण द्वेष्य समजावें असें माझें म्हणणें नाहीं. सर्वशक्तिमान्, सर्वज्ञ, सर्वव्यापी, सर्वभूताधिवास व परमदयाळु परमात्म्याविषयीं आपल्या मनांत परिपूर्ण प्रेम असल्यास स्त्रीपुत्रादि विघ्नरूप नाहींत, पण नारायणप्रेमाला जर हीं अंतराय करीत असतील किंवा परमेश्वरप्रेमाचें स्थान हीं पटकावीत असतील तर मात्र हीं विघ्नरूप आहेत असेंच मानलें पाहिजे ! परमेश्वर हा आपल्या पूर्णप्रेमाचा खरा विषय असल्यावर स्त्रीपुत्रांवर आत्मबुद्धीनें प्रेम ठेवणें गैर नाहीं. देहबुद्धीनें स्त्रीपुत्रादिकांवर प्रेम करशील तर मग मात्र गोते खाशील. आधीं परमेश्वरावर प्रेम ठेव व त्याचीं म्हणून स्त्रीपुत्रांवर प्रेम ठेव. सर्वच देवाचीं रूपें आहेत. मन उगाच घोंटाळ्यांत पाडूं नकोस. एखाद्या श्रीमंत मनुष्यानें आपल्या मुलाच्या संगोपनार्थ ठेवलेली दाई ज्याप्रमाणें आपल्या यजमानाच्या मुलावर प्रेम करते, त्याला न्हाऊंमाखूं घालते, त्याला कुरवाळून त्याचे प्रेमावेशांत मुके घेते, गाणीं गाऊन त्याला थोपटून निजविते व हर प्रकारें त्याला लडिवाळपणानें वाढविते, पण हें मूल माझें नसून माझ्या यजमानणीचें आहे अशी जशी मनांत जागृत रहाते; त्याप्रमाणें संसारांत आपल्या संगतीला आलेला स्त्रीपुत्रादि परिवार आपला नसून परमेश्वराचा आहे ही जागृति ठेवून जर आपण त्यांजवर प्रेम केलें तर मग मात्र संसारबंधनाचें भय नाहीं. हाच भाव मनांत आणून पंतांनीं केकावलींत:—

**कृपाचि जननी तुझी सकल जीव दायाद या**
**तिणेंचि उपदेशिल्या करिति सर्व दाया दया॥**
**असें उमजतां भले न गुरुभाव तो टाकिती**
**मता तुजहि गोपिका मग जनांस तोटा किती ? ॥ ९७ ॥**

असें देवाला म्हटलें आहे.

# ४ मूर्तिपूजा.



## लेखांक १.

**अवघें ब्रह्मरूप रिता नाहीं ठाव ।**
**प्रतिमा तो देव कैसा नव्हे ? ॥ १ ॥**

श्रीतुकाराम.

१. आपण महाराष्ट्रीय लोक किंबहुना सारे हिंदु लोक मूर्तिपूजक आहोंत. आमच्या शास्त्रांनीं व रूढीनें भगवदुपासनेची पहिली पायरी म्हणून मूर्तिपूजा स्वीकारली आहे. मुसलमान व ख्रिस्ती लोक मूर्तिपूजक नाहींत असें म्हणतात, पण आपणांस त्यांच्यांशीं कांहीं कर्तव्य नसून आपल्या धर्मांत मूर्तिपूजा कां प्रतिपादिली आहे याचाच विचार करावयाचा आहे. मूर्तिपूजेची यथासांग व यथाशास्त्र प्रक्रिया कोणास पाहवयाची असेल तर त्यानें श्रीमद्भागवताच्या एकादश स्कंधांतील सत्ताविसावा अध्याय नाथांच्या टीकेसह पहावा. भगवंताच्या पूजेचीं अधिष्ठानें किती आहेत; प्रतिमा किती प्रकारच्या आहेत; पूजेस प्रारंभ कसा करावयाचा; पाद्यार्घ्याचमनादि विधि कसे करावयाचे; आवाहन, आसन, स्नान, अलंकार, नैवेद्य वगैरे कसे करायचे; न्यास म्हणजे काय; वगैरेसंबंधानें तेथें उत्कृष्ट विवेचन केलेलें सांपडेल. आज आह्मांस मूर्तिपूजेचें रहस्य काय आहे एवढेंच पाहावयाचें आहे. ख्रिस्ती लोक सुधारलेले आहेत म्हणून सांगतात. त्यांची सुधारणा व त्यांचें राज्य यांचा तूर्त आमच्या देशाशीं संबंध जडून आल्यामुळें त्यांना ज्या गोष्टी प्रिय आहेत त्या आमच्यांतल्या कित्येक लोकांस 'यथा राजा तथा प्रजा' या न्यायानें प्रिय वाटावयास लागल्या; व त्यांच्या अनुकरणेच्छेनें त्यांनीं आमच्यांतल्या कित्येक चांगल्या गोष्टीही झिडकारून टाकल्या. ख्रिस्ती लोक जातिभेदाला हंसतात म्हणून यांनींही जातिभेदाला तुच्छ मानायला

प्रारंभ केला; ख्रिस्ती लोक मूर्तिपूजेला तुच्छ मानतात म्हणून यांनींही मूर्तिपूजेची टवाळी करायला आरंभ केला; ख्रिस्ती लोक दर रविवारीं चर्चमध्यें जाऊन निर्गुणनिराकाराची प्रार्थना करितात, म्हणून यांनींही प्रार्थनामंदिरें स्थापिलीं! तात्पर्य काय कीं, राज्यकर्त्यांच्या रीति उचलायचें या नव्या लोकांना जबर व्यसन लागलें. सारासारविचारानें व आपलेपणाच्या बुद्धीनें आपल्या समाजाकडे पाहण्याची बुद्धि मलिन झाल्यामुळें या परप्रत्ययनेयबुद्धि पंडितांनीं इतर पुष्कळ चांगल्या गोष्टींप्रमाणें मूर्तिपूजेची हेळणा करण्यास सुरुवात केली. हें जें त्यांनीं ४०-५० वर्षांपूर्वीं धार्मिक व सामाजिक पातक केलें त्याचा परिणाम होऊन बहुतेक शिकलेल्या लोकांच्या मनांतील धर्मश्रद्धा शिथिल झाली आहे! सहजगत्या वाटेनें जातांना रामाचें, मारुतीचें, विठ्ठलाचें किंवा महादेवाचें देऊळ पाहिलें कीं, पटदिशीं मान खालीं लवायची व नमस्कार करून पुढें पाऊल टाकायची बुद्धि अलीकडच्या तरुणांत बरीच कमी झाली आहे. गणेशोत्सव शेंकडों ठिकाणीं चालू झाले आहेत, गणपतीची मूर्ति स्थापन करून पुढें व्याख्यानादि प्रकार होतात;पण तेथेंही मूर्ति पाहतांच लवून देवताबुद्धीनें नमस्कार करणें हें अलीकडचे सुशिक्षित लोक विसरत चालले आहेत. निर्गुणाची उपासना दुर्घट आहे म्हणून व सगुणाच्या ठिकाणीं अश्रद्धा झाली म्हणून नवा समाज श्रद्धारहीत झाला आहे! ज्या समाजाची धर्मश्रद्धा उडून जाते, त्या समाजाची कोठेंही खरी श्रद्धा म्हणून जडत नाहीं व त्यांत बाह्य डामडौल व उपचार यांचेंच बंड माजतें. असो, 'झालें तें होऊनि गेलें, आतां तरी ब्राह्मणीं आपणांला शाहणें करावें' असें समर्थांच्या शब्दांनीं आम्ही आमच्या देशबांधवांस सांगतों.

२. मूर्तिपूजक लोक सर्व देशांत आहेत, किंबहुना सर्वच लोक मूर्तिपूजक आहेत! मूर्तीची पूजा न करणारा मनुष्य त्रिभुवनांत सांपडणार नाहीं असें आम्हीं येथें स्पष्ट विधान करितों! आम्ही देवतांच्या मूर्ति पुढें स्थापून त्यांची स्नानविलेपनादि व गंधाक्षतादि सामुग्रीसह विशेष पद्धतीनें पूजा करितों. निराकार व निर्गुण परमेश्वराचें ध्यान डोळे

मिटून कसें करितां येतें तें आम्हांस नीट समजत नाहीं ! तो जर निराकारच आहे तर त्याचें ध्यान कसें करायचें ! बरें, तो निराकार आहे असें जे म्हणतात तेच असें म्हणण्यानेंच तो साकार आहे असें कबूल करितात ! ‘ परमेश्वर निराकार आहे, ’ तर डोळे मिटतांक्षणींच त्याच्या निराकारत्वाची जी कल्पना किंवा भावना डोळ्यांपुढें येते तीच त्याची मूर्ति होत नाहीं काय ? ‘ मी जेवतांना बोलत नाहीं ’ असें जेवतांना सांगणारा मनुष्य जसा मौनी राहूं शकत नाहीं, त्याप्रमाणें परमेश्वराचें ध्यान करण्यास सरसावणारा मनुष्य ‘ ईश्वर निराकार आहे ’ असें सांगण्यास जरी प्रवृत्त झाला तरी असें सांगण्यांतच त्यानें ‘ ईश्वर साकार आहे ’ हें कबूल केलें असेंच सिद्ध होतें ! एकदां एका गुरूपाशीं रामा व गोविंदा हे दोन शिष्य ब्रह्मविद्या शिकण्यास राहिले होते. दोघेही कालांतरानें कृतविद्य झाले. पण दोघांच्या मनोवृत्तींचा ओघ पाहून त्यांस ईश्वरप्राप्तीचे दोन भिन्न मार्ग गुरूनें सांगितले. कृतविद्य झाल्यावर दोघांचा एक दिवस वाद चालला. रामा म्हणाला, ‘ मला ईश्वराचें स्वरूप काय आहे तें समजलें. ’ गोविंदा म्हणाला, ‘ ईश्वर अगम्य व अचिंत्य आहे व त्याचें स्वरूप कळणें आम्हांस शक्य नाहीं असा माझा तर निश्चय झाला आहे. ’ या मुद्यावर दोघांची खूप खडाजंगी उडाली. रामा व गोविंदा वादविवादाच्या भरांत आले, इतक्यांत गुरुजींची स्वारी तेथें प्राप्त झाली. गुरुजींनीं उभयपक्षांचें म्हणणें ऐकून घेतलें व ते हंसले ! शिष्यांस चमत्कार वाटला असें पाहून ते म्हणाले, ‘ तुम्ही शब्दांत भांडतां, पण तुम्हांत वस्तुतः पाहतां मुळींच मतभेद नाहीं. असें पहा, रामाला ईश्वराचें स्वरूप कळलें आहे, व गोविंदालाही कळलें आहे मग मतभेद कोठें राहिला ? गोविंदा म्हणतो कीं, ईश्वर अगम्य व अचिंत्य आहे, ठीक आहे. ईश्वर अगम्य व अचिंत्य आहे हें तरी त्याला कळलें आहे ना ? ईश्वरस्वरूप लघुजीवाला कळणें शक्य नाहीं हें तरी त्याला कळलें आहे ना ? ईश्वरस्वरूपाबद्दल त्याचा कांहीं तरी निर्णय झाला आहे ना ? जर असा कांहीं निर्णय रामाप्रमाणें गोविंदाचाही झाला आहे, तर दोघांच्याही मतांत भेद कोठें राहिला ?

दोघांच्या मतांत भेद नाहीं, फक्त शब्दांत भेद आहे ! ' ईश्वर साकारही आहे व निराकारही आहे, व जीवाचें उभयरूपांशीं पूर्ण तादात्म्य आहे. पण हें उमजत नाहीं. तें उमजण्याची योग्यता जीवांत यावी म्हणून तर उपासनेची जरूरी आहे. साक्षात् श्रुतींनींही ईश्वर साकार आहे व निराकारही आहे असें सांगितलें आहे. हें दृश्याकार जेवढें विश्व आहे हें ईश्वराचें सगुणरूप नाहीं काय? सगुण हें निर्गुणाकडे जाण्याचें द्वार आहे. ' क्लेशोधिकतरस्तेषाम् ' या श्लोकांत भगवंतांनीं निर्गुणोपासना अत्यंत कठीण आहे म्हणून सांगितलें आहे. सिद्धांनाच ती साध्य आहे. सगुणोपासना मात्र सर्वसाध्य आहे. श्रुति सगुणस्वरूपाबद्दल सांगते.—

**यस्याग्निरास्यं द्यौर्मूर्धा खं नाभिश्चरणौ क्षितिः ।**
**सूर्यश्चक्षुर्दिशाः श्रोत्रं तस्मै लोकात्मने नमः ॥ १ ॥**

त्याचप्रमाणें:—

**द्यां मूर्धानं यस्य विप्रा वदन्ति । खं वै नाभिं चन्द्रसूर्यौ च नेत्रे ।**
**दिशः श्रोत्रे विद्धि पादौ क्षितिं च । सोऽचिन्त्यात्मा सर्वभूतप्रणेता ॥२॥**

संपूर्ण ब्रह्मांड हें परमात्म्याचें सगुणरूप आहे. सर्वांशानें त्याला मापण्याचें आपल्याला सामर्थ्य नाहीं, म्हणून एकांशानें आपण त्याला पाहतों, व म्हणूनच तुकोबा म्हणतात कीं, "अवघें ब्रह्मरूप आहे, त्यावांचून बोटभर जागा रिकामी नाहीं; तो सर्व व्यापून दशांगुळें उरला आहे; त्यावांचून जर कोठेंही रिता ठाव नाहीं, तर आम्हीं आपल्या चित्तस्थैर्यासाठीं, भक्तिदार्ढ्यासाठीं व आत्मनिवेदनरूप भक्तिसुखासाठीं एक हातभर उंचीची प्रतिमा पुढें ठेविली तर ती देवरूप नाहीं असें कसें म्हणतां येईल ?" हा श्रद्धेचा प्रश्न आहे. परमात्मा जसा सगुण आहे तसा निर्गुणही आहे. श्रुतिवचनः—

**अपाणिपादो जवनो गृहीता । पश्यत्यचक्षुः स शृणोत्यकर्णः॥**
**स वेत्ति वेद्यं न च तस्यास्ति वेत्ता । तं प्राहुरग्र्यं पुरुषं महान्तम्**
—श्वेता० ३। १९ ॥

परमात्मा सगुण आहे तसा निर्गुणही आहे हें सांगितलें. याचा विशेष विचार पुढील लेखांत करूं.

———

## लेखांक २.

**नको ब्रह्मज्ञान आत्मस्थितिभाव ।**
**मी भक्त तूं देव ऐसें करीं ॥ १ ॥**

—श्रीतुकाराम.

३. ईश्वराचीं सगुण व निर्गुण हीं दोन्हीं स्वरूपें आहेत, हें श्रुतिवाक्याधारें दाखवून दिलें, आतां सगुणोपासना व निर्गुणोपासना याबद्दल थोडीशी चर्चा करावयाची आहे. हिंदुमात्राच्या हाडींमांसीं खिळलेलीं हिंदुधर्माचीं जीं तीन प्रधान अंगें—कर्म, ज्ञान व उपासना —त्यांपैकीं उपासनेस केवळ आधारभूत असलेली जी मूर्तिपूजा तिचा ऊहापोह केल्यानें धर्मबुद्धीच्या जोपासनेस विशिष्ट वळण लागेल अशा हेतूनें हा विषय चर्चेस घेतला आहे. मनुष्याच्या चित्तांत निष्ठा असेल तर ज्या गोष्टीपासून श्रद्धावंताला परमानंद होतो त्या गोष्टीपासून अभाविकाला लवमात्रही संतोष होत नाहीं. चंद्रभागेमध्यें बुचकुळी मारली म्हणजे भक्ताला सर्वजन्मांतलीं पातकें एकदम भस्म झाल्यासारखें वाटतें, व अभाविकाला चंद्रभागेचें पाणी विहिरीनाल्यांतल्या सारखेंच दिसतें ! पंढरीस गेल्यावर ‘ देहभाव हारपला । तुज पाहतां विठ्ठला ’ अशी तुकोबाची स्थिति होत असे, पण हजारो पाषाण तेथें जाऊन पाषाणच पाहून येतात ! धर्म हा भावनेचा विषय आहे. भाव तोच देव, भाव तोच धर्म, भाव तोच मोक्ष; भाव नाहीं तर धर्म नाहीं, देव नाहीं व मोक्षही नाहीं ! भाव हें धर्माचें सर्वस्व आहे. भावाला या लोकांच्या बाजारांत भाव नसला, तरी ती एक बिनमोल चीज आहे. तो ज्यांच्यापाशीं आहे ते त्रिभुवनांतली संपत्ति तुच्छ लेखतात. भाविकासारखा भाग्यवंत दुसरा कोणीच नाहीं. भाविकाचे डोळे जग निराळ्या दृष्टीनें पाहतात. भाविकाला सर्वत्र आनंद व हरिप्रेम सांठविलेलें दिसतें. भावानें भक्ति फळते, भावानें ज्ञान मिळतें, भावानें धर्मगुह्य कळतें, व भावानें पाप जळतें. ‘ जाणें भक्तीचा जिव्हाळा । तोचि दैवाचा पुतळा ’ असें तुकोबांनीं सांगितलें आहेच. असो. मूर्तिपूजेचा, किंबहुना कोणताही धर्मविषय भक्तिभावाचा ओलावा अंतर्यामीं असल्याशिवाय

वाचकांस रुचणार नाहीं. लेखकवाचकांनीं आपापल्या चित्तवृत्ति धर्मरहस्याकडे वळविल्यापासून अन्योन्यांच्या सद्वृत्तींचें पोषण होणार आहे.

४. परमात्मा सगुणही आहे व निर्गुणही आहे. अंतर्बाह्य एकच स्वरूप कोंदाटलेलें अखंड एकाकारपणानें पाहणें हीच निर्गुणाची खरी उपासना होय, पण ही ज्याचें द्वैतभान निःशेष निमालें आहे त्यालाच साध्य आहे. नुसतें डोळे मिटून बसल्यानें निर्गुणाची भक्ति होत नाहीं. ईश्वराला जीवाची दया येऊन त्यानें जीवोद्धारार्थ वेळोवेळीं जे अवतार घेतले त्यांपैकीं एका विशिष्ट अवताराची किंवा एकपणाच्या भावानें अनंत अवतारांची उपासना करणें ही सगुणाची उपासना होय. दोन्हीं वस्तुतः एकच आहेत.

तेथें सगुण आणि निर्गुण । उभयरूपें मीचि जाण ।
जैसें सुवर्ण आणि कंकण । तैसीं अभिन्न जाण मद्रूपें ॥ १ ॥
निर्गुणाहूनि सगुण न्यून । म्हणे तो केवळ मूर्ख जाण ।
सगुण निर्गुण दोन्ही समान । न्यूनपूर्ण असेना ॥ २ ॥
विघुरलें तें तूप होये । थिजलें त्यापरीस गोड आहे ।
निर्गुणापरीस सगुणीं पाहे । अतिलवलाहें स्वानंदु ॥ ३ ॥
निर्गुणाचा बोध कठिण । मनबुद्धिवाचे अगम्य जाण ।
शास्त्रांसीं न कळे खूण । वेदीं मौन धरियेलें ॥ ४ ॥
वारा उमाणावा वावें । आकाश आकळावें खेवें ।
भावना भांबावली धांवे । काय करावें स्फुरेना ॥ ५ ॥
तैशी सगुणमूर्ति नव्हे जाण । सुलभ आणि सुलक्षण ।
देखतां जाय भूकतान । निवताहे मन सप्रेमें ॥ ६ ॥
जो नित्य शुद्ध सच्चिदानंद । प्रकृतिहून पर परमानंद ।
सगुण साजिरा गोविंद । स्वानंदकंद स्वलीला ॥ ७ ॥
धैर्य वीर्य उदार कीर्ति । गुणगांभीर्य शौर्य ख्याती ।
यासी कारण माझी सगुणमूर्ति । जाण निश्चितीं उद्धवा ॥ ८
माझी मूर्ति देखिल्यापाठीं । न लगे योगयाग आटापाटी ।
न लगे रिघावें गिरीकपाटीं । नानासंकटीं न पडावें ॥ ९ ॥
दीपकळिका हातीं चढे । तैं घराभीतरीं प्रकाशु सांपडे ।
माझी मूर्ति जैं ध्यानीं जडे । तैं चैतन्य आतुडे अवघेंचि ॥ १०

**या उपपत्ति उद्धवा तूं देख । सगुण निर्गुण दोन्ही एक ।
जाण पां निश्चयो निष्टंक । सच्चिदानंदसुख समत्वें ॥ ११ ॥**

—नाथभागवत अ० ११.

"५ वरील उताऱ्यांत नाथ म्हणतात:—" जसें सुवर्ण आणि कंकण अभिन्न आहेत, तशीं सगुण आणि निर्गुण हीं परमात्म्याचीं उभयरूपें अभिन्न आहेत. निर्गुणाहून सगुण न्यून आहे असें म्हणणारे केवळ मूर्ख आहेत ! उलट सगुणाचीच गोडी जास्त. वितळलेल्या तुपापेक्षां थिजलेल्या तुपाच्या वड्या जशा अधिक गोड लागतात त्याप्रमाणेंच निर्गुणापेक्षां सगुणाची गोडी अधिक आहे. मन, वाचा व बुद्धि यांना निर्गुणाचा बोध होत नाहीं, शास्त्रांना निर्गुणाची खूण कळत नाहीं व वेदांना सुद्धां त्यापुढें हात टेंकावे लागतात ! दोन्ही हातांच्या वावेंत वायूला जसें पकडतां येणें शक्य नाहीं, आकाश खेवेंत ( मिठींत ) सांपडणें जसें शक्य नाहीं, त्याप्रमाणें वेदशास्त्रांच्या साह्यानें सुद्धां निर्गुण परमात्मा बुद्धि, वाचा व मन यांना गोचर होणें कदापि शक्य नाहीं ! पण तशी सगुणमूर्तीची गोष्ट नाहीं. ती सुलभ आहे व सुलक्षण आहे. सगुणाचें दर्शन होतांच भूकतहान हरपते व मन प्रेमयुक्त होतें. परमात्मा नित्यशुद्ध आहे, सच्चिदानंदरूप आहे, सगुण आहे, मनोहर आहे, इंद्रियांना वेध लावणारा आहे, आनंदाचा कंद आहे, व लीलावतारी आहे. धैर्य, वीर्य, औदार्य, गुणगांभीर्य, शौर्य इत्यादि गुणांना तो आधार आहे. तो सगुण व साकार असल्यामुळें हे गुण त्याच्या आश्रयानें राहतात, व मानवांना त्याच्या सगुण मूर्तीमुळें या गुणांची ओळख होते ! मूर्तीचें दर्शन झाल्यावर योगयागादिकांची आटाटी करण्याचें व गिरिकंदरें हुडकण्याचें बिलकूल कारण नाहीं. एक दीप हातीं घेतल्यावर जसा साऱ्या घरभर प्रकाश पसरतो, त्याप्रमाणें त्याच्या सगुणमूर्तीचें ध्यान करूं लागलें म्हणजे अवघें ब्रह्मस्वरूप होतें. याप्रमाणें विचार केल्यावर स्पष्ट बोध होतो कीं, सगुण व निर्गुण दोन्ही एक आहेत; तथापि सगुणोपासनेनें ब्रह्मप्राप्ति होऊन शिवाय भगवंताच्या गुणांची ओळख होऊन त्याविषयीं अनिवार प्रेम उत्पन्न होतें."

६. ज्ञानेश्वरमहाराजांनीं या विषयाचा निवाडा बाराव्या अध्यायाच्या टीकेंत केला आहे. ‘ तरी व्यक्त आणि अव्यक्त । हें तूंचि एक निभ्रांत’ असा प्रारंभ करून ‘अव्यक्ता हि गतिर्दुःखं’ या चरणाच्या-टीकेंत त्यांनीं आपला अभिप्राय स्पष्ट सांगितला आहे:—“ बोचऱ्यानें लोहाचे चणे खाल्ले तर दांत पडून तो जसा व्यर्थ दांतरा मात्र होईल, किंवा समुद्र तरण्याची प्रतिज्ञा करून समुद्रांत उडी घालणारा बुडून जसा प्राणांस मुकेल, त्याप्रमाणें देहवंत जीवाची अव्यक्तीं गति होते. सर्वेंद्रियांसहित परमेश्वराच्या सगुणमूर्तींच्या ठिकाणीं प्रेमभावाच्या पडिभरानें चित्त अहोरात्र ठेवणारे भक्तच परमात्म्याला अत्यंत प्रिय आहेत. अमृताच्या सागराचें जें सामर्थ्य तेंच अमृतलहरीच्या एका चुळींत आहे, किंवा शेरभर सोन्याच्या लगडीला जो कस आहे तोच कस एक वालभर सोन्यास आहे, त्याप्रमाणें ‘ एकदेशिया व्यापका । सरसा पाडू” म्हणजे अव्यक्त व व्यक्त किंवा निर्गुण व सगुण यांची योग्यता तुल्य आहे.” सगुण व निर्गुण यांची योग्यता जरी सारखी आहे, तरी निर्गुणाची उपासना अत्यंत दुर्घट आहे; निदान अर्वाचीन काळच्या सुधारणाचक्रांत सांपडलेल्या आम्हां जीवांना तर सर्वथैव दुरापास्तच आहे. हिमाचलाच्या विस्तीर्ण, निरामय व प्रशांत प्रदेशांत निरंतर वास करणाऱ्या मुनीश्वरांना निर्गुणप्राप्ति सुसाध्य असेल, पण संसाराटवींत वणवण करीत हिंडणाऱ्या व २४ तासांत अनंत वृत्तींच्या तरंगांशीं झगडत राहणाऱ्या आम्हांसारख्या संसारी जीवांना तरी ती परम कष्टसाध्य आहे. वेदकाळींही सगुणोपासना होती. वरुण, इंद्र, उषा, सूर्य वगैरे सर्व एका परमात्म्याच्या व्यक्त मूर्ति आहेत, अशाच भावनेनें वेदकाळीं आमचे पूर्वज त्यांची उपासना करीत होते. अव्यक्तांतून व्यक्त निघालें आहे व व्यक्तांतूनच अव्यक्ताकडे जायला पाहिजे आहे. आकाशापासून वायु, वायूपासून अग्नि,अग्निपासून आप,आपापासून पृथ्वी, पृथ्वीपासून औषधी, औषधीपासून संतती, अशी विश्वाची उत्पत्तिपरंपरा-आपल्या श्रुतिशास्त्रांनीं व संतांनीं सांगितली आहे.संहारपरंपरा अर्थात् उलट क्रमानें होते.पृथ्वीचा लय आपांत,आपाचा अग्नींत, अग्नींचा वायूंत,व वा-

अचा आकाशांत. हा उत्पत्तिलयाचा प्रकार क्रमाक्रमानें होतो. ही गोष्ट सर्वसंमत आहे. जें अरूप होतें तें रूपास आलें आहे, व रूपाच्या एकनिष्ठ चिंतनानें अरूपांतच पुन्हा जाऊन मिसळायचें आहे,त्यांतच तें आहे. सगुणरूप परिच्छिन्न व नश्वर आहे व परिच्छिन्न वस्तूचें ध्यान करून काय होणार असें निर्गुणवादी म्हणतील; पण मन, बुद्धि, व वाचा याच आपल्या अगोदर परिच्छिन्न आहेत, मग या अपरिच्छिन्न वस्तूचें ध्यान तरी कशा करूं शकतील ? म्हणजे सगुणाचें ध्यान करावें, सगुणाचे गुण गावे, सगुणाच्या लीला वर्णाव्यात व ऐकाव्यात, सगुणाशीं पूर्ण तादात्म्य पावावें, म्हणजे धारणाशक्ति जसजशी वाढत जाईल तसतसें अवघेंच चैतन्य आतुडेल ! " आत्मस्थितिभाव, देवा ! मला नका हो देऊं. तुम्ही देव आणि मी तुमचा भक्त अशीच स्थिति नेहमीं राहूं द्या" असें तुकोबा काकुळतीनें देवापाशीं मागतात. सर्व भक्त अखेर निर्गुणपदाला पोंहचतातच,पण सगुणप्रेमा त्यांच्या ठिकाणीं अलोट असतो.

७ सगुणोपासना दोन प्रकारची आहे. हें विश्वमंदिर परमेश्वराची सगुणमूर्तिच आहे.जो हा विश्वाचा बाह्य डोलारा उभारला आहे त्याच्याकडे दृष्टि ठेवून परमात्म्याची उपासना करणें हा सगुणोपासनेचा एक प्रकार, व परमेश्वरानें युगायुगाच्या ठायीं जे अवतार घेतले त्यांची प्रतीकद्वारां उपासना हा दुसरा प्रकार.

---

## लेखांक ३.

८ मागील लेखांकांत सगुण व निर्गुण यांचा निवाडा केला, व सगुणोपासनाच जीवांना कशी सुसाध्य आहे हें दाखविलें. या लेखांत सगुणोपासनेचे दोन प्रकार कोणते आहेत तें अंमळ विशद करून दाखवावयाचें आहे. परमात्माच जगद्रूपानें नटलेला असल्यामुळें ह्या विश्वमंदिरांत स्थित झालेल्या व अनंतरूपानें प्रतीत होणाऱ्या परमात्म्याची उपासना करणें हा एक प्रकार; व साधूंच्या परित्राणासाठीं, दुष्टांच्या विनाशासाठीं व धर्माच्या संरक्षणासाठीं भगवंतानें वेळोवेळीं जे अवतार घेतले त्यांपैकीं एकाची किंवा अनेकांची परमात्मभावानें उपासना करणें हा दुसरा

प्रकार. आमच्याकडे दोन्हीं प्रकारांनीं परमात्म्याची उपासना करण्याचा प्रघात आहे. कोणत्याही रूपानें व पद्धतीनें परमेश्वरास भजलें तथापि तो विश्वात्मा एकीएक असल्यामुळें 'सर्वदेवनमस्कारः केशवं प्रति गच्छति' याप्रमाणें त्यालाच ती उपासना पोंचते.

९ प्रथम सगुणोपासनेचा जो पहिला प्रकार सांगितला त्याचा आधीं विचार करूं. परमात्मा व दृश्य सृष्टि म्हणजे प्रपंच यांमध्यें भिन्नता नाहीं. हा वाढलेला प्रपंच ईश्वराचेंच अभिव्यक्त स्वरूप आहे ! नाथांनीं भागवतांत सांगितलें आहे:—

**जगाचें मूळकारण । अंगें ईश्वरचि आपण ।**
**त्या कारणाहूनि कार्य भिन्न । नव्हे जाण सर्वथा ॥ १ ॥**
**हां कां घृताची एके काळीं । थिजोनि झाली पुतळी ।**
**ते घृताहोनि वेगळी । नाहीं देखिली प्रत्यक्ष ॥ २ ॥**
**सुवर्णाचें झालें लेणें । तें जावें मिरवे सोनेपणें ।**
**तेवीं महाभूतें-विषय करणें । अभिन्नपणें शिवरूप ॥ ३ ॥**
**मृत्तिकेचीं गोकुळें केलीं । नानानामाकारें पूजिलीं ।**
**परी ते मृत्तिकाचि संचली । तेवीं सृष्टि झाली मद्रूपें ॥ ४ ॥**
**जेवीं सूक्ष्म वटबीज केवळ । त्यासी मीनल्या भूमिजळ ।**
**वाढोनियां अतिप्रबळ । वृक्ष विशाळ आभासे ॥ ५ ॥**
**तेथें नामरूप पुष्प फळ । तें बीजचि आभासे समूळ ।**
**तेवीं जगदाकारें सकळ । भासे केवळ चिदात्मा ॥ ६ ॥**

श्रीएकनाथमहाराजांनीं याप्रमाणें या विषयाचें उत्कृष्ट विवरण ( भागवत अ. १२ ) केलें आहे. त्यांनीं तंतु आणि वस्त्र यांचा पुढें दृष्टांत देऊन " सुतावेगळें वस्त्र न दिसे । मजवेगळा प्रपंच नसे' असें सिद्ध करून दाखविलें आहे. संपूर्ण जग चिद्रूप आहे हें पाहणें व सर्वकाळ हें देखणेपण कायम ठेवणें हा सगुणाची उपासना करण्याचा पहिला प्रकार होय. जें जें भूत आढळतें तें तें भगवत्स्वरूप आहे असें नित्य भावलें मात्र पाहिजे. हें भावावला लागलें म्हणजे जिकडे जिकडे पाहावें तिकडे तिकडे भगवत्स्वरूपावांचून अन्य कांहीं दिसणारच नाहीं. स्नान होतांक्षणींच शरीरशुद्धि होते, व

पूजासंभार पुढें मांडून यथाविधि पूजा करावयास बसण्यापूर्वींचा जो काळ वस्त्रपरिधान करण्यांत जातो त्या काळांत हीच भावना उत्पन्न व्हावी म्हणून ‘ पुरुषसूक्त ’ म्हणण्याचा परिपाठ पडला आहे. ‘ सहस्र-शीर्षा पुरुषः सहस्राक्षः सहस्रपात् । स भूमिं विश्वतो वृत्वात्यतिष्ठद्दशांगुलम् ’ ब्रह्मांडांत कोट्यवधि प्राणी आहेत त्यांचे अनंत पाय, अनंत डोळे, अनंत मस्तकें हीं सर्व एका परमात्म्याचींच आहेत. सहस्र ह्म० केवळ हजार नव्हे, तर अनंत. पुरुषाला सहस्र शीर्षें आहेत ह्म० जेवढे जेवढे शीर्षवंत प्राणी आहेत तेवढे तेवढे परमात्म्याचेच देह आहेत. जारज, अंडज, स्वेदज व उद्भिज या चार प्राणि-कोटी आहेत. या प्राणिकोटींतील जेवढीं डोकीं तेवढीं परमा-त्म्याचीं, जेवढे हात तेवढे परमात्म्याचे, जेवढे पाय तेवढे परमात्म्याचे, जेवढे डोळे तेवढे परमात्म्याचे! केवढी उदात्त व उन्नत भावना ही ! किती पवित्र व किती श्रेष्ठ ! “ ब्राह्मणोस्य मुखमासीद्बाहू राजन्यः कृतः । ऊरू तदस्य यद्वैश्यः पद्भ्यां शूद्रोभिजायत. ” चारही वर्णांचे जीव एकाच परमात्म्याचे अवयव आहेत. हें परमपुरुषाचें सूक्त अर्थ मनांत आणून म्हणणाऱ्याच्या मनांत किती पवित्र व उदात्त भावना येतात व सर्व ब्रह्मांड एकाच परमात्म्याचें एकरूप आहे अशी एकात्मतेची भावना दृढ होऊन किती उच्चतम आनंदाचा अनुभव येतो ! ‘ जें जें देखे भूत । तें तें मानिजे भगवंत ’ असा भाव या प्रकारानें मनांत बिंबत जातो. दुसरें उदाहरण. हेंच तत्व बिंबण्यासाठीं सृष्टींत पवित्र, सुंदर व श्रेष्ठ जेवढ्या जेवढ्या वस्तु आहेत तेवढ्या तेवढ्या आमच्या धर्मानें उपास-नार्ह ठरविल्या आहेत. सूर्याची उपासना याच प्रकारची. नानाप्रकारचे वृक्ष, गाई इत्यादि पशु, गरुड इत्यादि पक्षी, मारुति इत्यादि वानर, अनेक प्राणिकोटींतले अनेक श्रेष्ठ जीव—त्यांच्या त्यांच्या त्या त्या गुणा-स्तव पूजार्ह ठरविले आहेत. ह्या अनेकांत एकपण पाहतां यावें हा या सर्वांच्या पूजेचा हेतु आहे. श्रीमद्भगवद्गीतेच्या १० व्या अध्यायांत भग-वंतांनीं विभूतिविस्तारयोग सांगितला आहे त्याचें तरी रहस्य हेंच आहे. सर्व आदित्यांत, नक्षत्रांत, वेदांत, अक्षरांत, इंद्रियांत, पशूंत, मनुष्यांत,

वृक्षांत, जलचरांत सर्वत्र एक परमात्मा सर्व भूतांच्या हृदयांत बीजरूपानें वास करीत आहे; आणि सर्वभूताशयस्थित' आत्मा एकच आहे, अज व अव्यय आहे, हें प्रथम बुद्धीला कळून नंतर भगवत्प्रसादानें नित्य अनुभवाला यावें असा या उपासनेचा हेतु आहे. समदृष्टि, भूतदया, वगैरे सर्व सद्गुण या एका भावनेच्या पोटांत आहेत व 'एकमेवाद्वितीयं ब्रह्म' या अद्वैतपर सिद्धांताची प्रतीतिही या दिसायला द्वैतपर अशा सगुणोपासनेपासूनच येत असते. जीवपरमात्म्यांची एकात्मता हाच उपासनेचा उत्कर्ष आहे. जीवानें परमात्म्याचें ध्यान करितां करितां भगवत्स्वरूप होऊन रहावयाचें आहे. द्वैतपणा प्रेमलक्षणाभक्तींत परमसुखाला कारणीभूत होतो; म्हणूनच तुकोबा प्रेमातिशयाच्या आनंदांत येऊन:—

**नको ब्रह्मज्ञान आत्मास्थितिभाव। मी भक्त तूं देव ऐसें करीं॥ १॥**

असें म्हणतात. सगुणभक्ति व अद्वैत तत्वज्ञान यांचा उत्कृष्ट मिलाफ आमच्या धर्मानें केला आहे. समर्थ म्हणतात—

**विभक्तपणें राहावें। आणि भक्तचि म्हणावें!।**
**हें अवघेंचि जाणावें। विलक्षण! ॥ १॥**

तुकोबांचेही स्वानुभवाचे उद्गार 'गोडीपणें जैसा गूळ। तैसा देव झाला सकळ' असेच आहेत.

१० असो. तर विश्वात्मक देवाची प्रतीति यावी असा सगुणोपासनेचा हेतु पुरुषसूक्त, विभूतिविस्तारयोग वगैरे प्रकारांवरून स्पष्टच दिसत आहे. सर्व विभूति भगवद्रूपच आहेत, तरी पण ध्याननिष्ठेसाठीं उपासकानें एकाच विभूतीची सर्वात्मभावानें पूजा केली कीं ती परमात्म्यालाच पावते यांत संशय नाहीं. सूर्योपासक, गाणपत्य, शैव, वैष्णव, फार काय पण गाईची, वडाची, व नदीची पूजा करणारे लोकही ईश्वराचीच पूजा करितात. मूर्तिपूजेवर करडी नजर ठेवणारे परधर्मी लोक किंवा आमच्यांतले समाजिष्ट वगैरे सुधारक चूक करितात ती हें न समजल्यामुळें होय. तुळशीची पूजा करणाऱ्या बायकोच्या कंबरेंत लाथ मारून तुळस उपटून टाकणारे फाजील सुधारकवीर २५।३० वर्षांमागें

इकडे झाले होते म्हणतात ! सध्यां तरी 'मूर्ख वेडी तुळशीची पूजा करिते व तिला त्यापासुन समाधान वाटतें तर करीना बिचारी ' अशी उपेक्षा-बुद्धिच बाळगणारे पंडित फार आहेत; पण त्या वेडीला पूजामार्गी-तलें रहस्य सांगून शहाणी करणारे पति मात्र दुर्मिळ आहेत ! स्त्रीशि-क्षणाच्या नांवानें आमचे लोक नुस्ती ओरड करीत आहेत व लौकिकांत त्याचा डांगोरा पिटण्यांत चूर झाले आहेत; पण खरी आस्था फारशी दिसत नाहीं. स्त्रीच्या आध्यात्मिक उन्नतीची कळकळ बाळगणारे पति विरळ आहेत. स्त्रिया तुळशीची पूजा करितात, पण तुळस ही राधा म्ह० ' भगवदाराधना करणारी प्रेमवृत्ति ' आहे हें स्त्रीला सांगून तिच्या श्रद्धाभावाला योग्य वळण लावणें हें पतीचें काम नाहीं काय ? तुळस काय, वड काय किंवा कोणतीही मूर्ति काय,आपला प्रेमभाव वाढविण्या-ला साह्यभूत होणारी आहे. वटपूर्णिमेला स्त्रिया वडाची पूजा करितात तिचा तरी हेतु काय ? वटवृक्षाखालीं सावित्रीनें आपल्या पतीला यमाच्या हातून सोडविलें ह्या पवित्र कथेचें स्त्रियांना स्मरण व्हावें, सावित्रीचें ध्यान लागावें व तिच्या पातिव्रत्यधर्माची त्यांच्या चित्ताला ओळख व्हावी हाच हेतु वटपूजेचा नाहीं काय ? वटवृक्ष हें उपलक्षण आहे. सर्व मूर्तींची गोष्ट अशीच आहे. आवाहन, विसर्जन सर्व सृष्ट पदार्थांना आहे. गणपतीच्या मूर्तीची प्राणप्रतिष्ठा करायची, म्हणजे तरी काय ? विसर्जन केव्हां व कसलें? तुकोबांनीं स्पष्ट सांगितलें आहे कीं,

**शिवपूजा शिवासि पावे । माति मातीशीं सामावे ! ॥**

हाच प्रकार सर्व मूर्तींच्या पूजेचा आहे. संध्याकाळीं दिवा लावतां-क्षणींच दिव्याला नमस्कार करायची जुनी सद्रीति आहे. हा नमस्कार त्या वातीला कां, समईला, कां तेलाला ? हा नमस्कार त्या तेजाला; अंधकाराला दूर करणाऱ्या, प्रकाश देणाऱ्या व आमचे व्यवहार चाल-विणाऱ्या तेजोमय परमात्म्याला आहे. मूर्ति हें एक प्रतीक आहे. न्या-सादि प्रकारांनीं देवतेची स्थापना करून ध्येयमूर्ति हृदयमंदिरांत ठेवा-यची व नंतर उद्वार्चन करायचें. आम्हीं मूर्तिद्वारें परमात्म्याचीच पूजा करितों. भगवंताची मूर्ति पाहतांच भाविकाला प्रेमपान्हा फुटतो व अभाग्याला कंटाळा येतो ! समर्थ सांगतातचः—

**जगीं पाहतां सर्वही कोंदलेंसे । अभाग्या नरा दृढ पाषाण भासे ॥**

११ सगुणोपासनेचा दुसरा प्रकार म्हणजे ईश्वराच्या अवतारांची उपासना. हे अवतार दहा आहेत, चोवीस आहेत, अनंत आहेत. जगांत जेव्हां जेव्हां अधर्म होतो, तेव्हां तेव्हां भक्तरक्षणासाठीं देव अवतार घेतो व जगाला मार्ग दाखवून देतो. ज्या ज्या संपत्तिदयायुक्त विभूति आहेत त्यांच्या द्वारें परमेश्वराची सारी उपासना होते. अशा विभूति आजवर अमित झाल्या आहेत.

**आंगींचिया रोमा किती । जयांचिया तयासीं न गणवती॥**
**तैसिया माझिया विभूति । असंख्य मज ॥ ज्ञाने. १०–२१०.**

श्रीदत्त, श्रीराम, श्रीकृष्ण,—ज्या ज्या अवताराच्या ठिकाणीं ज्याची ज्याची स्वभावधर्मानुरूप श्रद्धा बसेल त्या त्या अवताराची अविरुद्धभावानें त्यानें उपासना करावी म्हणजे ती परमात्म्याला पावते. देव बाह्यरूपाकडे व उपचाराकडे पाहत नाहीं, भावाकडे पाहतो.

---

# ५ आत्मतृप्ताचे ढेंकर

पंतांचे समकालीन महाराष्ट्रकवि निरंजन माधव हे मोठे राजयोगी व भगवद्भक्त होते. त्यांच्या कवितेचीं अस्सल बाडें चाळीत असतां पुढील गोड स्फुटें आम्हांस आढळलीं.

**अद्वैतबोध घडला बरवा मनाला ।**
**तो काय मी कथिन बाह्यमुखी जनाला ?।**
**विश्वास ज्यासि न वसे गुरुतत्वबोधीं**
**थिद्वस्तु जें परम त्याप्रति कोण बोधी ? ॥ १ ॥**
**श्रीसज्जनांघ्रिकमळीं नत जो घडेना**
**त्याला कदापि गुरुतत्व दिठी पडेना ! ।**
**जो साधुसंग धरि त्यासचि लाभ होतो,**
**चित्सार सेवुनि निरंतर तृप्त हो तो ! ॥ २ ॥**
**अतितर परमार्थी वेधलें चित्त ज्याचें**
**तरिच सफळ झालें जन्म या मानवाचें ।**
**त्यजुनि सकळ दृश्याभास आत्माक्षि डोळां**
**निरखिल तरि जीवन्मुक्त तो साच झाला ॥ ३ ॥**

---

# ६ घंटा.

**आगमार्थं तु देवानां गमनार्थं तु रक्षसाम् ।**
**कुरु घंटे! रवं तत्र देवताव्हानलक्षणम् ॥ १ ॥**

१. आपण देवपूजाप्रसंगीं घंटेची पूजा करून घंटानाद करितों, देवताव्हान करून तिची उपासना करितों, व देवतेचा प्रसाद मागून घेऊन तिची हृदयांत स्थापना करून नंतर विसर्जन करितों, हें सर्वांस माहीत आहेच. देवतेचें वास्तव्य वस्तुतः हृदयांतच आहे. भक्तिभावाचें उद्दीपन करून हृदयकमलर्लिंगाची उपासना करणें हीच खरी देवपूजा आहे! पण अंतःस्थ परमात्म्याची मानसिक पूजा सहज करितां येत नाहीं, म्हणून बाह्यलक्षणें अवश्य आहेत. भगवंताची सगुणमूर्ति पुढें पाहिजे, तिचें यथाविधि पूजन केलें पाहिजे, धूपदीपगंधाक्षता नैवेद्य वगैरे सर्व यथासांग केलें पाहिजे. चित्तशुद्धीला कर्ममार्गाची फार जरूरी आहे. त्याचा उच्छेद जाणत्यानेंही करणें योग्य नाहीं, नेणत्याचें तर त्यावांचून पाऊलच पुढें पडणार नाहीं. पण कर्म करितांना हृदयांत भगवद्भक्तीचा ओलावा पाहिजे. अंतर्वृत्ति भगवत्प्रेमानें निरंतर आर्द्र असावी. प्रेमवृत्तीची जोपासना प्रत्येकानें करावी. आपल्या शास्त्रांत सांगितलेलीं व सुजनांनीं आचारांत आणलेलीं सर्व कर्में भगवत्प्रीतीसाठींच करावयाचीं असतात. अभिषेकपात्रांत वारंवार गंगाजल घालीत असतांना व अभिषेकाचे मंत्र, पुरुषसूक्त, पवमान, रुद्र वगैरे म्हणत असतांना 'प्रेम अमृताची धार। वाहे देवाही समोर' ही भावना निरंतर ठेवावी! आपली आचारपद्धती फारच उत्कृष्ट आहे. असो. आज 'घंटानादा' ची थोडीशी उपपत्ति सांगावयाची आहे.

२. प्रत्येकाच्या घरीं देव्हाऱ्यांत 'घंटा' असतेच, तिला गंधपुष्प वाहून तिची पूजाअर्चाही सर्वजण करीतच असतात, व ती प्रथम वाजवितांना 'आगमार्थं' हा मंत्रही सर्वजण म्हणतात. पण देवपूजाप्रसंगीं घंटा वाजवितांना जी भावना पाहिजे असते तिच्याकडे सर्वांचें लक्ष जावें म्हणून हा लेख आज लिहीत आहें.

३. घंटेच्या आकारावरूनही विचार करितां आपणांस समजून येईल कीं, घंटा ही तोंडाचें अगर जिव्हेचें एक उपलक्षण आहे! घंटेच्या मधोमध जशी एक लोळी असते, तशीच आपली जिव्हा ही आपल्या तोंडामध्यें मागेंपुढें वळवळ करीत असते! आपल्या बोलण्याचालण्यांतही जिव्हा व घंटा यांचा परस्परसंबंध आहे असें आपण दाखवीत असतों. एखादा मनुष्य फार बडबड्या असला कीं ' ही घंटा आली ' असें आपण पुष्कळदां विनोदानें म्हणतों—नाशिक येथें गोदातीरीं पेशवाईतले प्रसिद्ध वीर नारो शंकर यांनीं एक शंकराचें देऊळ बांधलें आहे. त्या देवळावर एक भली भक्कम अजस्र घंटा बांधली आहे. तिला ' नारो शंकरी ' घांट म्हणतात; ती एवढी मोठी आहे कीं, तिचा लोळा मागें पुढें हलवायला थोडेसे श्रमच घ्यावे लागतात ! त्या घंटेवरून एखादा कर्कश व मोठ्या स्वरानें बोलणारा व आपल्या बोलण्यानें लोकांच्या कानठाळ्या बसविणारा बहुभाष असला कीं, त्याला ' नारोशंकरी घांट ' असें थट्टेनें म्हणण्याचा प्रघातही आहे! इंग्लंडांत एडमंड बर्क नामक प्रसिद्ध मुत्सद्दी व वक्ता होऊन गेला. तो ठिकठिकाणची माहिती मोठ्या परिश्रमानें मिळवून आणी व पार्लमेंट सभेंत बोलूं लागला कीं, कागदपत्रांचीं पुडकींच्या पुडकीं खिशांतून काढी. बर्कची माहिती विलक्षण, वक्तृत्व लोकोत्तर व आवाज खणखणीत, यामुळें स्वारी एखाद्या विषयावर बोलूं लागली कीं, तासचे तास सारखी बोलत उभी राहायची ! त्यामुळें शेवटीं शेवटीं त्याच्या भाषणप्रसंगीं अखेरपर्यंत बसण्याचा धीर बहुतेकांस नसल्यामुळें एकामागून एक मंडळी पार्लमेंटसभास्थान सोडून चालती व्हावयाची. एडमंड बर्क बोलायला उठला कीं, ही " जेवायला जायची घांट वाजली" असें पुढें पुढें लोक म्हणूं लागले ! !

४. घंटा म्हणजे वस्तुतः आपली रसना किंवा जिव्हा होय ! लोखंडाची, पितळेची, किंवा चांदीची घंटा हजार वर्षें कोट वेळ नुस्ती भक्तिभावावांचून वाजवीत राहिल्यानें देवतेची प्राप्ति थोडीच होणार आहे ! "देवांचें आगमन व्हावें. राक्षसांनीं गमन करावें. व इष्ट देव-

तेचा साक्षात्कार व्हावा" अशी ज्याची मनापासून इच्छा असेल, त्यानें रसनारूपी घंटा निर्लज्जपणानें पण प्रेमभरानें निरंतर वाजवीत राहिलें पाहिजे ! ज्ञानोबारायांनीं सांगितलेंच आहे:—

**न सोडी रे भावो टाकी रे संदेहो ।**
**रामकृष्णीं टाहो नित्य फोडीं ॥ १ ॥**

रामकृष्णनामाचा निरंतर टाहो फोडणें म्हणजेच घंटा वाजविणें होय. ही घंटा वाजूं लागली, रामकृष्णनामाचा नाद देवघरांत किंवा मंदिरांत सारखा घुमूं लागला, म्हणजे देवाचें आगमन होतें व राक्षस दूर पळून जातात. दान, दम, शम, स्वाध्याय, तप, आर्जव, अक्रोध, सत्य, त्याग, मार्दव, तेज, क्षमा, धृति, शौच, वगैरे दैवी संपत्तीचे गुण, सात्विक अष्टभाव, सत्वविकार इत्यादि सर्व जे देव आहेत त्यांचा हृदयमंदिरांत आविर्भाव होतो; व देवांचा आविर्भाव होऊं लागला कीं दंभ, दर्प, अभिमान, क्रोध, अज्ञान, नास्तिकपणा, देहाहंकार, काम, लोभ, मोह वगैरे सर्व राक्षस आपापल्या परिवारांसह तात्काळ दूर होतात ! देव आणि दैत्य, सद्विकार आणि असद्विकार, सद्वृत्ति आणि असद्वृत्ति यांचें हाडवैर पुराणप्रसिद्ध आहे. प्रकाश आणि अंधार याप्रमाणें त्यांचा एकत्रवास होणें शक्य नाहीं. असद्वृत्ति नष्ट व्हाव्यात व सद्वृत्तींचा विकास व्हावा असें प्रत्येक मुमुक्षूस वाटत असतें, व ज्याला ज्याला असें वाटतें तो तो घंटा बडवूं लागतो. घंटेचा आवाज जितका मोठा तितक्या या वृत्ति खडबडून जाग्या होतात, म्हणूनच ज्ञानोबारायांनीं ‘ रामकृष्णीं टाहो नित्य फोडीं ’ म्हणून सांगितलें आहे. रामकृष्णनामाचा जयघोष सुरू झाला कीं, राक्षस क्षणभरही तेथें राहणार नाहींत ! देवांचे समुदाय तेथें जमतील. या घंटेचा नाद देवांना अत्यंत प्रिय आहे. घंटानादानें देवांचें आगमन झालें कीं सर्व देव इष्ट देवतेपाशीं भजकाची वकीली करितात, व मग त्या देवतेला साक्षात् प्रकट व्हावें लागतें ! ज्या भावानें, ज्या स्वरूपानें, परमेश्वराला आळवावें, त्या स्वरूपानें तो प्रगट होतो. इष्टदेवता कोणतीही असो, ‘ सर्वदेवनमस्कारः केशवं प्रतिगच्छति ’ हेंच सर्वथैव खरें आहे. पंढरपुरासारख्या क्षेत्राच्या ठिकाणीं हजारों मनुष्यांच्या तोंडांतील घंटा

विठ्ठलनामाचा जेव्हां गरजून जयघोष करितात, तेव्हां सर्व त्रिभुवनांतले देव त्या ठिकाणीं प्राप्त होतात; व तेही आनंदभरानें भगवन्नाम गावूं लागतात, मग त्या देवांच्या मेळांत सर्वव्यापी सच्चिदानंद परमात्मा साक्षात् प्रकट होतो, यदर्थीं संशय नाहीं.

५. अशा या घंटेचा नित्य नाद करावा. हा कोणीही, केव्हांही, कोठेंही केला तरी चालतो. नामदेव म्हणतात:—

**काळवेळ नसे नामसंकीर्तनीं । उंचनीच योनी हेंही नसे ॥ १ ॥**
**धरा नाम कंठीं सदासर्वकाळ । मग तो गोपाळ सांभाळील ॥२॥**
**कृपाळू कोंवसा सुखाचा सागर । करील उद्धार भाविकांसी ॥ ३ ॥**
**नामा म्हणे फार सोपें हें साधन । वाचे नाम घेणें इतुकेंची ॥४॥**

६. ईश्वरप्राप्ति करून देणारी ही आपल्या तोंडांतली घंटा पूजार्ह आहे हें यावरून ठरतें. म्हणून मोठमोठ्या साधुसंतांनीं आपल्या रसनारूपी घंटेची विनवणी केली आहे कीं 'बाई गे! बेडूक किंवा कुत्रा जसा व्यर्थ ओरडत रहातो, तशी तूं सकाळपासून संध्याकाळपर्यंत प्रपंचांतल्या वायफळ गोष्टी बोलण्यांतच आपला काळ घालवूं नकोस, तर भगवन्नामस्मरणांत रम, तेथेंच स्थिर हो, म्हणजे तुझ्या श्रमाचें व आमच्या जन्माचें सार्थक होईल.' श्रीसमर्थ रामदास म्हणतात:—

**जिव्हे! रसज्ञे! जठरार्थ कैसी । नृत्यांगना होउनि नाचतेसी ।**
**वृथा च तूं वो! श्रम पावतेसी । यालागिं भावें जप राघवासी ॥ १ ॥**

वामनपंडित म्हणतात:—

**हे रसने! तुज वीनवितों कर जोडुनि एक विनंति करीं ।**
**सर्व अमान्य जगत्त्रयदुर्गुण काढुनि होउं नको अखरी ।**
**मौन्यरुपें क्रमुं काळ कसा म्हणसी तरि निश्चळ ध्यान धरी ।**
**श्रीशिव शंभुदयार्णव केशव माधव कृष्ण मुकुंद हरी ॥**

तुकोबा म्हणतात:—

**मुखीं नाम हातीं मोक्ष। ऐसी साक्ष बहुतांसी ॥**

अथवा हा दुसऱ्यांचा दिलेला हवाला कोणाला पटत नसेल तर:—

**तुका ह्मणे रामनामीं । कृतकृत्य झालों आम्हीं ॥ १ ॥**

———

# ७ पाडव्याची राष्ट्रीय प्रार्थना.



१. श्री रामकृपेनें आज नूतन वर्षारंभ झाला आहे. लोक देवाला मंगलस्नानें घालीत आहेत, श्रीरामजन्मोत्सवाप्रीत्यर्थ रामायणाचे सप्ताह जागोजाग बसले आहेत, व लोकांनीं गुढ्यातोरणें उभारून या नूतन संवत्सराचा जयजयकार आरंभिला आहे.

२. गुढ्या उभारण्यालाच 'इंद्रध्वजोत्सव' म्हणतात. वेळूची किंवा वेणूची जी काठी उभारावयाची तिला 'इंद्रध्वज' म्हणतात. क्षत्रियांनीं हा उत्सव केला म्हणजे त्यांना राज्यलाभ होतो, व प्रजाजनांना—राष्ट्राची अभिवृद्धि होऊन—ऐश्वर्यसुखाची प्राप्ति होते.

३. मनुष्य श्रीमंत असो वा दरिद्री असो, हा मंगलोत्सव हिंदुमात्रानें परमोल्हासानें करावा. हा उत्सव झाल्यानंतर नऊ दिवसांनींच श्रीरामरायाचा जन्म होतो.

**घेई वैणवी यष्टिकादंड। इंद्रकेतु नाम दृढ।**
**यांचेनि दर्शनें पूजनें वाढ। ऐश्वर्याचा नित्य नवा॥ १॥**
**हा संवत्सराचे आदि। इंद्रध्वज पुष्पगंधी।**
**इंद्रप्रीत्यर्थ पूजितां सिद्धी। राज्यलाभ क्षत्रियां॥ २॥**

हा मंगलोत्सव केला म्हणून काय होतें ? मुक्तेश्वर पुढें सांगतात:—

**हें दुःखदोषातीत भुवन। सदा सकाळीं वर्षे घन।**
**फळें धान्यें रत्न सुवर्ण। समान पिके धरित्री॥ ३॥**

४. हें नूतन वर्ष हिंदीराष्ट्राला सुखाचें, प्रगतीचें व भरभराटीचें जावो. ऐश्वर्याभिवृद्धिरस्तु, शांतिरस्तु, पुष्टिरस्तु, तुष्टिरस्तु.

५. भरतभूमींतल्या गंगायमुनानर्मदाकृष्णागोदावर्यादि पवित्र नद्या, व आमच्या गोमाता, क्षीरजळानें आह्मां सर्वांचें पोषण करोत. आह्मां हिंदी लोकांची गोब्राम्हण, संतमहंत,तीर्थक्षेत्रें याविषयींची श्रद्धाबुद्धि वाढून ईश्वरविषयक प्रेमा सर्व राष्ट्राच्या अंगीं खेळो. नास्तिक

असतील ते आस्तिक होवोत, पाखांडी असतील ते भाविक होवोत व सर्व हिंदी राष्ट्राचें ऐहिक व पारलौकिक कल्याण होवो.

६. आमचे आपसांतले कलह मिटून सर्व हिंदी लोक एकजुटीनें परमेश्वरावर निष्ठा ठेवून आमच्या भरतभूमीच्या उद्धारार्थ झटोत.

७. हिमालय, सह्याद्रि, विंध्य, गिरनार इत्यादि गिरिकुहरीं व गंगा, यमुना, नर्मदा, गोदा, कृष्णा, तुंगभद्रा, इत्यादि नद्यांच्या पवित्रतीरीं तपश्चर्या करणारे भगवद्रूप संत आमच्या राष्ट्रोद्धारार्थ चाललेल्या सर्व योग्य चळवळींना उत्तम यश देवोत. संत आपल्या आशीःप्रभावानें आम्हांस सनाथ करोतः—

**मागें जाले, आतां असती, होणार जे पुढें काय।**
**त्या भागवतांचे म्यां भावें साष्टांग वंदिले पाय ॥ १ ॥**

८. आमचे शेतकरी लोक सस्यसंपन्न होवोत; आमच्या उद्योगी व्यापारी वर्गाला, प्रामाणिक कारागीरवर्गाला, कामकरीवर्गाला, हरहुन्नर करणाऱ्या कलाकुशल लोकांना, ललितकलांचा अभ्यास व प्रगति करणाऱ्यांना सर्वांना हें वर्ष सुखाचें जावो. हिंदुस्थान देशांतलें धान्य व संपत्ति हिंदी लोकांच्या पूर्ण सुखसंतोषास प्रसवो. प्रजेच्या व हिंदीराष्ट्राच्या उन्नत्यर्थ राजे झटोत. सर्वत्र धनधान्यसमृद्धिरस्तु.

**सर्वेऽत्र सुखिनः सन्तु सर्वे सन्तु निरामयाः ।**
**सर्वे भद्राणि पश्यन्तु मा कश्चिद्दुःखमाप्नुयात्**

९. आमच्या राष्ट्राची पुण्यसंपत्ति, दानत व शील वाढो. आमच्या गोमातेचे सांप्रत अनन्वित हाल होत आहेत ते एकदम बंद होवोत. भरतभूमि गोधनानें संमृद्ध होवो. सर्व लोक गोसेवक होवोत.

१०. कश्यप, अत्रि, भरद्वाज, विश्वामित्र, गौतम, जमदग्नि, वसिष्ठ इत्यादि प्राचीन ऋषि व ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम, रामदास, चैतन्य, कबीर, तुळसीदास इत्यादि अर्वाचीन संत आपल्या कृपाकटाक्षानें आम्हांला पुनीत करोत.

११. अरुंधती, सावित्री, सीता, अंजनी, अनसूया, अहल्या, कौसल्या, मदालसा, कुंती, देवकी, रुक्मिणी इत्यादि महापतिव्रता

आमच्या स्त्रीवर्गावर अनुग्रह करोत, व आमचा स्त्रीवर्ग प्रज्ञावंत, मेधावंत, श्रद्धावंत, व वीर्यवंत अशा अपत्यांना प्रसवो.

१२. राणा संग, राणा प्रतापादित्य, महाराज विक्रमादित्य, छत्रपति शिवाजी, देवी अहल्याबाई, यांचे भरतभूमीवर पुन्हा अवतार होवोत, व देवधर्मगोब्राह्मण यांचें संरक्षण त्यांचें हातून होवो. ब्राह्मणवर्गांत मनस्वी, तपस्वी व समर्थांप्रमाणें राष्ट्रोद्धारार्थ आपलें आयुष्य खर्च करणारे राष्ट्रकुटुंबी महापुरुष निर्माण होवोत.

१३. कुटिलपणा, स्वार्थसाधुपणा, व हिंस्रकपणा, हे दोष दिगंतराला जावोत. प्रकाशाला दचकणाऱ्या सर्व पापांचा क्षय होवो.

१४. हिंदुधर्म, हिंदुशास्त्रें, हिंदुकला, हिंदुविद्या व हिंदुराष्ट्र यांचा सर्वत्र जयजयकार होवो. अहिंसा व सत्य यांचा लोकांत प्रसार होवो.

१५. हिंदी राष्ट्राला स्वराज्यसुख लाभून त्याची सत्कीर्ति जगावर पसरो व त्याचा जयजयकार होवो. सर्व राष्ट्र धर्मप्रवण होवो.

१६. भरतभूमीचा जयजयकार असो, भरतभूपुत्रांचा जयजयकार असो. भरतभूमिच्या उन्नत्यर्थ झगडणाऱ्या लहानथोर सज्जनांचा जयजयकार असो.

१७. आमचे देह, आमची बुद्धि, आमचें आयुष्य भरतभूमीच्या उद्धारार्थ खर्च होवो. विश्वभक्तींत विश्राम पावणाऱ्या स्वराष्ट्रभक्तीला आजच्या मंगल दिवशीं आम्हीं आपलें तनुमनधन—आम्हीं आपले दारा, सुत, गृह, प्राण, अर्पण करितों. राष्ट्राच्या विशाल सागरांत तरंगाप्रमाणें चमकणारें आमचें अस्तित्व आमच्या राष्ट्रकल्याणांत सफल होऊन ब्रह्मस्वरूपीं विरून विरघळून जावो.

१८. भरतखंडांत जें जें उत्तम होतें, आहे, व असणार तें तें अंशांशानें तरी आमच्यांत अवतरो.

१९ भगवंता ! तुझा हा देश जागा झाला आहे. पापाचा अंधार मावळत आहे, व अज्ञानाचें तिमिर जात आहे. संत व मुमुक्षु तुझ्या गुणांचें गान करून भरतभू पावन करीत आहेत. भावी ऐश्वर्याचा प्रभात झाला आहे. रामा ! जागा हो, डोळे उघड. तुझें मुखारविंद आम्हांला

डोळे भरून पाहूं दे. तूं येथें पुन्हा अवतार घे. व—

" **दुर्जनसंहार सज्जनां आधार। भाविकांसी पार पाववितो** "

ही आपली बिरुदावळी खरी करून दाखीव. पृथ्वीवर रामराज्य पसरो.

२०. सर्वत्र आनंदीआनंद असो. रामकृष्णहरीचा जयजयकार असो.

२१. श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या वाणीनें सर्व हिंदी राष्ट्राच्या तर्फेनें भगवंतापाशीं हें वरदान आम्ही मागतों:—

**आतां विश्वात्मकें देवें। येणे वाग्यज्ञें तोषावें।**
**तोषोनि मज द्यावें। पसायदान हें ॥ १ ॥**
**जे खळांची व्यंकटी सांडो। तयां सत्कर्मीं रती वाढो।**
**भूतां परस्परें जडो। मैत्र जीवांचें ॥ २ ॥**
**दुरितांचें तिमिर जावो। विश्व स्वधर्मसूर्यें पाहो।**
**जो जें वांछील तो तें लाहो। प्राणिजात ॥ ३ ॥**
**वर्षत सकळमंगळीं। ईश्वरनिष्ठांची मांदियाळी।**
**अनवरत भूतळीं। भेटो तयां भूतां ॥ ४ ॥**
**चलां कल्पतरूंचे अरव। चेतनां चिंतामणींचे गांव।**
**बोलते जे अर्णव। पीयूषाचे ॥ ५॥**
**चंद्रमे जे अलांच्छन। मार्तंड जे तापहीन।**
**ते सर्वांहीं सदा सज्जन। सोयरे होतु ॥ ६ ॥**
**किंबहुना सर्वसुखीं। पूर्ण होऊनि तिहीं लोकीं।**
**भजिजो आदिपुरुषीं। अखंडीत ॥ ७ ॥**

———

# ८ पाडव्याची रामप्रार्थना.



१ श्रीरामकृष्णकृपेनें हें नूतन वर्ष तुम्हां आम्हांस, आपल्या सर्व राष्ट्रास, व साऱ्या विश्वास सुखाचें, उन्नतीचें व ऐक्यप्रेमाचें जावो.

२ पाडव्यापासून सुरू होणारा पंधरवडा श्रीरामभक्तांस परम मंगल आहे. नऊ दिवस श्रीरामकथेचें चिंतन, रामायणाचें पारायण, नवमीला श्रीरामजन्मोत्सव व पूर्णिमेस परम रामभक्त श्रीमारुतिराय यांचा जन्मोत्सव अशा रीतीनें श्रीरामभक्तांच्या उत्कट भक्तीला भरती आणणारा हा पंधरवडा भरतखंडांत श्रीरामभक्तीचा उदय करो.

३. श्रीरामरायाचें मंगल चरित्र भारतीयांना आदर्शभूत आहेच. श्रीरामाची पितृभक्ति, गुरुभक्ति, बंधुप्रीति, प्रजावात्सल्य हा गुणसंघ आणि एकपत्नी एकबाणी व एकवचनी हें ब्रीद तुम्हां आम्हां सर्वांच्या हृदयांत विमल भावना उत्पन्न करो, आमच्या चारीत्र्याला उज्ज्वल करो, आमचीं अंतःकरणें श्रीरामभक्तीनें उचंबळोत, आमचा आयुष्यक्रम परमशुद्ध व अन्योन्यप्रेमपूर्ण करो.

४. श्रीसीतामाईचें दिव्य चरित्र भारतीय स्त्रिया कधींही न विसरोत सीतादेवीचा कित्ता गिरवण्याची त्यांची बुद्धि स्थिर राहो. त्यांचें अचल पतिप्रेम, विनयमधुर वर्तन, गुरुजनसेवा, अतिथीसत्कार, या गुणांचें अनुकरण सर्वत्र होवो.

५. पुरुषीस्त्रिया, आणि बायकीपुरुष यांचें वेडें पीक सध्यां येऊं पाहत आहे तें न पसरो.

६ परिस्थित्यनुसार स्वच्छंदाचार, स्वैरवर्तन, पूर्वजरींतीचा त्याग, कुलधर्माविषयीं अनास्था, वर्णसंकराची आवड, इ० दोष भारतीय समाजांत फैलावत चालले आहेत त्यांपासून भरतभूमीचें संरक्षण होवो. श्रीरामा! तुम्ही आपल्या चारित्र्याचें वेड पुरुष वर्गाला लावा! सीतामाई! तुम्ही आर्यस्त्रियांचें मंगल चारित्र्य सांभाळण्याची खबरदारी घ्या.

७ लक्ष्मणाची निष्काम रामभक्ति व भरताची निरपेक्ष राष्ट्रसेवा आणि रामचरणरति यांची आम्हांला, हे रामराया ! ओळख करून द्या. रामा ! रावणाला मारून आपण पुष्पक विमानांतून परत अयोध्येला आलांत तेव्हां नंदिग्रामीं ' भरत ' आपली आर्ततेनें वाट पहात होते. गाय वासराकडे ज्या प्रेमानें धांवते त्या प्रेमानें आपण भरतभेटीसाठीं सोत्कंठ धांवलांत तेव्हां—

**लेवऊनि पादुका पदाब्जयुग्म पाहिले**
**साधुनें तयावरि स्वशीर्ष–राज्य वाहिले ।**

भरतानें पादुका आपल्या पायांत घालायला दिल्या, व श्रीचरणाकडे सप्रेम पाहिले. त्या धीरोदार साधुपुरुषानें आपल्या पायांवर राज्य वाहून आपली निरपेक्ष प्रीति प्रगट केली आणि शीर्ष म्ह० मस्तक वाहून आपलें निरंतर दास्य मागितलें ! रामा ! ते वेळीं आपणही गहिंवरलांत—

**हुंगतां शिरीं दयासमुद्र अश्रु वर्षला**
**भेटला सुतास तात तेविं राम हर्षला ॥** ( मोरोपंत)

आपण दयासागर आहांत. आपण भरताचे मस्तक अवघ्राण केलेंत व सहर्ष होऊन त्यावर चार प्रेमाश्रु ढाळलेत. रामा ! त्यावेळीं भरताच्या हृदयांत जो कोमल, परमशुद्ध भाव व निरपेक्ष भक्ति आपल्या चरणांचें ठायीं होती त्या भक्तीचा एकच कण आम्हांला द्या.

८ रामा ! शबरीचीं उच्छिष्ट पण परमप्रेमानें अर्पण केलेलीं फळें आपण स्वीकारलींत आणि तिला परमार्थमार्ग दाखवून तारलेंत. आपण तिला सांगितलेंत कीं 'पुरुषपण, स्त्रीपण, किंवा जाति, नाम, आश्रम यांचा भक्तीशीं कांहीं संबंध नाहीं, केवळ निर्मळ प्रेम मला पुरें!' सत्संग, गुणसंकीर्तन, गुरुसेवा, पुण्याचरण, पूजन, नामस्मरण, भक्तसेवा, सर्वांभूतीं भगवद्भाव, वैराग्य आणि तत्वविचार यांचा क्रमानें अभ्यास करण्यास आपण शबरीला सांगितलें. आतां हे विषय शिकविणाऱ्या शाळा आमच्या महिलासमाजाला दाखवून द्या ! दुसरे निरुपयोगी विषय भाराभर त्यांच्या डोक्यांत कोंबणाऱ्या शाळा, जातिकुलधर्म सोडून स्वेच्छ वागण्यास शिकविणारीं मासिकें आणि पत्रें, स्त्रीस्वातं-

त्याच्या नांवाखालीं हव्या त्या पुरुषाशीं प्रणयाचें संधान बांधण्यास उत्तेजन देणारे पुरुष, व त्यांच्या उन्नतीच्या मिषानें स्वच्छंदाचार शिकविणारीं साधनें यांचा भरतखंडांत सुळसुळाट झालेला आपण पाहतांना ? हा स्त्रियांच्या उद्धाराचा मार्ग आहे काय ? समाजाची राखरांगोळी करण्याचे हे उपाय नाहींत काय ?

९. **रामा** ! आपल्या चरणांना वंदन असो. आपल्या चरणस्पर्शानें शिळा होऊन पडलेली अहल्या सचेतन होऊन उठली व आपल्याच गुणानुवादांत निमग्न झाली. रामा ! ही भरतभूमीही जड शिळाच होऊन पडली आहे, आपल्या चरणरजाचा तिला स्पर्श होऊन ती सचेतन होऊं द्या ! पापाचे पर्वत क्षणांत भस्म करण्याचें सामर्थ्य आपल्या चरणांत आहे. आपल्याला विसरल्यामुळें जडत्व पावलेली ही भरतभूमि आपल्या स्मरणाबरोबर सचेतन होईल. आपण तिला आपलें स्मरण द्या, आपल्या स्फूर्तीचा स्फुलिंग तिच्यांत चेतवा, आपल्या नवविध भक्तीचे प्रकार तिला शिकवा, अगर ते शिकविण्यास तुकोबानाथसमर्थांसारखे संत पाठवा. आम्ही त्यांवरही संतुष्ट राहूं. प्रकृतिवाद, नास्तिकवाद, उपयुक्ततावाद, समाजशासनवाद, इ० अनेक वादांची भरतभूमीला आजकाल बाधा झाल्यामुळें तिच्या ठिकाणीं जडत्व आलेलें आहे. हें जडत्व रामा ! आपल्या चैतन्यस्फूर्तीनें दूर करा. अज्ञाननिरसन केवळ ज्ञानानेंच होतें, भगवत्प्रसाद केवळ भक्तीनेंच होतो, त्याप्रमाणें जडत्वनिरसन केवळ चैतन्यस्फूर्तीनेंच होणार आहे. पूर्वकाळीं चैतन्यसंप्रदाय, नाथसंप्रदाय, स्वरूपसंप्रदाय आनंदसंप्रदाय, हे उत्पन्न झाले व त्यांतूनच नाथसंप्रदायी ज्ञानोबा–एकनाथ, चैतन्यसंप्रदायी तुकोबा, स्वरूपसंप्रदायी समर्थ इ० महंत अवतीर्ण झाले. हीं नांवें वेगळीं असलीं तरी हे सर्व संतसंप्रदाय चैतन्यस्फूर्तीनेंच उदय पावले. त्याप्रमाणेंच रामा! आतांही भरतभूमीचें जडत्व व शिळारूपत्व दूर करण्यास आपल्या चरणाचा तिला स्पर्श होऊं द्या. लोकांच्या चित्तवृत्ति आपण आपल्याकडे आकर्षून घ्या. रामा ! तुह्मी या व आमच्या सर्वांच्या हृदयांत स्फूर्तिरूपानें वास करा. आमचे

प्राण, हस्त, चरण, कर्ण, नेत्र सर्व आपल्या उत्कट प्रेमानें भरा. देवा ! ती निर्गुणाची खोळ टाकून द्या, ती जुनी जर्जरित झालेली बुंथी झुगारून द्या. सगुणसाकार होऊन या. पुरुषहृदयें तुह्मी वसवा, स्त्रीहृदयें सीतामाईना वसवूं द्या. रामा! सगुण अवतार घेऊन या, बरोबर वसिष्ठादि ऋषि व मारुति, सुग्रीव, लक्ष्मण, भरत, बिभीषण, या सर्वांना घेऊन या. तुम्ही आणि तुमचे भक्त सगळे मिळून भरतखंडांत या.

१० **मारुतिराया** ! आपलें नांव उच्चारतांच शक्ति, भक्ति आणि युक्ति या तिहींची एकवट मूर्ति मनांत उभी राहते. आपल्या शक्तीची पारख इंद्रजिताला व रावणसेनेला झाली, द्रोणगिरीलाही अजमावतां आली. आपली भक्ति रामरायांनीं जाणली. श्रवणापासून तों दास्य, सख्य, आत्मनिवेदन या सर्व प्रकारांनीं आपण रामाचें चित्त वेधून घेतलेंत, म्हणून तुकोबांनीं भक्तीच्या वाटा आपणांसच पुसल्या आहेत.

शरण शरण हनुमंता । तुज आलों रामदूता ॥ १ ॥
काय भक्तीच्या त्या वाटा । मज दावाव्या सुभटा ॥ २ ॥
शूर आणि धीर । स्वामिकाजीं तूं सादर ॥ ३ ॥
तुका म्हणे रुद्रा । अंजनीचिया कूमरा ॥ ४ ॥

आपण किती प्रकारांनीं स्वामीला वश केलेंत तें आपलें आपणांसच माहीत ! आपली सेवा रामप्रभूला इतकी अमोल वाटली कीं, त्या सेवेचें ऋण फेडतां येईलसें त्यांस वाटेना ! रामायणांत रामकथा अधिक गोड कीं मारुतिकथा अधिक गोड हें सांगतां येत नाहीं. सुंदरकांड खचितच साऱ्या रामायणांत सुंदर आहे. तुमचे पराक्रम रामायणांतून काढले तर रामायण आळणी लागतें असें रामभक्त मोरोपंतही म्हणतात ! तुमच्या पराक्रमांवांचून राक्षस वठणीस आले नसते खास.

बा ! त्वत्पराक्रमाविण सहसा येती न खळबळें वळणी ।
श्रीमद्रामायणरस रसिकांला स्पष्ट लागता अळणी । ॥

तुमच्या गुणवर्णनाचे कामीं निगमस्तुत अशा परमात्म्यानेंही आपली जीभ लावली असे तुम्ही अतुल आहांत. असे सत्पुत्र प्रसवणारी अंजनी माता धन्य होय. तुम्ही रामदासाग्रणी खरे. शक्तिभक्ति-

प्रमाणें आपली युक्तिही लोकोत्तर आहे. 'बुद्धिमतां वरिष्ठं' हें विशेषण सुज्ञांनीं आपणांस दिलें आहे तें सर्वस्वी योग्यच आहे. सुग्रीवाशीं रामाचें सख्य जोडून देणारे मंत्रिवर आपणच. वालिवधानंतर स्वराज्य व तारा यांचा लाभ होऊन सुग्रीव त्यांतच रमला व रामरायाला सीताशोधनाचें साह्य करण्याचें दिलेलें वचन विसरला. रामरायानें डोळे लाल केले व लक्ष्मण संतापून सुग्रीवावर चालून आला. त्याप्रसंगीं मारुतिराया! आपण जसे युक्तीनें वागलांत तशी युक्ति आमच्या पुढाऱ्यांस शिकवा! लक्ष्मण व सुग्रीव दोघेही रामभक्त, पण लक्ष्मण जहाल व सुग्रीव मवाळ! त्यांची आपापसांतच जुंपणार होती, पण तो घोर प्रसंग तुमच्या शहाणपणानें टळला. लक्ष्मण संतापून येत आहे हें पाहतांच तुम्ही सुग्रीवाकडे जाऊन त्याला दरडावून सांगितलेंत कीं, "सुग्रीवा! रामानें केलेला उपकार विसरून तूं कृतघ्न झाला आहेस व स्त्रीसक्त होऊन विषयांत लोळत पडला आहेस. पहा! तो क्रोधताम्राक्ष लक्ष्मण येत आहे तो तुम्हां कृतघ्नांना खाऊन टाकील. ऊठ, निजतोस काय?" अशी त्याची कानउघाडणी करून इकडे तुम्ही झटपट प्रचंड वानरसेना तयार करून ठेवलीत आणि तिकडे लक्ष्मण डोळे फाडीत येत आहे तोंच हंसत हंसत आपण त्याला सामोरे जाऊन प्रेमळ शब्दांत तारेचा महाल, अंगदाचा वाडा इ० दाखवीत सुग्रीवाच्या महालापाशीं आणलेंत. लक्ष्मण सुग्रीवावर कोसळणार तों त्याला थोपवून तुम्ही शांतपणानें जबाब दिलात "हं. लक्ष्मणा! राग आवरा. रामकार्यासाठीं सुग्रीव जागृत आहे. तुमच्यापेक्षांहि त्याची रामावर अधिक निष्ठा आहे. पहा! हे वानर त्यानें रामकार्यासाठीं तयार करून टेवले आहेत!" लक्ष्मणाचा राग ओसरला. सुग्रीव व वानर यांचा समेट असा युक्तीनें करून मारुतिराया! तुम्ही दोघांचाहि सामान्य शत्रु जो रावण त्यावर त्यांस युद्धार्थ नेलेंत व शेवट गोड झाला. मारुतिराया! तुमच्या या अतुल बुद्धियोगाचें वर्म तुम्ही भारतीय पुढाऱ्यांस लवकर शिकवा. आमचे मवाळ सुग्रीव आणि जहाल लक्ष्मण एकमेकांशीं भांडण्यांत, उखाळ्यापाखाळ्या काढण्यांत, मर्मभेदी भाषणें व लेख प्रसिद्ध कर-

ण्यांत गुंग झाले आहेत व एकमेकांना हतप्रभ करून त्यांचा पाडाव करणें हेंच मोठें देशकार्य समजत आहेत ! दोघांचें सख्य करणारी तुमची बुद्धि आज भरतखंडांत कोठेंही दिसत नाहीं. मारुतिराया ! हा तुमचा बुद्धियोग लोकनायकांना तुह्मीं येऊन शिकवा ! ! परस्पर स्नेह-संवर्धनावांचून, सख्यसमेटावांचून राष्ट्राचें डोकें कधीं तरी वर निघेल काय ? मारुतिराया ! तुमचे अमोल गुण तरुणांस शिकवा. शक्ति, भक्ति व युक्ति तीनही गुणांची आम्हांस गरज आहे. चहा, चिवडा, नाटकें, सिनेमा, हाटेलें, फाजील प्रणयकथा वाचण्याची चटक इ० लहान मोठ्या व्यसनांत सांपडलेले तरुण राष्ट्रकार्याच्या मोठमोठ्या गोष्टी तोंडानें बोलत असतात, त्यांना शरीरशक्तीचें महत्त्व आधीं कळवून द्या. हीं पाप्यांची पितरें काय दिवे लावणार तें दिसतच आहे. तुमचें ब्रह्मचर्य, तुमचें वीर्यरक्षण, तुमचे पराक्रम, तुमची अचल रामभक्ति, तुमची निरपेक्ष स्वामिसेवा, तुमची निर्हेतुक परोपकारबुद्धि हे गुण हे वीरनायका ! आमच्या तरुणांना शिकवा. धर्मबुद्धि नसेल, अचल राम-भक्तीचें बळ नसेल, तुमचा पाठिंबा नसेल तर मारुतिराया ! हे पाप्याचे पितर, हे शरीरानें व मनानें दुबळे झालेले धर्मशून्य भाट कोणता पराक्रम गाजवणार तें दिसतेंच आहे. म्हणून अंजनीनंदना ! तरुणांना तुम्ही हाताशीं ध्या, त्यांच्यावर कृपेची पाखर घाला, त्यांना कायावाचामनानें बलिष्ठ बनवा, त्यांना रामभक्तीचें परमामृत पाजा, त्यांना मैत्रीचें वर्म शिकवा आणि इहपरलोकीं तारक असा सन्मार्ग दाखवा. मारुतिराया ! आम्हांवर आपली प्रेमदृष्टि असों द्या. श्रीरामरायाकडे आमची दाद लावून द्या, कामक्रोधमत्सरादिकांवर स्वार होण्याचें सामर्थ्य आम्हांस द्या.

१०. श्रीरामकालीन **ऋषिजन** हो ! धर्मग्लानि दूर करण्याचें मंगलकार्य आपण करा, भक्तिज्ञानवैराग्याचें रहस्य आह्मांस सांगा. श्रीरामावतार होऊन चतुर्वर्णघटित सारा समाज सुखी व्हावा, सर्वांचें अभ्युदय आणि निश्रेयस या उभय प्रकारें कल्याण व्हावें, म्हणून तुह्मी तीव्र तपाचरण केलेंत. पुन्हा एकवार रामरायांची प्रार्थना करून

त्यांना सपरिवार भरतखंडांत बोलावून घ्या. तुमचा त्या थोर दरबारीं वशिला आहे. तुमची आज्ञा ते पाळतील. कृपा करा. भरतखंडाची धर्मग्लानि दूर करा.

११ रघुविरभजनाची मानसीं प्रीति लागो
रघुविरस्मरणाची अंतरिं वृत्ति जागो ।
रघुविरचरणाची वासना वास मागो
रघुविरगुण गातां वाणि हे नित्य रंगो ॥
तुजविण मज पाहे पाहतां कोण आहे
म्हणउनि मन माझें रे! तुझी वास पाहे
अघटित घडवावें सेवका सोडवावें
हरिभजन घडावें दुःख ते वीघडावें ॥ श्रीरामदास.—

॥ जय जय रघुवीर समर्थ ॥

---

२ पुनर्जन्माचें तत्त्व आपणां हिंदु लोकांच्या हाडींमासीं खिळलेलें आहे; पण तसें तें पाश्चात्य ग्रन्थकारांच्या डोक्यांत एखादेवेळ तरी चमकलेलें पाहून ( हें ख्रिस्ती धर्मास मान्य नाहीं तरी ) मौज वाटतें.

पुनरपि जननं पुनरपि मरणं पुनरपि जननीजठरे शयनम् ।
बालस्तावत्क्रीडासक्तस्तरुणास्तावत्तरुणीरक्तः ।
वृद्धस्तावत् चिंतामग्नः परेब्रह्मणि कोपि न लग्नः ॥
—चर्पटपंजरीकास्तोत्र.

Life is the Transmigration of a Soul
Through various bodies various states of being,
New manners, passions, new purouits in each.
In nothing save in consciousness the same.
Infaney, Adolescence, manhood, age,
Are always moving onward, always losing
Themselves in one another, lost at length
Like undulations on the sand of death
—Mntgomeroy.

## १ श्रीरामजन्ममहोत्सव.



**चरित्रीं विश्व रमलें, शमलें सर्व पातक, ।**
**श्रीराम मेघ गमला, भक्त ते मोर चातक ॥ १ ॥** —मोरोपंत.

### ( १ ) श्रीरामावताराचें वर्म.

१. नूतन वर्षारंभाचा पहिला पंधरवडा संपूर्ण भारतीयांना परमोल्हासाचा जात असतो. पाडव्यापासून पूर्णिमेपर्यंत हिंदुसमाजांत सर्वत्र आनंदीआनंद दुमदुमून राहतो. पहिला मंगल दिवस पाडव्याचा, नववा रामजन्माचा व पंधरावा मारुतिजन्माचा. पंधरा दिवस जिकडे तिकडे कीर्तनें, भजनें, पुराणें वगैरेंचे उत्सव चालू असतात. उत्तर हिंदुस्थानांत काशी, मथुरा, प्रयाग, अयोध्या वगैरे शेंकडों ठिकाणीं व वऱ्हाडांत एलिचपूर, उमरावती ह्या दोन ठिकाणीं नऊ दिवस ‘ रामलीले ’ चे खेळ विलक्षण थाटानें, परम उत्साहानें व एकदिलानें लोकशिक्षणार्थ करून दाखविण्यांत येत असतात. जिकडे तिकडे रामनामाचा जयघोष ऐकूं येतो, व चंद्रोदयकाळीं समुद्रास जसें भरतें चढतें त्याप्रमाणें या रामजन्मोत्सवप्रसंगीं हिंदुसमाजाच्या सात्विक मनोवृत्तींचा आविष्कार होतो. दशरथाचे पराक्रम, कौसल्येचें भाग्य, भरतलक्ष्मणांची बन्धुप्रीति, सुग्रीवाचें सख्य, सीतेचा पतिव्रताधर्म, मारुतिरायाची स्वामिनिष्ठा, रामरायाचें लोकाराधन, अयोध्यावासिजनांची रामभक्ति वगैरे सद्गुणांचे ठसे कांहीं कालपर्यंत तरी सर्व जनांच्या चित्तपटलावर स्पष्ट उमटतात. धन्य तो देश व धन्य तो काळ कीं जेव्हां रामलक्ष्मणभरतशत्रुघ्नांसारखे सत्पुत्र दशरथाच्या राजवाड्यांत नांदत होते; धन्य ते वानरगण कीं अखिलभक्तशिरोरत्न मारुतिरायांसारखे एकनिष्ठ पुण्यपुंज वीर ज्यांच्या समुदायांत उत्पन्न झाले होते; परमधन्य ते भारतीय लोक कीं ज्यांनीं आपल्या डोळ्यांनीं मायामनुष्यवेषधृक् परमात्म्याला साक्षात् पाहिलें ! व अत्यन्तात्यन्त धन्य तो काल कीं जेव्हां परमात्म्यानें पृथिवीभरवारणार्थ अवतार घेतला !

२. रामरायाचा जन्म एकदांच झाला, तेव्हां दरसाल जन्मोत्सव करण्यांत काय मतलब आहे, असें कांहीं अर्वाचीन पंडित म्हणतात. त्यांना समर्पक उत्तर भावार्थरामायणादि ग्रंथांत दिलें आहे. जेव्हां जेव्हां रावणापासून प्रजेला ताप होतो, तेव्हां तेव्हां रामरायाचा जन्म होतो. रावण म्हणजे 'रावयति विद्रावयतीति रावणः,' प्रजाजनांना भिवविणारा तो रावण. मनुष्यदेहांत हा अहंकाररूपी रावण सर्व प्रजांना—करणांना—इंद्रियांना घाबरवून दमवून टाकतो; सत्वगुणरूपी देवांना रजोगुणी राक्षसांकरवी जिंकवून 'आढ्योऽभिजनवानस्मि कोन्योऽस्ति सदृशो मया' अशा आरोळ्या फोडतो; इंद्रियदेवता भगवत्कार्य करायला मोकळ्या राहूं नयेत म्हणून त्यांना विषयकारागृहांत डांबून टाकतो; त्रिविधतापानें सर्व शरीर भाजून पोळून काढतो; साक्षात् परमात्म्याच्या शक्तीला—बुद्धिरूप सीतादेवीला—रावण मदोन्मत्त होऊन अशोकवनिकेंत कोंडून ठेवितो; याप्रमाणें सर्वत्र प्रळयकाळची चिन्हें दिसूं लागलीं ह्मणजे रामरायाच्या हातून रावणाचा वध होतो. बुद्धिसीतेला अहंकाररावणाच्या हातून परमात्मा सोडवितो व मग दशसहस्र वर्षें—अनंतकाळ—रामराज्याचें सुख प्रजांना भोगायला सांपडतें! म्हणून जोंपर्यंत अहंकाररावणाच्या कचाट्यांत आपण सांपडलों आहोंत तोंपर्यंत रामजन्मोत्सव करणें ह्मणजे अशा उत्सवप्रसंगाची उत्कंठेनें वाट पाहत राहणें हें प्रत्येकाचें प्रधान कर्तव्य होय. रामजन्म तरी नवमीलाच होतो. समर्थ एका अभंगांत 'नवमी करा, नवमी करा' ह्मणून जीवांना बोध करितात, त्याचा हेतु तरी काय? श्रवण, कीर्तन, विष्णुस्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य व अखेरची पायरी आत्मनिवेदन या प्रकारची नवविधा भक्ति झाली ह्मणजेच रामरायाचा जन्म होतो! मध्यंतरीं होत नाहीं. आत्मनिवेदनाशिवाय रामजन्म नाहीं, रामजन्माशिवाय रावणवध नाहीं, रावणवधाशिवाय सीताप्राप्ति नाहीं व सीतारामांच्या ऐक्याशिवाय स्वानंदसाम्राज्य नाहीं!

३. अध्यात्मरामायणांतील 'भूमिर्भारेण मग्ना०' या श्लोकाचा विचार केल्यास रामजन्म केव्हां व कोणासाठीं होतो याचा उलगडा

होतोः—( १ ) दशवदनप्रमुख राक्षसांच्या भारानें भूमि वांकून जाते. ( २ ) ती गाईचें रूप धरिते. ( ३ ) देव व मुनिजन यांस बरोबर घेऊन ती ब्रह्मदेवाकडे रडत जाते. (४) ब्रह्मदेव व इतर सर्व देव भगवान् विष्णूची स्तुति करितात. व ( ५ ) विष्णु रामावतार घेऊन पृथ्वीचें व्यसन हरितात. याच मुद्यांचा थोडासा विस्तार करूं.

४. यज्ञयागादिकांना व पुण्यकर्मांना विघ्न करणारे, गोब्राह्मणांना पीडा देणारे, दुसऱ्या प्राण्याना जिवंत खाणारे, ते राक्षस. त्यांचा नायक रावण हाहि दहा तोंडांचा. जगाला पीडा करणाऱ्या राक्षसाला दहाच काय पण सहस्रावधि तोंडें ! तोंड खाण्याकरितां दिलेलें असतें व राक्षस खादाड असतात, त्यांची तृष्णा अनिवार असते. ते कोणाला नको असतात, पण त्यांना सर्व पाहिजे असतात ! ते कामगति असल्यामुळें त्यांचा संचार सर्वत्र असतो. त्यांच्या क्षुत्पिपासा इतक्या प्रबळ असतात कीं, रुधिरोदकानेंही त्यांचें शमन होत नाहीं. त्यांचीं अक्राळविक्राळ स्वरूपें पाहून सर्व भितात, पण कधीं काळीं त्यांना इतकीं मोहकस्वरूपेंही धारण करितां येतात कीं, त्यांच्या नाशार्थ अवतरलेल्या सितादेवीला सुद्धां सुवर्णमृगाची खरी ओळख पटत नाहीं ! म्हणूनच त्यांना मायावी किंवा कपटी म्हणतात. अशा राक्षसांनीं पृथ्वीवर उच्छेद मांडला, दीन दुबळ्या प्रजाजनांना ते छळूं लागले, त्यांच्या हिंसक राहणीमुळें पुण्यकर्में बंद पडलीं म्हणजे पृथ्वी गाईचें रूप धारण करते. गाय दीन, अनाथ आहे, त्याप्रमाणें सर्व लोक त्रस्त व हतप्रभ होऊन जातात. सर्व प्रजा गाईसारखी अनाथ व प्रतीकार करण्यास असमर्थ अशी होते. जे तिच्या दुधावर पुष्ट होतात तेच कसाबासारखें तिच्या पाठीवर चाबकाचे तडाखे लगावूं लागले म्हणजे ती बिचारी मुळुमुळू खालीं मान घालून रडून सर्व सहन करते, व मग ती ‘ द्विजमुनिजनांसह ’ परमेश्वराचा धांवा करिते. ती पाषाणासही पाझर फुटण्यासारखा हंबरडा फोडते. हा करुणरसाचा हंबरडा ऐकून सर्व देव तिचा कड घेतात, व तिच्यावर आशीर्वादांची वृष्टि करितात. अनेक मोठमोठे संत, सिद्ध व मुनि त्या मुक्या प्राण्यासाठीं करुणाघन

देवाला आळवितात. रावणानें पृथ्वीला गांजलें तेव्हां वाल्मीकि, वसिष्ठ, विश्वामित्र, भरद्वाज, अत्रि असलाले पुण्यपुंज ऋषि भरतखंडांत जागोजाग तपश्चर्या करीत बसले होते. गाय झालेल्या पृथ्वीला बोलतां येईना म्हणून तिच्या गाऱ्हाण्यांचे सर्व अर्ज त्यांच्या मार्फत भगवंताकडे गेले व नंतर भगवंतानें भूतांचें पालन करण्याकरितां दशरथाचे पोटीं जन्म घेतला. सामान्य जनांचीं गाऱ्हाणीं सामान्य पुढाऱ्यांमार्फत देवापुढें जात नाहींत. देवाला ज्यांच्या शब्दांची भीड पडेल असे त्याचे लाडके भक्तच अशा विपन्नकाळीं राष्ट्राचे खरे हितकर्ते पुढारी होतात ! सामान्य पुढाऱ्यांची जाता सामान्य राजापुढें फार तर चालेल, पण देवाकडे अर्जी पोंचविणारे प्रजाजनांचे वकील म्हणजे संतच होत.

५. संत ‘श्रुतिसिद्ध निर्मल पदांनीं’ व भक्तांनीं रचलेल्या ‘स्तोत्रांनीं’ देवाला आळवितात. भगवंतानें अवतार घेण्यापूर्वीं पृथ्वी रावणानें गांजून गाईसारखी दीन झालेली असली पाहिजे, ही गोष्ट जितक्या महत्वाची आहे, तितक्याच महत्वाची ही गोष्ट आहे कीं राष्ट्रांत भगवत्पर पुण्यपुरुष पुष्कळ असले पाहिजेत. राष्ट्र जर सर्वच पाप्यांचें झालें तर भगवंताला अवतार घेण्याचें प्रयोजन वाटणार नाहीं. पापी पापफळ भोगतील, त्यांची देवाला करुणा कां यावी ? देवाला अव्यक्तांतून व्यक्त व्हावें लागतें तें तीन कारणांसाठीं. साधूंच्या परित्राणासाठीं, दुष्टांच्या विनाशासाठीं व धर्मसंस्थापनेसाठीं. युगायुगाचे ठायीं भगवान् अवतार घेत आले आहेत; तसे ते पुढेंही घेतील. जें राष्ट्र आपली पुण्यसंपत्ति वाढविल त्या राष्ट्रांतच भगवंताचा अवतार होत असतो. रावणाच्या पापांचा कडेलोट व प्रजांच्या पुण्याचा उत्कर्ष जेव्हां होतो तेव्हांच रामाचा जन्म होतो. भगवंताचें सांगणें आहेच कीं:—

> **किंतु कालानुरोधेन तत्तत्प्रारब्धसंक्षयात् ॥**
> **हरिष्ये सर्वभूभारं क्रमेणासुरमंडलम् ॥** अ. रा. २–१७.

राक्षसांच्या पुण्याईचा पोहरा रिता होईल व प्रजेच्या पुण्याईचा पोहरा भरेल तेव्हांच परमेश्वराचा अवतार होईल. प्रजाजनांनीं कालाकांक्षी

होऊन राहिलें पाहिजे व पुण्यसंपत्ति वाढविण्याचा शिकस्तीचा यत्न केला पाहिजे. अत्यंत विपन्नावस्थेंतून तरून जायला किंवा भवरोगांतून सुटायला एकच उपाय आहे.

**संसारामयतप्तानां भेषजं भक्तिरेव ते ॥**

सर्व विश्वाची सूत्रें चालविणारा परमात्मा समर्थ आहे त्याला मनोभावें शरण जावें. आपलीं व आपल्या लोकांचीं सर्व दुःखें खऱ्या भावानें त्याला निवेदन करावीत ह्मणजे त्याला करुणा येईल व त्याला करुणा येईल तरच आमचा तरणोपाय आहे. त्यानें ज्या ज्या वेळीं अवतार घेतले त्या त्या वेळीं प्रजेला सर्व पुरुषार्थ एकदम साधतां आले आहेत. पंत म्हणतात:—

**राष्ट्राचि न, राम निववी देउनि धर्मार्थकाममोक्ष, मही ॥**
**मत अनुसरे प्रजांचें अक्षमसा रामराज तो क्षमही ! ॥ १ ॥**

रामराज्य आपणांस मिळावें व रामानें पुन्हां अवतार घेऊन आमचा उद्धार करावा. धर्मार्थकाममोक्ष हे चारही पुरुषार्थ आमच्या हिंदी राष्ट्रालाच नव्हे, तर संपूर्ण महीला त्यानें साधून द्यावेत; व परमसमर्थ असूनही प्रजानुरंजनाचें व्रत चालवून पृथ्वीवरच त्यानें वैकुंठ आणावें असें खरोखर वाटत असेल तर आम्हीं सर्वांनीं पुण्यसंचय जबरदस्त नेटानें करावयास लागावें. संतमहंतांनीं आम्हांत अवतार घेऊन आम्हांस पावन करण्याइतकें शुद्ध होण्याच्या प्रयत्नास आम्ही आधीं लागलें पाहिजे.

## २ श्रीरामचंद्राचें स्वरूप.

१ सर्वांचा आत्मा हाच आमचा राम आहे. आत्मा, परमात्मा, जीवात्मा, शिवात्मा, इ० सगळीं नांवें रामाचींच आहेत. राम अनामी आहे, ह्म० अनंतनामी आहे, तथापि ओळखीसाठीं श्रुतिशास्त्रांनीं कांहीं नांवें ठेविलीं आहेत. शुद्धस्वरूपीं राम ' ना स्त्री ना पुरुष ना नपुंसक ' असा आहे. परमात्मा, परमेश्वर, परेश, ज्ञानघन, ईश्वर, जगदीश, जगदात्मा, आत्मा, विश्वात्मा, अंतरात्मा, द्रष्टा, साक्षी, सर्वात्मा, कूटस्थ, इत्यादि पुरुषनामें रामाचीं आहेत ! मूळमाया

जगदीश्वरी, पराविद्या, विश्वेश्वरी, अंतःकळा, जाणिवकळा, जगज्ज्योति, चारी वाणी, चारी अवस्था, चारी खाणी, आत्मविद्या, सायुज्यता, सहजस्थिति हीं स्त्रीनामें रामाचींच आहेत ! सत्तारूप, ज्ञानस्वरूप, चिद्रूप, अलिप्त, असंग, प्रकाशरूप, चैतन्य, सूक्ष्म, इत्यादि नपुंसक नामेंहीं रामाचींच आहेत ! समर्थ म्हणतातः—

"ऐसीं उदंड नामें असती । परी ते एकचि जगज्ज्योति । विचारवंत ते जाणती । सर्व अंतरात्मा ॥ ३२ ॥" ( दासबोध १०–१० ) मुंगीपासून ब्रह्मादिकांपर्यंत सर्वत्र एकच राम परिपूर्ण भरला आहे. त्या रामाला ओळखणें, पाहणें व तद्रूप होणें हें एकच सुखाचें साधन आहे. 'सुखालागीं करिसी तळमळ। तरि तूं पंढरिसी जाईं एकवेळ.' 'सर्व सुखाचें आगर । बाप रखुमादेवीवर' इत्यादि अभंगपादांतून राम हाच सुखाचा सागर आहे असें संतांनीं स्वानुभवपूर्वक सांगितलें आहे. ज्याला समर्थ 'राम' म्हणतात, नाथ 'दत्त' म्हणतात, वारकरी 'विठ्ठल' म्हणतात, शैव 'शिव' म्हणतात तोच हा राम सकळांचा आत्माराम होय ! नांवामुळें भेदभाव अज्ञ लोक करोत, लक्ष्य वस्तु एकच आहे. असा हा सर्व सुखाचें निधानभूत राम सर्वत्र सुलभ आहे, मात्र दृष्टि अंतर्मुख करून बाह्य नामरूप सर्व मिथ्या समजून टाकून पाहिलें पाहिजे.

## अभंग.

देव जवळीं अंतरीं । भेटी नाहीं जन्मवरी ॥ १ ॥ मूर्ती त्रैलोक्यीं संचली । दृष्टि विश्वाची चूकली ॥ २ ॥ भाग्यें आले संतजन । झालें देवाचें दर्शन ॥ ३ ॥ **रामदासीं** योग जाला । देहीं देव प्रगटला ॥४॥

२. राम अगदीं जवळ म्हणजे अंतरीं असून त्याची भेट न होण्याचें कारण केवळ दृष्टीची चूक होय ! ज्याच्या ठिकाणीं सर्व संत व ज्ञाते रमतात व जो सर्वांना रमवितो तो **राम**. राम हा आनंदकंद आहे. आत्मारामावर कोणाचें प्रेम नाहीं ? सुखरूप, आनंदरूप, सत्तारूप, चिद्रूप असा हृदयस्थ राम कोणाला सुखरूप नाहीं ! अहंकाररूप रावण, व त्याची लज्जारूप बहीण शूर्पनखा यांना मात्र तो आवडत नाहीं.

रावण विघ्नरूप आहे. हा दहातोंड्या आहे. देहाहंकार, विद्याहंकार, धनाहंकार, रूपाहंकार, बलाहंकार इ० त्या रावणाचीं दहा तोंडें आहेत. देहाहंकार हा सर्व अहंकाराचें मूळ आहे. त्या पायावर कुळाभिमान, देहाभिमान, लिंगाभिमान, प्रांताभिमान, जात्यभिमान, देशाभिमान, इत्यादि अभिमानांच्या उतरंडी रचल्या आहेत; पण वैराग्याच्या सोट्यानें तळाच्या डेऱ्यावर असा तडाखा मारावा कीं, वरील सर्व रांजण धडाधड पडून फुटून त्यांचा चक्काचूर होऊन जाईल ! देहाभिमान मेला कीं इतर सर्व अभिमान आपलीं तोंडें काळीं करतात. देहाहंकार समूळ मेल्याशिवाय मात्र रामाची भेट नाहीं. देहबुद्धि निःशेष जळाली कीं रामराज्याचा प्रांत लागला. ‘ कल्पनेचा प्रांत तो माझा एकांत ’ तेथें सर्व वृत्ति गिळून पचवून बसलें पाहिजे. सत्वगुणी बिभीषणभक्ताला राम चिरंजीवपद देतो. रजोगुणी रावण व तमोगुणी कुंभकर्ण यांचा नाश करणारा निस्त्रैगुण्य राम सत्वगुणी बिभीषणभक्ताला मात्र प्राप्य आहे, म्हणून त्रिगुणातीत होण्याचा व वृत्तिशून्य होण्याचा अभ्यास सतत ठेवला पाहिजे. विषयांपासून वृत्तींना निवृत्त केलें पाहिजे तरच सुखस्वरूप राम भेटेल.

३ पाश्चात्य आणि पौर्वात्य देशांच्या आत्मविषयक कल्पनेंत एका कल्पक विदुषीनें असा फरक सांगितला आहे:—“ In the West Philosophers think that man is body and he has a soul; in the East they feel man is soul and he has a body ! ! ”

४ तात्पर्य काय कीं, राम हा सुखस्वरूप असून बाह्य विषयांकडे चित्त जाऊं न देतां नामस्मरणादि साधनांनीं तें आत्मवश ठेवलें कीं रामप्राप्ति सुलभ आहे. सुख सहज आहे, दुःख आगंतुक आहे. मोक्ष सहज आहे, बंध आगंतुक आहे. ज्ञान सहज आहे, अज्ञान आगंतुक आहे. दुःखनिवृत्ति, बंधनिवृत्ति, व अज्ञाननिवृत्ति करण्यासाठीं शास्त्र, गुरु व स्वतःचा अभ्यास यांची अपेक्षा आहे. सुख मिळवावयाचें नाहीं, तें सहज असून दुःख मात्र घालवायचें आहे. मोक्ष मिळवायचा नसून बद्धता दूर करायची आहे; मुक्तता सिद्धच आहे. अज्ञान घालवायचें आहे, ज्ञान स्वतःसिद्ध आहे. आत्माराम सुखस्वरूपच आहे; दुःख-

भ्रांति तेवढी दूर करावयाची आहे. रामाची प्राप्ति अप्रयास आहे. तिला शीण व कष्ट लागत नाहींत. रामरूप आपणच आहोंत, तें आपणांस मिळवायचें नाहीं. **जें असतें तेंच लाभतें. नसतें तें लाभत नाहीं.** अभावाचा भाव होत नाहीं व भावाचा अभाव होत नाहीं. राम देशकालपदार्थांच्या अपेक्षेनें प्राप्त होणार नाहीं. तो सहज आहे.

पैं देशें काळें पदार्थें । साधूनि घेइजे मातें । तैसा नव्हे, मी आयतें । सर्वांचें सर्वही ॥ —ज्ञानेश्वरी १८–१२२४

## ( ३ ) भावार्थ रामायण.

१. श्रीएकनाथमहाराजांचें भावार्थरामायण वाचतां वाचतां ज्या अत्यंत बहारीच्या ओंव्या आढळल्या त्यांतील कांहीं आज वाचकांच्या मजनसुखार्थ सादर करितों. अजाच्या पोटीं अहमात्मा हा दशरथ जन्मला व आपलें मूळचें अजत्व लक्ष्यांत घेऊन अजन्मा राम त्याचे पोटीं जन्मले. रामजन्माची कथा म्हणजे अजन्म्याची जन्मकथाच आहे! दशरथाच्या मुख्य भार्या तीन!

**ज्येष्ठा कौसल्या ते सद्विद्या । सुमित्रा ते शुद्ध मेधा, ।**
**कैकेयी ते अविद्या । मंथरा कुविद्या तीपाशीं ॥ १ ॥**

**दशरथ** भोगी असून विरक्त होते म्हणून राम त्यांचे पोटीं जन्मले. उघडच आहे कीं, ‘ जो भोगीं अत्यंत विषयासक्तु । त्यासी भगवंतु स्पर्शेना’. शिवाय:—

**यश कीर्ति औदार्य । गुण गांभीर्य अति धैर्य ।**
**दशरथाचें वीर्यशौर्य । स्वर्गीं सुरवर वानिती ॥ २ ॥**

२. **अयोध्या**नगरीची योग्यताच अलौकिक आहे.

**काशीहूनि वहिली । अयोध्येची उदारता भली ।**
**त्रिवार नगरी वैकुंठाला नेली । न मरतां केली सकुटुंब मुक्त ॥४॥**
**प्रथम रुक्मांगदें नेली । दुजी सिबीनें ख्याति केली ॥**
**तिजी श्रीरामें घहिली । वैकुंठा नेली निजगजरें ॥ ५ ॥**

सप्तपुरींत अयोध्येची गणना प्रथम आहे. श्रीराम वास्तविक अयोध्यानगरींतच जन्मतात. जेथें कोणी योध्य ह्म० युद्ध करावयास योग्य

अगर शत्रुभाव प्रगट करणारें नाहीं अशा निर्मत्सर, शांत, साम्य पावलेल्या, उदार अंतःकरणांतच-अशा अयोध्येंतच-रामरायाचा जन्म होतो. ' निर्वैरः सर्वभूतेषु ' अशा अंतःकरणांत रामाचा जन्म होतो.

३. कौसल्येचें अंतःकरण असेंच निर्मल व निर्वैर होतें म्हणून तिच्या कुशीला श्रीराम जन्मले. कैकेयीच्या वांट्याचा पुरोडाशभाग घारीनें झडपून नेल्यावर तिनें फार शोक केला तेव्हां कौसल्येनें प्रेमानें तिची समजूत काढली व तिला स्वभागार्ध दिला, तेव्हां तिच्या तोंडांत नाथरायांनीं फार उदात्त विचार घातले आहेत. सख्या बहिणीपेक्षां आपला प्रेमा अधिक पाहिजे असें दुसरी कोणती स्त्री आपल्या सवतीस म्हणेल ? कौसल्या म्हणते:—

**कैकेयी धरोनि पोटींसी । कौसल्या संबोखी तियेसी ।**
**तूं कां व्यर्थ दुःखी होसी । आह्मां दोघींसी सुख एक ॥ १ ॥**
**एकोदर सख्या वहिणी । दोघी पाणिजे दोघांजणी ।**
**त्यांसी कांहीं नाहीं मिळणी । दुस्तर पाटणी नांदती सख्या ॥२॥**
**आह्मां तुह्मां एक आहेवपण । आह्मां तुह्मां एक निजभूषण ।**
**आम्हां तुम्हां एक निजमंडण । सख्यपण एकत्वें आम्हां तुम्हां ३**
**आम्हां एक निवासस्थान । आम्हां एक भोगभुवन ॥**
**आम्हीं एकें सुखें संपन्न । सत्य सखेपण आम्हां तुम्हां ॥ ४ ॥**
**आम्हां तुम्हां एक पांचभौतिक । एकाचि हस्तपादादिक ॥**
**आम्हां तुम्हां देखणें एक । हें अलौकिक निजसख्य ॥**

ही कौसल्येची प्रेमळता पाहून कैकेयीचें दुःख शमलें व कौसल्येनें तिला प्रेमानें स्वभागार्ध दिला. कौसल्येचें उदाहरण पाहून सुमित्रेनेंही तिला स्वभागार्ध दिला, ह्यामुळें कैकेयीला भरत व शत्रुघ्न असे दोन पुत्र झाले. तात्पर्य काय कीं, कौसल्येची निर्मत्सर सदयता लोकोत्तर असल्यामुळेंच श्रीरामांनीं तिची कूस जन्म घेण्यास पात्र अशी जागा पाहिली. 'कोणाही जीवाचा न घडो मत्सर ' हें देवाच्या संतोषाचें मुख्य बीज आहे. चित्ताचें समत्व हेंच ज्ञानाचें, योगाचें व भक्तीचें सार आहे. समतेपाशीं पुरुषोत्तम नांदतात. ' समोहं सर्वभूतेषु ' असा जर देव आहे तर विषम भावानें भरलेल्या अंतःकरणांत रामराय कसे बरें प्रगट होतील ? कौसल्येचा किस्सा केवळ स्त्रियांनीं सवतीशीं वागतांनाच गिरवायचा असें

नसून सर्व स्त्रीपुरुषांनीं आपलें उदर कौसल्येसारखें समतेनें, व निर्मत्सर प्रेमानें उदार केलें तरच त्यांत रामराय प्रगट होतील ! चित्त शुद्ध झालें तरच रामराय अंतरीं येऊन राहतील ! आपल्याला समाजकल्याणार्थ रामावतार पाहिजे असेल तरी सुद्धां समाजानें कौसल्येसारखें आपलें उदर निर्मत्सरप्रेमानें व्यापक केलें पाहिजे ! विद्वानांविद्वानांत, मतामतांत, सर्वलोकांत द्वेष, मत्सर, निंदा असल्या हीन मनोवृत्ति नांदत असल्या तर देवभक्तांचे अवतार होण्याची गोष्ट तर लांबच, पण ही कुविद्यामंथरा भारतीचें अकल्याण मात्र करील. तात्पर्य काय कीं स्वहितार्थ किंवा समाज-हितार्थ ज्यांची अंतःकरणपूर्वक धडपड असेल त्या सर्वांनीं-व्यक्तिशः स्वोन्नति करूं इच्छिणाऱ्या मुमुक्षूंनीं व देशकार्य करणाऱ्या पुढाऱ्यांनीं—आपले पोट कौसल्यादेवीसारखें निमत्सर प्रेमानें विशाळ केलें पाहिजे, तरच रामरायांचा आविर्भाव होण्याचा संभव आहे. रामराय आम्हां सर्वांना तसली उदारता देवोत, परस्पर प्रेमानें सर्व भूतें एकमेकांशीं वागोत व त्यांच्या आगमनार्थ आमची चित्तशुद्धि करोत.

४. श्रीरामजन्माच्या वेळीं कौसल्येची कशी स्थिति होती याचें नाथराय फार बहारीचें वर्णन करितातः—

**ऐका कौसल्येची स्थिति । अखंड वसे पै एकांतीं ॥**
**न साहे संग सांगातीं । गर्भाप्रती श्रीराम ॥ १ ॥**
**नावडे वस्त्रभूषण । नावडे सुमनचंदन ॥**
**नावडे भोगदिव्यांजन । नावडे शयन पर्यंकीं ॥ २ ॥**
**देहानिर्लोभलक्षण । हेंचि वैराग्य दृढदारुण ॥**
**उदरा आला श्रीरघुनंदन । ब्रह्म परिपूर्ण पूर्णत्वें ॥ ३ ॥**
**करोनि कल्पनेसी मारु । सेविला निर्विकल्पकल्पतरू ॥**
**तया तळीं अतिआदरू । सहजासनीं सुंदरू बैसलीसे ॥ ४ ॥**
**गर्भोदरीं बैसली दृष्टि । यालागीं वृत्ति झाली उफराटी ॥**
**आपल्यासमान देखे सृष्टि । गर्भपुष्टी स्वभावें ॥ ५ ॥**
**राजा पाहे भोगभुवनीं । तेथें नातुडे राजपत्नी ॥**
**पाहे अतिलोभें अवलोकूनी । नयनोन्मनीं न दिसे सुंदरी ॥ ६ ॥**
**पाहतां वैखरीभीतरी । तेथें न दिसे ते सुंदरी ॥**

**मध्यमेच्या माजघरीं । पहातां दुरी दृष्टीसी ॥ ७ ॥**
**शोधितां पश्यंतीवोवरी । तेथें न देखे निजसुंदरी**
**चढली परेच्या उपरी । शुद्धि निर्धारी न लभोचि ॥ ८ ॥**
**काढोनि द्वैताची अर्गळा । फेडूनि शब्दांची शृंखळा ॥**
**उघडी अद्वैतसुमनमाळा । गुरुवाक्यमेळीनिर्धारें ॥ ९ ॥**
**तेथें रिघतां अतिसांकडी । फेडिली रजतमाचीं लुगडीं ॥**
**शुद्धसत्वाचीं भूषणें आवडी । तेही फेडी तत्काळ ॥ १० ॥**
**कैसी बैसली सहजासनीं । जैसी योगिया लागली उन्मनी ॥**
**पाहतां निवाला लोचनीं । धर्मपत्नी सगर्भा ॥ ११ ॥**

ह्या नाथांच्या ओंव्या वारंवार मनाशींच घोटाव्याशा कोणाला वाटणार नाहीं ? देहनिर्लोभता, वैराग्य, अंतर्दृष्टि यांनीं परादि चारी वाणींच्या पलीकडची जी सूक्ष्मता त्या सूक्ष्मतेला पावलेल्या शुद्ध बुद्धि-कौसल्येच्या पोटीं रामरायांचा जन्म होतो हें त्रिकालाबाधित सत्य आहे.

**जो उदरीं संभवला । तोचि सर्वेन्द्रियीं वोसंडला ।**
**देहाचा पांग फिटला । प्रपंच झाला ब्रह्मरूप ॥ १ ॥**
**ज्या तेजाचे निर्धारें । अहं सोहं समूळ विरे ।**
**त्रैलोक्य ब्रह्मत्वें अवतरे । अंगीं भरे स्वानंदू ॥ २ ॥**

५. दाशरथी राम ज्या रामाचा अवतार तो राम कसा आहे ?

**वस्तूसि नाहीं माता पिता । यालागीं न घडे जन्मकथा ॥**
**जन्मेंवीण मरणवार्ता । आत्मत्वीं सर्वथा असेना ॥ १ ॥**
**एवं जन्ममरणातीत । अपार सुख सदोदित**
**त्या स्वरूपा नांव रघुनाथ । जाणा निश्चित श्रोते हो ॥ २ ॥**

५. दाशरथी राम ज्या मूळ रामाचा अवतार त्या रामाचा—त्या अजन्म्याचा जन्म ज्यांच्या विमलबुद्धींत होतो ते महात्मे त्रिवार धन्य होत. सालोसाल रामजन्मोत्सव करण्याचा हेतुच मुळीं हा कीं, रामकथामृतप्राशनानें, रामचिंतनानें, रामाच्या निश्चलध्यानानें व प्रेमानें चित्त राममय व्हावें व कधीं तरी आपल्या बुद्धिकौसल्येच्या उदरीं सच्चिदानंदस्वरूप, आनंदघन, रामराय प्रगट व्हावेत व जन्ममरणाचें सुतक फिटून निरंतर सोंवळेपण प्राप्त व्हावें.

६. जय भगवंत ! जय अनंत ! जय निरामय ! अनंतरूपी, आणि

अरूपी, अनंतनामी आणि अनामी, सर्वभूताशयस्थित आणि भूतांहून भिन्न, करुणाकर आणि वृत्तिशून्य, 'यतःप्रवृत्तिर्भूतानां' असे प्रवृत्तीचे जनक आणि स्वतः निवृत्तिरूप असे तुह्मी आहांत. जय गुणसागर, जय लावण्यनिधान, जय सुखमंदिर, जय सर्वांतर्यामी, जय सर्वव्यापी, जय निरंजन, जय सगुणनिर्गुणरूप, जय आनंदकंद, जय अज्ञानभंजन, जय देवदेव ! जय दयाकर ! ह्या मुमुक्षूचा अज्ञानग्रंथिच्छेद करा. स्वस्वरूपाचें प्रेम द्या. तुह्मी सगुणनिर्गुण उभयरूप आहांत हा निश्चय, तथापि आपल्या दिव्य सगुणरूपाचें एकवार दर्शन देऊन यांचीं सर्वेंद्रियें निववा. भवपाशांतून याला मुक्त करा. प्रपंचवृत्तीच्या मगरमिठींतून याला सोडवा. काम, क्रोध, मत्सर, इत्यादि राक्षसींच्या हातून याला मोकळें करून आपल्या सगुणध्यानास लावा व सर्वथा आपल्या प्रेमास पात्र करा. याचें वृत्तीचें ओंवळेपण काढून टाकून याला सोंवळें करा, शुद्धसत्वाचा पीतांबर याच्या अंगावर टाका व पदरांत घ्या. श्रीराम जयराम जयजय राम.

## श्रीरामचरित्रांतील कालगणना.

अब्दरामायणाच्या १८३ श्लोकांत गिरिधरांनीं श्रीरामरायाच्या चरित्राबद्दल कालगणनापर कांहीं मौजेची हकीकत दिली आहे ती आमच्या वाचकांसाठीं आह्मीं येथे देत आहोंत.

आनंदनामसंवत्सरीं चैत्र शुद्ध ९ स मध्यान्हकाळीं अयोध्येस प्रभु रामचंद्र अवतरले.

वयाचे ४ वर्षापासून विद्याभ्यास.

११ वे वर्षीं व्रतबंध.

१२ वे वर्षीं विश्वामित्राबरोबर गमन.

१५ वे वर्षीं शिवकार्मुक भंगिलें, सीतास्वयंवर झालें. तेव्हां सीता सहा वर्षांची होती.

१५–२७ अयोध्येस वास.

२७ वे वर्षीं वनवासाला प्रारंभ, सीतेचें वय तेव्हां अर्थात् १८ वर्षांचें होतें.

**२७—४१ वनवास.**

वैशाख शु. १ला राम वनवासाला निघाले. प्रथम तीन दिवस केवळ जलपान, व चवथे दिवशीं कांहीं वनफळें सेविलीं. पांचवे. दिवशीं चित्रकूटीं पोंचले.

वैशाख शु. ६ स भरत आले. नंतर तेथून निघून **पंचवटीस साडेबारा वर्षें** क्रमिलीं. खरदूषणादि राक्षसांचा संहार. अश्विन वद्य ३० शूर्पणखेस विरूप केलें. पुढें साडेतीन महिन्यांनीं सीताहरण. माघ शु. १४ स सीता गुप्त झाली.

माघ वद्य ७ स रावणानें मायावी सीतेचें हरण केलें. म्हणजे साडे-चवदा महिने सीताविरह. राम सीतेच्या शोधार्थ निघाले. जटायूनें शुद्धि सांगितली, कबंध मारून राम बदरिवनांत शिरले. तेथें शबरीचीं भक्ति पाहून उच्छिष्ट फळें भाक्षिलीं.

फाल्गुनांत राम पंपातटीं आले. तेथें तीन महिने श्रीरामांनीं अनुष्ठान केलें.

ज्येष्ठ शुद्ध १ पंपासरोवरीं मारुतिराय भेटले.

ज्येष्ठ शु. ५ म्हणजे नागपंचमीस सुग्रीवाची भेट झाली.

ज्येष्ठ शु. ८ वालीला रामांनीं मारलें.

ज्येष्ठ शु. १३ सुग्रीवाला किष्किंधेचें राज्य दिलें.

ज्येष्ठ शु. १५ श्रीराम माल्यवान् पर्वतावर राहण्यास गेले. वर्षा-काळीं गुहेंत मुक्काम. श्रावणांत लिंगार्चन, भाद्रपदांत पक्ष व० केले.

आश्विन शु. १० च्या सुमुहूर्तावर श्रीराम तेथून निघाले.

कार्तिक शु. १० ला सुग्रीवाचें सैन्य जमले.

कार्तिक व. ७ मारुति सीताशोधनार्थ निघाले.

मार्गशीर्ष शु. १० मारुतीनें समुद्रोल्लंघन केलें, व शु. १२ ला अशोकवनांत सीतेला भेटले.

मार्गशीर्ष वद्य ७ मारुति सैन्यासह श्रीरामचरणापाशीं आले.

मार्ग० व. ३० श्रीराम समुद्रतीरीं आले.

पौष शु. ४ ला बिभीषण भेटले. अष्टमीपासून द्वादशीपर्यंत

पांच दिवसांत सेतु बांधला. चतुर्दशीला श्रीराम सिंधुपार झाले. वद्य ३ ते १० पर्यंत लंकापुरवेष्टन.

११ ला रावणाकडून शुक व सारण दूत आले.

१२ ला पुरद्वार रोधिलें. अमावस्येस मायाशिर करून रावणानें सीतेस फसविण्याचा प्रयत्न केला.

माघ शुद्ध १ स अगंद शिष्टाईस गेले. शु. ७ व ८ घोरयुद्ध. शुद्ध ११ स अकंपन मारला.

शु. १३ स वज्रदंष्ट्राला अंगदानें मारिलें.

शु. १४ प्रहस्ताला नीलानें मारिलें.

वद्य २ मंदोदरीचा रावणास उपदेश.

वद्य ४ रामांनीं रावणाचा मुगुट खालीं पाडिला.

वद्य ९ स कुंभकर्ण लढाईस आला व वद्य १४ ला त्याचें शीर रामानें उडविलें.

फाल्गुन शु. ४ पर्यंत रावणाकडील महोदर, त्रिशिरा वगैरे वीर मारले गेले.

शु० ५ ते ७ अतिकाय युद्धांत पडला.

शु० ८ ते १२ कुंभ, निकुंभ, जंघ वगैरे मेले.

शु० १३ ते वद्य १ पर्यंत चार दिवसांत मकर, अक्ष वगैरे वीर पडले.

वद्य २ इंद्रजित लढाईस आला.

वद्य २ मारुतींनीं द्रोणागिरी आणून वानर उठविले. वद्य ८ ते १३ पर्यंत ६ दिवस घोर युद्ध.

शेवटीं लक्ष्मणानें इंद्रजिताचें शिर उडविलें. पुन्हां सात दिवस घोर युद्ध होऊन लक्ष्मणास शक्ति लागली. पुन्हां मारुतीनें द्रोणागिरी आणून लक्ष्मणास उठविलें. शु. ११ स मातलीनें रामास रथ दिला व चैत्र शु. १२ पासून तें वद्य १४ पर्यंत अठरा दिवस रामरावणांचें घनघोर युद्ध होऊन वद्य ३० स रावण वैकुंठास गेला.

वैशाख शुद्ध १ आनंदाचा दिवस. चवदा महिने अठरा दिवस सीतावियोग व चवदा महिने दहा दिवस सीतेला लंकावास. शुद्ध ३ स सीता रामांकीं विराजली.

# श्रीकृष्णावताराची माधुरी

श्रीकृष्णजन्ममहोत्सवाच्या आनंदानें आपलें निजांग सारें सुखस्वरूप झालें आहे, अशावेळीं या आपल्याच सुखाचा एखादा उद्गार बाहेर पडल्यास नवल नाहीं. भगवंताचे अनंत अवतार झाले, असतील व होतील, पण श्रीकृष्णावताराची माधुरी खरोखर कांहीं अनुपम आहे. 'उपजतांचि मायेवेगळा। वाढिन्नला देव स्वलीळा। बाळपणींच मुक्तीचा सोहळा। पूतनादि सकळां निजांगें अर्पी—'श्रीकृष्ण जन्म होतां-च मायेपासून दूर झाले, स्वलीळेन वाढले व बाळपणींच पूतनादि सकळ जनांस मोक्षसुख अर्पिते झाले! त्यांनीं मायेला विश्वरूप दाविलें, गोवळे-पणाचें रूप न पालटूं देतांच सकळ गोवळांना (गोपांना) वैकुंठसुख भोगायला दिलें, बाळ असतांच कंसादि अचाट धेंडे मारिलीं! ब्रह्म आणि नवनीताची चोरी, देव आणि व्यभिचारी, सोळासहस्र नारींचा परिवार असून ब्रह्मचारी ही अपूर्वता दाखविली! त्यांनीं गोपगोपींना संग देऊन निःसंगता दिली, भोगानें योग वाढविला, अकर्मानें कर्मबंध तोडिले, भोगांत मोक्षसुख दाखविलें! 'भक्ति भुक्ति मुक्ति। तिन्ही केली एकपंक्ती'—हा सुखसोहळा श्रीकृष्णावतारावांचून अन्यत्र कोठें आहे? सर्व कर्म करून 'न मां कर्माणि लिंपन्ति' हा अकर्तेपणाचा रंग दाखविला. श्रीशंकराचार्यांसारखे ज्ञानी, श्रीरामानुजांसारखे भक्त, श्रीज्ञानेश्वरांसारखे ज्ञानीभक्त, श्रीवामनपंडितांसारखे सगुणभक्त, श्री. लोकमान्यांसारखे कर्मयोगी—या सर्वांना आपल्या भजनीं लावून ज्याच्या त्याच्या अधिकाराप्रमाणें त्याला कर्मभक्तिज्ञानाचें दान करणारे व सकळांना आपापल्यापरी समाधान देणारे उदारचक्रवर्ती एक श्रीकृष्ण-नाथच होत! कर्म्यांत कर्मी, ज्ञान्यांत ज्ञानी, भक्तांत भक्त, योग्यांत योगेश्वर, असे सर्वीं सर्व असून सर्वांहून निष्टंक वेगळे असे एक भगवान् श्रीकृष्णच होत!

२ श्रीकृष्णाचें लावण्य, श्रीकृष्णानें पूतनादिकांस दिलेली सद्गति, श्री-

कृष्णाच्या बाललीला, श्रीकृष्णाची मुरली, श्रीकृष्णावरचें गोगोपगोपींचें प्रेम, श्रीकृष्णाच्या रासलीला, श्रीकृष्णरुक्मीणींचा विवाह, श्रीकृष्णकृत कंसशिशुपालादि असुरांचा वध, श्रीकृष्णाचा उद्धवार्जुनांस ज्ञानोपदेश, श्रीकृष्णाचा गृहस्थधर्म, श्रीकृष्णाचीं गोकुळ, मथुरा, वृंदावन, द्वारका, व हस्तिनापूर येथील दिव्यकर्मे, श्रीकृष्ण व गुरु सांदीपनि, श्रीकृष्ण व गुरुबंधु सुदामदेव, श्रीकृष्णाचें भारतीयुद्धांतील राजकारण, श्रीकृष्णाचा स्वजनसंहार,—श्रीकृष्णाचीं हीं सर्वच चरित्रें दिव्य व प्रेमपूर्ण आहेत. असा आनंदमय इतिहास अन्यत्र कोठेंही नाहीं. द्रौपदीला वस्त्रें पुरविणें; अर्जुनाचे घोडे खाजविणें; धर्माघरीं उष्टीं काढणें; दुर्वासाचा रथ-रुक्मिणीसह उन्हांत ओढीत नेणें; दरिद्री ब्राह्मणाला आत्मतुल्य वागविणें; सर्वांना आपलें वेड लावून आपण त्यांत न सांपडणें; वधादिकांनींही सद्गति देणें; स्वकीयांना डोळ्यांदेखत प्रबळ करणें व निर्वीर्यही करणें, करांगुळीवर पर्वत उचलणें; अशा श्रीकृष्णलीलांचें कौतुक सर्वांगांचे कान करून ऐकावें. ‘ करून अकर्ता ’ हें वर्म त्यांनीं जगाला शिकविलें, सर्वांना आचरण्यास सुलभ अशा भक्तियोगाची स्थापना केली, धर्मसंस्थापनेसाठीं साधुसज्जनांचें संरक्षण व दुष्कृतांचा विनाश केला. श्रीकृष्णचरित्र सर्वांगसुंदर आहे. पूर्ण ब्रह्मावताराच्या या लीला जी वाणी गाईल ती पवित्र होईल, जे कान ऐकतील ते पावन होतील. श्रीकृष्णनामाक्षरांचा जो अहर्निश जप करील तो उद्धरून जाईल व जगास उद्धरील. श्रीकृष्णाच्या रूपाचें जें मन ध्यान करील तें उन्मन होईल. श्रीकृष्णाच्या जन्मकर्मांचें जो चिंतन करील तो चैतन्यरूप होईल.

२ **श्रीराघवचैतन्यांच्या** मधुरवाणीनें आपण म्हणूं:—

**पुंजीभूतं प्रेम गोपांगनानां । एकीभूतं भागधेयं यदूनाम् ।**
**सांद्रीभूतं गुप्तवित्तं श्रुतीनां । श्यामीभूतं ब्रह्म मे सन्निधत्ताम् ॥**

गोपीप्रेमांची राशी, यादवांची भाग्यमूर्ति, श्रुतींचें मूर्तिमंत रहस्य, असें हें सांवळें परब्रह्म माझ्या सन्निध निरंतर राहो !

बंगालचे परमकृष्णभक्त **श्रीगौरंगप्रभू** यांच्या कोमळ वाणीनें आपण श्रीकृष्णनाथांची प्रार्थना करूं:—

**अयि ! नंदतनूज ! किंकरं पतितं मां विषमे भवांबुधौ ।**
**कृपया निजपादपंकजस्थितधूलीसदृशं विभावय ॥ १ ॥**
**न धनं न जनं न सुंदरीं कवितां वा जगदीश ! कामये ।**
**मम जन्मनि जन्मनीश्वरे भवताद्भक्तिरहैतुकी त्वयि ॥ २ ॥**
**नयनं गलदश्रुधारया वदनं गद्गदरुद्धया गिरा ।**
**पुलकैर्निचितं कदा वपुस्तव नामग्रहणे भविष्यति ॥ ३ ॥**

हे नंदनंदना ! ह्या दुःखरूप भवार्णवांत पडलेल्या ह्या दासाला आपण कृपा करून आपल्या चरणकमलावर पडलेल्या रजःकणाप्रमाणें समजून आपला म्हणा ! धन नको, जन (लौकिक)नको, सुंदरी नको, कवित्वशक्ति नको—मी यांची याचना करीत नाहीं, तर जन्मजन्मांतरीं तुझ्या ठिकाणीं निश्चळ व निष्काम अशी भक्ति असूं दे ! नेत्रांतून प्रेमाश्रूंच्या धारा गळत आहेत, कंठ सद्गदित झाल्यामुळें वाचेंतून शब्द फुटत नाहीं, सर्व शरीर अष्टसात्विक भावांच्या उठावामुळें रोमांचित झालें आहे अशी माझी अवस्था तुझ्या नामस्मरणांत रत असतांना कधीं होईल बरें ?

**श्रीवल्लभाचार्यांच्या** समवेत आपण श्रीकृष्णाच्या मधुरमूर्तीचें चिंतन करूं. श्रीकृष्ण मधुराधिपति आहेत, सर्व मधुर पदार्थांतलें ते माधुर्य आहेत.

**अधरं मधुरं वदनं मधुरं । नयनं मधुरं हसितं मधुरं ।**
**हृदयं मधुरं गमनं मधुरं । मधुराधिपतेरखिलं मधुरम् ॥ १ ॥**
**वचनं मधुरं वसनं मधुरं । चलितं मधुरं वलितं मधुरं ।**
**चरितं मधुरं भ्रमितं मधुरं । मधुराधिपतेरखिलं मधुरम् ॥ २ ॥**
**वेणुर्मधुरो रेणुर्मधुरः । पाणिर्मधुरः पादौ मधुरौ ।**
**नृत्यं मधुरं सख्यं मधुरं । मधुराधिपतेरखिलं मधुरम् ॥ ३ ॥**
**गीतं मधुरं पीतं मधुरं । युक्तं मधुरं सुप्तं मधुरं ।**
**दृष्टं मधुरं सृष्टं मधुरं । मधुराधिपतेरखिलं मधुरम् ॥ ४ ॥**
**रूपं मधुरं तिलकं मधुरं । सलिलं मधुरं कमलं मधुरं ।**
**गोपी मधुरा लीला मधुरा । मधुराधिपतेरखिलं मधुरम् ॥५॥**

श्रीकृष्णाचे अधर मधुर, वदन मधुर, श्रीकृष्णाचे नेत्र मधुर, हंसणें मधुर, त्याचें हृदय, त्याचें गमन ( चालणें ), वलितं ( वळून मागें पाहणें ), त्याचें भ्रमण, त्याची मुरली, त्याचा चरणरेणु, त्याचें

रूप, त्याच्या लीला—त्याचें सर्वच मधुर आहे; कांकीं तो मधुराधिपति आहे—विश्वांतल्या सर्व मधुर वस्तूंचें मूलाधिष्ठान आहे. तो लावण्यरत्नभांडार आहे, माधुर्याला माधुर्य त्याच्यापासून मिळालें आहे. शरीराची बुंथी किंवा पाषाणाची खोळ त्यानें घेतली तरी भक्तदृष्टीला 'सुंदर तें ध्यान उभें विटेवरी' असेंच मधुर दिसतें.

**श्रीएकनाथमहाराज** आपल्या भागवतांत वर्णितातः—

**श्रीकृष्णाचिया सौंदर्यापुढें । लक्ष्मी भुलोनि जालें वेडें ।**
**मदन पोटा आलें बापुडें । तेथ कोणीकडे इंद्रचंद्र ॥ १–२४० ॥**
**जो सकल सौंदर्याची शोभा । जो लावण्याची अति वालभा**
**ज्याचिया अंगसंगप्रभा । आणिली शोभा जगासी ॥ २४३ ॥**
**चहूं आश्रमां प्रकाशकू । त्रिलोकीं कृष्ण गृहस्थ एकू !**
**तोचि ब्रह्मचारी नैष्ठिकू । अति नेटकू संन्यासी ॥ २९७ ॥**
**कृष्णदेहीं नाहीं दैवबळ । लीळाविग्रही चित्कल्लोळ ।**
**त्याचीं सर्व कर्में पावनशीळ । उद्धरी सकळ श्रवणकथनें ॥ २९८ ॥**
**तेणें अवाप्तसकळकामें । ऐसीं आचरिला अगाध कर्में ।**
**मानव तारावया मनोधर्मे । कीर्ति मेघश्यामें विस्तारिली ॥ ३०२ ॥**
**जें वेदांचें जन्मस्थान । जें षट्शास्त्रां समाधान ।**
**षड्दर्शना बुझावण । तो आठवा श्रीकृष्ण पूर्णावतार ॥ ३१–३६८ ॥**

**श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं** श्रीकृष्णाला 'सांवळें परब्रह्म, भक्तकामकल्पद्रुम' ( अ० ९ ) इ० प्रेमळ विशेषणांनीं विशेषिलें असून १२ व्या अध्यायाच्या उपसंहारांत पुढील गोड ओव्या दिल्या आहेतः—

**ऐसें निजजनानंदें । तेणें जगदादिकंदें ।**
**बोलिलें मुकुंदें । संजयो म्हणे ॥ २३९ ॥**
**राया तो निर्मळू । निष्कळंक लोककृपाळू ।**
**शरणागतां स्नेहाळू । शरण्य जो ॥ २४० ॥**
**जो भक्तजनवत्सल । प्रेमळजनप्रांजळ ।**
**सत्यसेतु सकळ–। कळानिधी ॥ २४३ ॥**
**तो श्रीकृष्ण वैकुंठींचा । चक्रवर्ती निजांचा ···॥**

**श्रीरामदासस्वामीही** श्रीकृष्णचरित्र गातांना म्हणतातः—

**कितेक बंदमोचनें । तयासि काय बंधनें ।**

**करूनि पंथ मोकळा । श्रीकृष्ण जाय गोकुळा ॥ १-२ ॥**
**श्रीकृष्ण देव द्रोहिला । जिहीं नरीं दुरावला ।**
**तया खळास हे गती । बळेंचि येम ताडिती ॥ १-२९ ॥**
**व्रणासुरासि मारिलें । कगाबकांसि चीरिलें ।**
**पदीं धरूनि धेनुका । गड्यांस वाटतो सखा ॥ २-३ ॥**
**समागमेंचि गोकुळीं । बळेंचि वोणवा गिळी ।**
**कितेक मल्ल मारिले । बहू रिपू विदारिले ॥ २-१२ ॥**
**श्रीरंगरूप सांवळें । कटीं दुकूल पींवळें ।**
**सुरंग रंगली तनू । विगुंतलें तनू मनू ॥ ३-४५ ॥**
**व्रजांगनांमधें हरी । परोपरी क्रिडा करी ।**
**मधूर वेणु वाजवी । तरंग रंग माजवी ॥ ३-४९ ॥**
**श्रीकृष्ण कृष्ण हें वदा । तुटोनि जाति आपदा ।**
**नको कदा देहेमदा । तरीच पावसी पदा ॥ ३-५९ ॥**

श्रीसमर्थ हे श्रीरामाचे उपासक असून सकल संतांप्रमाणें ते रामकृष्णांत अभेद पाहत असल्यामुळें त्यांनीं अल्पसें कां होईना पण ‘ भागवत ’ प्रणालिकावृत्तांत गाइलें आहे त्यांतून वरील उतारा घेतला आहे.

४. नरसी मेहता यांनीं गुजराथी भाषेंत, सूरदास, मिराबाई इ० कांनीं हिंदी भाषेंत व कित्येक द्रवीडी संतांनीं आपापल्या जन्मभाषेंत श्रीकृष्णचरित्र परोपरीनें गाइलें आहे. हिंदुस्थानांत श्रीकृष्णांचे उपासक सर्वांत अधिक आहेत. त्यांच्या लीलांनीं लक्षावधि भाविकांस मोहून टाकलें आहे, व शेंकडों कवींची वाणी पल्लवित केली आहे. रामकृष्ण परमहंस हे श्रीकृष्णभक्तच होत. श्रीगुलाबरावमहाराजांची प्रेमळ कृष्णभक्ति अनेकांनीं प्रत्यक्ष पाहिली आहे. चिकित्सक व ऐतिहासिक दृष्टीनें श्रीकृष्णचरित्राकडे पाहणाऱ्या चिंतामणराव वैद्यांसही श्रीकृष्णचरित्रानें मोहिलें आहे. ते म्हणतात, “ श्रीकृष्णांचे गुण वर्णन करून सर्व ठिकाणचे भाविक लोक गातात, नाचतात, ध्यानस्थ होतात. सर्व हिंदुस्थानभर आर्य स्त्रियांच्या मुखांतून श्रीकृष्णाचींच गाणीं सदोदित ऐकूं येतात. श्रीकृष्णाचें चरित्र व्यवहाऱ्यास शहाणपण शिकविणारें, मुमुक्षूस मोक्ष देणारें, विपन्नास धैर्य देणारें, निरुत्साह्यास उत्साह उत्पन्न करणारें, संशयितास निश्चयाच्या पायरीवर पोंचविणारें,

सामान्य जनांस प्रेम उत्पन्न करणारें, श्रीमंतांस उन्मत्तपणापासून वांचविणारें, गरीबांस आधार देणारें, दुष्टांस भय उत्पन्न करणारें व सुष्टांस *नीतिपथ दाखविणारें आहे. " श्रीकृष्णाचा जन्मकाळ ज्योतिषशास्त्राधारें शकपूर्व ३२६३ श्रावण वद्य ८ बुधवार हा होता व या दिवशीं रोहिणी नक्षत्रावर श्रीकृष्णावतार मध्यरात्रीं झाला असें वैद्यांनीं* दाखविलें आहे; म्हणजे या गोष्टीस ( शके १८३७ ) ३२६३ + १८३७ = ५१०० इतकीं वर्षें झालीं असें दिसतें. त्यांनीं श्रीकृष्णकथांचा क्रम दिला आहे त्यावरून १८ वे वर्षीं कंसवध, २२ वे वर्षीं अक्रूराचें हस्तिनापुरीं गमन, २५ वे वर्षीं रुक्मिणीविवाह, २७ वे वर्षीं प्रद्युम्नाचा जन्म, ४३ वे वर्षीं द्रौपदीस्वयंवर, ४५ वे वर्षीं इंद्रप्रस्थाची स्थापना, ६५ वे वर्षीं सुभद्राहरण, ६७ वे वर्षीं अभिमन्यूचा जन्म, ६८ वे वर्षीं राजसूययज्ञ, ७० वे वर्षीं द्यूत, ८३ वे वर्षीं भारतीयुद्ध व ११९ किंवा १०१ वे वर्षीं निर्वाण झालें असें दिसतें. अर्जुन श्रीकृष्णाहून १८ वर्षांनीं लहान होता. असो. भाविकांना या आंकड्यांची विशेष मौज वाटणार नाहीं, ते ' माझें अजत्वें जन्मणें । अक्रियताचि कर्म करणें ' या ज्ञानभक्तीच्याच रंगांत रंगतील हें उघड आहे. ' कृष्णें देहो नेला ना त्यागिला । तो लीलाविग्रहें संचला । भक्तध्यानीं प्रतिष्ठिला । स्वयें गेला निजधामा ' ( एक. भाग. ३१. )

५. श्रीकृष्णचरित्र आजपर्यंत शेंकडोंजणांनीं परोपरीनें गायिलें आहे. महाभारत व हरिवंश यांनीं श्रीकृष्णचरित्र प्रथम वर्णिलें. महाभारतांत फक्त श्रीकृष्णाचें राजकारण व्यक्त झालें, पण साग्र चरित्र आलें नाहीं, म्हणून श्रीव्यासांनींच भारतानंतर हरिवंश रचिला. त्यानंतर विष्णुपुराण, ब्रह्मपुराण, ब्रह्मवैवर्तपुराण, भागवतपुराण या चार पुराणांत श्रीकृष्णचरित्र आलें असून या सर्वांत भागवतपुराणानें श्रीकृष्णचरित्राची माधुरी अधिक जनांस चाखावयास लाविली. हिंदुस्थानांत प्रत्येक देशी भाषेंत कृष्णलीला आहेतच. मराठींत ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम, निळोबाराय, यांनीं अभंगरूपानें कृष्णाच्या बाललीला वर्णिल्या आहेत. शिवकल्याण, कृष्णदयार्णव, रमावल्लभदास, ज्योतिपंत,

मोरोपंत, वामन, देवनाथ वगैरेंनीं मराठींत श्रीकृष्णचरित्राचें आपल्या आवडीनुसार गायन केलेंच आहे. इंग्रजी टीकापद्धती स्वीकारून अर्धश्रद्धेनें व पूर्ण चिकित्सक बुद्धीनें बंकीमचंद्र चातरजी यांनीं बंगाली भाषेंत व ज्ञानेंद्रनाथ मित्र यांनीं इंग्रजी भाषेंत श्रीकृष्णचरित्रें वर्णिलीं आहेत. बंकीमचंद्रानें विष्णुपुराणाला अधिक प्राचीन मानलें आहे तरी पण त्यानें अर्वाचीन पंडितांच्या मताप्रमाणें रासप्रकरण प्रमाण मानलें नाहीं. ज्ञानेंद्रमित्रानें अर्धवट श्रद्धेनें हरिवंशाला प्रमाण धरिलें आहे व त्यानें मनुष्यभावानें कृष्णचरित्र वर्णिलें आहे. अमेरिकेंत श्रीकृष्णाचीं मंदिरें बांधून श्रीकृष्णभक्तीची गोडी तेथल्या लोकांना लावणारे बाबा प्रेमानंद भारती यांनींही पूर्णश्रद्धेनें इंग्रजींत एक कृष्णचरित्र लिहिलें आहे. तें फार सरस असून इंग्रजींतून श्रीकृष्णचरित्र वाचण्याची गोडी बाळगणारांनीं तें अवश्य वाचावें. आमच्या मराठी साधुसंतांनीं व कवींनीं भागवतावर पूर्ण श्रद्धा ठेवून श्रीकृष्णचरित्र गायिलें आहे. पूर्णश्रद्धेनें वाचा, अर्धश्रद्धेनें वाचा, मनुष्यभावानें वाचा, फार काय पण संशयित वृत्तीनें अगर पाखंडीपणाच्या बुद्धीनेंही वाचा, पण श्रीकृष्णचरित्र वाचल्याशिवाय राहूं नका ! ! जे जे कृष्णचरित्र वाचायला आले ते ते कृष्णभक्तच होऊन राहिले ! बंकीमचंद्र चातरजी म्हणतात; " जनकादि राजर्षी, नारदादि ब्रह्मर्षी, रामचंद्रादि राजे सर्वच श्रेष्ठाचारानें मनुष्यजातीचे हितकर्ते झाले आहेत. बुद्ध व ख्रिस्त हे धर्मोपदेशक झाले खरे, पण त्यांच्या ठायीं पूर्ण दया नव्हती; आमच्या विभूति सर्वलक्षणलक्षित आहेत. पण त्या सर्व विभूतींत एक विभूति अशी होऊन गेली कीं, जिच्यापुढें सर्व विभूति मुलांसारख्याच वाटतात ! आणि ती विभूति म्हणजे अर्जुनाचे गुरु, धर्माचे उपदेष्टे, अतुलप्रतापी व पूर्णावतारी श्रीकृष्णच होत. " ' कृष्णस्तु भगवान्स्वयम्. '

६. श्रीकृष्णाचा अवतार झाला याबद्दल हिंदु मनुष्याला स्वप्नांत सुद्धां शंका येणार नाहीं. तथापि अर्वाचीन शिक्षणानें जे शंकित झाले असतील त्यांना एवढें सांगणें जरूर दिसतें कीं, मॉनियर वुइलियम्ससारख्या पाश्चात्य पंडितानें सुद्धां कबूल केलें आहे कीं, " महाभारतासारखे

इतिहासग्रंथ ऐतिहासिक सत्याच्या पायावर उभारले नसते तर ते खात्रीनें इतके लोकप्रिय झाले नसते." कवि वर्णनाच्या भरांत उद्दिष्ट भावनेच्या प्रसारार्थ रूपकादि वर्णनप्रकार भिन्न भिन्न प्रकाराजें वर्णितात, पण मूळकथा खऱ्याच असतात. श्रीकृष्णानें बाळपणीं पूतना, अरिष्ट, केशी वगैरे दुष्टांना गति दिली; गाडी उलथून पाडली; कालियाचें मर्दन केलें; गोगोपरक्षणासाठीं गोवर्धन पर्वत करांगुलीवर उचलून धरिला; या कथा हरिवंश, विष्णुपुराण व भागवत यांमध्यें वर्णिल्या आहेत, त्या निःसंशय खऱ्याच आहेत. या भगवल्लीला ऐतिहासिक गोष्टी आहेत. श्रीकृष्णावताराला पांच हजारांवर वर्षें होऊन गेलीं असून कृष्णचरित्रांतल्या ज्या कथा व्यासांपासून तुकारामांपर्यंत संतांनीं खऱ्या मानिल्या—नव्हे, ज्यांच्या चिंतनामुळें त्यांना ब्रह्मनिष्ठता प्राप्त झाली, त्यांवर—त्या आप्तवाक्यांवर—ज्यांचा विश्वास बसत नाहीं त्यांची कींव करावी यापेक्षां दुसरें काय! श्रीकृष्ण म्हणजे प्रेमाची साक्षात् मूर्ति होय! निरुपाधिक, शुद्ध, आनंदमय अशा प्रेमाची ती मूस होय. वृंदावनवासि अखिल जीवांना कृष्णप्रीति उत्पन्न झाली होती. कृष्णाचे बाळगडी कृष्णावर कसें शुद्ध प्रेम करीत हें गोपगोपाळांच्या व सुदामदेवाच्या मधुर कथांवरून स्पष्ट होतें. रासक्रीडा हा कृष्णचरिताचा शिरोभाग आहे. गोपींची कृष्णभक्ति जशी पराकोटीची होती तशी भक्ति कोणींही केली नाहीं. भगवद्भक्तांत पहिलें स्थान गोपींनाच दिलें पाहिजे. पंतांनीं म्हटल्याप्रमाणें 'सोडुनि पति, सुत, गुरु, गृह, अशन, वसन, धर्म, नीति, भी, लज्जा' त्यांनीं अनन्यभावानें खरें आत्मसमर्पण केलें व त्या श्रीकृष्णपरमात्म्याला सर्वभावानें शरण गेल्या. गोपींच्या भाग्याचा कबीर, तुकारामासारख्या भक्तशिरोमणींनीं हेवा केला! गोपींनीं अंतर्बाह्य सुखानें श्रीकृष्णाला खेळविलें तुकोबांनीं म्हटल्याप्रमाणें:—

**दिलें त्यांसी सुख अंतरींचें देवें। जिहीं एक्या भावें जाणितला ॥ १॥**
**ज्यांचें कृष्णीं तन मन झालें रत। गृहपतिसुत विसरल्या ॥ २ ॥**

जगन्मोहक, मुरलीधर, प्रभुरूपाला पाहून गोपी आपलें सर्वस्व जें पतिरूप धन त्याविषयींही उदास झाल्या, तेव्हांच त्यांना कृष्णप्राप्ति

झाली. सर्व प्रेमबंध तोडून टाकावेत, अहंवृत्तीचा पूर्ण लय करावा, सर्व-स्वार्पण करावें, तेव्हांच प्रभुप्राप्ति होते. श्रीशुकाचार्य, एकनाथ, तुकाराम, अशा संतांना रासलीलेचें वर्णन करितांना प्रेमाचें पूर्ण भरतें येतें आणि कांहीं फाजील सोवळीं (?) माणसें रासक्रीडेचें नांव ऐकतांच आपल्याच पापवासनेच्या वासानें बिचकून जातात ! अमृताच्या ठिकाणीं एखा-द्याला विषाची भ्रांति झाली तर तो दोष सर्वथा त्या भ्रांतिष्टाचाच होय ! गोकुळांतला कृष्ण निराळा व गीतोपदेष्टा कृष्ण निराळा असा भेद प्रसिद्ध सुधारणाधिपति कै० माधवरावजी रानडे यांनीं प्रथम केला. विष्णुपुराण, हरिवंश, महाभारत व भागवत या ग्रंथांत असा भेद कोठेंही केलेला नाहीं व आमचे धार्मिक पुढारी जे परम ज्ञाते साधुसंत त्यांनाही या भेदाचा वास कधीं आला नाहीं! गोकुळांतला कृष्ण, मथुरेंतला कृष्ण, द्वारकेंतला कृष्ण, भारती युद्धांतला पांडवपक्षपाती कृष्ण, उद्धवार्जुनांना धर्मरहस्य प्रकट करणारा कृष्ण निःसंशय एकच होय ! कृष्णचरित्र असें अगाध व सर्वांगसुंदर आहे कीं, कोणत्याही बाजूनें त्याकडे पाहिलें तरी दिव्यप्रेमानें तें थबथबलेलें आहे.

७ श्रीकृष्णाचा जन्म मदोन्मत्त झालेल्या दैत्यांचा संहार करण्या-करितां व भक्तांना सुख देण्याकरितां झाला. त्याकाळीं भरतखंडांत असुर फार प्रबळ झाले होते. कंस, जरासंध, कालयवन, शिशुपाळ व यांच्या आश्रयानें राहणारे मायावी राक्षस परोपरीनें भारती प्रजेला छळीत होते. पृथ्वीनें गोरूप धारण केलें होतें. आसुरी संपत्तीनें उन्मत्त झालेले असुर जेव्हां पृथ्वीला गांजतात तेव्हां प्रजा त्रस्त होऊन जाते, गांज-णाऱ्यांच्या नांवानें मनांत चरफडते, पण सत्तेपुढें शहाणपणा नाहीं या न्यायानें तिला जुलमाचा प्रतीकार करितां येत नाहीं. आपत्तीनें जर्जर झालेली प्रजा देवाची करुणा भाकते, देवाला दया येऊन दीनजन-परित्राणार्थ व धर्मसेतुरक्षणार्थ तो अवतार घेतो, तो एखाद्या गरीब कुळांत खेडवळाच्या संगतींत आपलें बाळपण काढतो व शुद्धमनस्क अशा भोळ्याभाबड्यांचें चित्त आपल्याकडे स्वगुणांनीं ओढून घेतो. त्याला शब्दपंडित, साशंक वृत्तीचे तार्किक, निष्क्रिय व वक्रबुद्धि असे

नागरिक सहसा आवडत नाहींत. श्रीरामानें वानरांचें साह्य घेतलें, शिवरायानें मावळ्यांचें सख्य जोडलें,श्रीकृष्णानें गवळ्यांच्या चित्तवृत्ति हरण केल्या ! या गोष्टींत मोठें रहस्य आहे. खेडवळलोक शुद्ध मनाचे, मोकळ्या स्वभावाचे, निष्कपटी, सदाचारी, व प्रेमळांतःकरणाचे असे असतात. तुकोबांनीं म्हटलें आहे:—

**हरि गोपाळांसवें सकळां । भेटे गळ्यां गळा मेळवुनी ॥ १ ॥**
**भाविकें त्यांची आवडी मोठी । सांगे गोठी जीवींचिया ॥ २ ॥**
**योगियांच्या ध्याना जो नये । भाकरी त्यांच्या मागोनि खाये ॥ ३ ॥**
**तुका म्हणे असे शहाणिया दुरी । बोबडियां दासां हाका मारी ॥ ४ ॥**

श्रीकृष्णाला प्रेमळ भक्त आवडतात, तो आपल्या जीवाचें गुज तार्किक पंडितांना सांगत नाहीं, तर प्रेमळांनाच सांगतो. तार्किक पंडित संशय व मतभेद काढीत व वाद कुटीत बसतात, वादाला त्यामुळें जोर चढतो व भावनानाश होतो. प्रभूचा अवतार व बाळपण ज्या वृंदावनवासी प्रेमळ जनांच्या संगतींत गेलें ते खचितच परम धन्य होत.

८ प्रिय वाचक हो ! भगवंताचा आठवा अवतार, वसुदेवाचा आठवा पुत्र, श्रावणांतल्या आठव्या तिथीला जन्मलेल्या श्रीकृष्णपरमात्म्याला-निरंतर आठवा, एवढीच सप्रेम विनंति आहे. मध्यरात्र झाली तरी निद्रा तुम्हांला सोडणार नाहीं काय ? अहंकंसानें बंदिशाळेंत टाकलेले आपण सर्वच जण श्रीकृणाला आठवूं. मध्यरात्र झाली असली तरी त्याचा आठव ठेवूं म्हणजे मोहममतेच्या अर्गळा तोडून तो सन्मुख उभा राहील, त्याच्या आगमनाबरोबर आपल्या नाशार्थ कंसानें ठेवलेले पाहरेकरी आंधळे होतील, श्रीकृष्ण वासनापूतनेचा, अघासुराचा वध करील, अहंकंसाला ठार मारील, प्रकृतिपुरुषरूपी मातापितरांचीं बंधनें तोडून स्वराज्याच्या साम्राज्यपदावर आपणांस बसवील व आपणही कृष्णानंदनिमग्न झाल्यावर या अजन्मजन्म्याचा सोहळा कौतुकानें, परम प्रेमानें व परमानंदानें गाऊं लागूं.

———

# विचारसादृश्य.

३

बायबलांत म्हटलें आहे:—

Out of the abundance of the heart
The mouth speaketh." ( Mathew 12 )

पोटींचें ओठीं उभें राहे । चित्त साहे ( साह्य ) झालिया ॥१॥

—श्रीतुकाराम.

जें जें वसे अंगीं । तें तें आठवे प्रसंगीं ॥ १ ॥

—श्रीरामदास.

४

आईबाप, बहिणभाऊ, बायकापोरें, इष्टमित्र हे सर्व मनुष्यमात्राला प्रिय असतात, पण खरा भगवद्भक्त तोच कीं ज्याला या सर्वांपेक्षां देव आवडतो. भक्ताला आपल्या स्वतःच्या देहापेक्षां व प्रिय माणसांपेक्षां व सर्व प्रिय वस्तूंपेक्षां देव प्रियतम असतो. देवाइतकें त्याला प्रिय कांहीं नसतें. 'मज रघुनाथजी वेगळे जिवलग कोणी नाहीं' हें समर्थांचें एका पत्रांतलें वाक्य त्यांच्या रामभक्तीचा रंग दर्शवित आहे. इतर आप्तमित्र देवप्रापक असतील तर भक्ताला प्रिय असतात व त्यांच्या संगतीनें देव दुरावत असेल तर तो देवासाठीं त्यांचा त्याग करितो.

नारायणीं जेणें घडे अंतराय । हो कां बापमाय त्यजावीं तीं ॥ १ ॥

हा तुकोबांचा अभंग पहा. देवासाठीं प्रल्हादानें जनकाचा त्याग केला, बिभीषणानें बंधूचा केला व भरतानें राज्य आणि माता यांना रामासाठीं सोडलें, व म्हणूनच यांची भक्तोत्तमांत गणना आहे.

समर्थांनीं सख्यभक्तींत म्हटलें आहे:—

देवाच्या सख्यत्वाकारणें । आपुलें सौख्य सोडूनि देणें ।
अनन्यभावें जीवें प्राणें । शरीर तेंही वेंचावें ॥ १ ॥
देवाच्या सख्यत्वासाठीं । पडाव्या जिवलगासी तुटी ।
सर्व अर्पावें शेवटीं । प्राण तोही वेंचावा ॥ २ ॥

ख्रिस्ती धर्मशास्त्र जें बायबल त्यांतही म्हटलें आहे:—

37. He that loveth father or mother more than Me, is not worthy of Me and he that loveth son or daughter more than Me is not worthy of Me.

39. He that findeth his life, shall lose it, and he that loseth his life, shall find it–Mathew 11

26. If any man cometh unto Me,
and hateth not his own father and
mother, and wife and children,
and brothers & sisters and his own
life too, he cannot be My disciple. Luke 15.

५

शास्त्रें व संतमहंत लोकांना वेळोवेळीं जागे करीत असतात, पण संसारप्रवाहाकडे पाहिलें असतां सर्व जीव देहादि प्रपंचांतच इतके गुरफटून गेलेले व मायामोहानें व्याप्त झालेले दिसतात कीं, ज्ञात्यांची बोंब कोणी ऐकत नाहींत! जीवांचा स्वभाव चाललाच आहे. कथापुराणप्रसंगीं, मंदिरांतून, प्रवचनें ऐकतांना क्षणभर तन्मय व्हावें, पण तो क्षण गेला कीं पुन्हां आपलें 'पहिले पाढे पढे पंचावन' आहेतच! जगदुद्धारक व उपदेशक महात्म्यांच्या हें लक्ष्यांत येतें तेव्हां त्यांना अचंबा वाटतो, पण त्यांची भूतकरुणा इतकी बलवत्तर असते कीं, निराश न होतां ते आपला उपदेशक्रम अव्याहत चालू ठेवतात. त्यांची थोरवी ती येथेंच आहे!

महाभारताच्या शेवटीं भगवान् व्यासांनीं 'भारतसावित्री' लिहिली आहे त्यांत ते म्हणतात:—

ऊर्ध्वबाहुर्विरोम्येष नच कश्चिच्छृणोति मे ।
धर्मादर्थश्च कामश्च स धर्मः किं न सेव्यते ? ॥ १ ॥

श्रीव्यास म्हणतात कीं; "धर्मप्रमाणें वागा, स्वधर्माचरण सोडूं नका म्हणजे तुमचे अर्थ आणि काम हेही पूर्ण होतील म्ह० धर्मसेवनानें प्रपंचही नेटका होईल, मग तुम्हीं त्या धर्माचें सेवन कां करूं नये बरें? असें मी हात वर करून मोठ्यानें ओरडून सांगतों—पण माझें ऐकतो कोण?"

श्रीसमर्थ मनोबोधांत म्हणतात:—

जिवा श्रेष्ठ ते स्पष्ट सांगोनि गेले
परी जीव अज्ञान तैसेचि ठेले ।
देहेबुद्धीचा निश्चयो ज्या ढळेना
जुनें ठेवणें मीपणें तें कळेना ॥

# ११ पंढरीची यात्रा व पालख्यांचे समारंभ.



**पंढरीशीं जा रे आल्यांनो संसारा । दीनाचा सोयरा पांडुरंग ॥ १ ॥**
**वाट पाहे उभा भेटीची आवडी । कृपाळू तांतडी उतावीळ ॥ २ ॥**
**मागील परिहार, पुढें नोहे शीण, । जालिया दरुषण एक वेळां ॥ ३ ॥**
**तुका म्हणे नेदी आणिकांचे हातीं । बैसला तो चित्तीं निवडेना ॥ ४ ॥**

१. आजचा दिवस पुण्याच्या लोकांस खरोखरच पुण्याईचा आहे. पुणें हें स्वराज्याच्या आठवणीचें शहर आहेच, पण पुण्याच्या पंचक्रोशींत आळंदी, देहू, चिंचवड, जेजूरी, वगैरे पुण्यक्षेत्रें असल्यामुळें तें स्वधर्माच्याही आठवणीचें शहर आहे. निदान उभ्या वर्षांत आज तरी साधुसंतांच्या व भगवद्भक्तांच्या आगमनानें पुण्याला पुण्यक्षेत्राची योग्यता प्राप्त झालेली दिसते. दरसाल ज्येष्ठ वद्य ९ ला दुपारीं ३ वाजतां हजारों पुणेंकर चतुःशृंगीच्या मैदानाकडे आळंदी व देहू येथून येणाऱ्या पालख्यांना सामोरे जात असतात. संध्याकाळीं पुणें शहराला दहावीस हजार वारकऱ्यांच्या नामघोषानें पंढरीची शोभा येते. आज सायंकाळीं गांवांतून नित्याप्रमाणें झुंडीच्या झुंडी श्रीज्ञानेश्वर व श्रीतुकाराम यांच्या पादुकांच्या दर्शनार्थ प्रेमभरानें धांवत जातील व जिकडे तिकडे हरिहरनामांचा गजर पुणेंकरांना ऐकायचा सुप्रसंग येईल. शहरांतील जाणते, नेणते, सुशिक्षित—अशिक्षित, वृद्ध—तरुण, पुरुष—स्त्रिया, ब्राह्मण—शूद्र, श्रीमंत—गरीब सर्वांनीं आपापले भेदभाव कांहीं काळ तरी विसरून जावें व ‘ ज्ञानोबा माउलीच्या ’ व ‘ तुकोबा माउलीच्या ‘नामसंकीर्तनांत दंग होऊन स्वसुखामृताचें एक दिवस तरी लाजलज्जा सोडून आकंठ प्राशन करावें अशी आमची सर्वांस प्रेमाची विनंती आहे !

२. पंढरीच्या वारकऱ्यांचा हा मेळा सातआठशें वर्षांचा तरी जुना आहे. दोन दोन चार चार लाख लोक बिनबोभाट आपलें नामघोषाचें काम उरकून जातात. हा वारकरी मेळा ‘ निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान,

मुक्ताबाई, एकनाथ, नामदेव, तुकाराम ' या धर्मचालकांच्या पुण्याईनें ज़ोरांत चालला आहे. ' धर्म रक्षावयासाठीं आटाटी ' करणारे महात्मे ते ! ' ज्ञानोबा माऊली तुकाराम ' याप्रमाणें या लोकनायकांच्या नामाचा जयघोष करूनही जीव कृतार्थ होतात. सुशिक्षितांचे समुदाय ' ग्यानबा तुकाराम ' च्या पालख्यांना सादर प्रेमानें सामोरे जातील काय? संतमेळे, नामघोष, अवतारी पुरुषांच्या पादुका या विषयींचा प्रेमादर जर आमच्या हृदयांत कायम राहिला असेल, तर येथील खासगी व निमसरकारी शाळा व कॉलेजें यांतील शिक्षक व प्रोफेसर, अनेक संस्थांचे राष्ट्रशिक्षणाचीं कामें करणारे मालक व चालक, जुने भटभिक्षुक व शास्त्रीपंडित, सरदार व राजेरजवाडे, सारे लोक अशा राष्ट्रीय मेळ्याच्या प्रसंगीं जातीनें हजर राहून स्वोद्धाराचा खरा मार्ग स्वीकारतील तर काय मौज होईल ? वारकरीपंथांत विलक्षण चिकाटी व तेज आहे. साऱ्या दक्षिणेंत याच्यासारखी तेजस्वी, ऐक्यवर्धक, निश्चय व धैर्य शिकविणारी दुसरी कोणती संस्था नाहीं. देवाच्यासाठीं शरीरकष्ट सोसावेत वारकऱ्यांनींच !

२ पंढरीची मुख्य यात्रा प्रतिवर्षीं आषाढांतल्या शुद्ध एकादशीस भरते. शुद्ध एकादशी पंढरीची व वद्य एकादशी आळंदीची असें संतांनीं ठरवून ठेविलें आहे. दिंड्यापताका घेऊन वैष्णव म्हणजे विष्णुभक्त पंढरीस आज निदान ७०० वर्षें तरी जात आहेत. श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या म्हणजे शके १२१२ च्या पूर्वींपासून वारकरी सांप्रदाय अस्तित्वांत आहे. ज्ञानोबाराय स्वतः एका अभंगांत ह्मणतातः—

**कुंचे पताकांचे भार। आले वैष्णव डिंगर ॥**
**भेणें पळति यमकिंकर। नामें अंबर गर्जतसे ॥ १ ॥**
**आले हरिदासांचे थाट। कळिकाळा नाहीं वाट ॥**
**विठ्ठलनामें करिती बोभाट। भक्तां वाट सांपडली ॥ २ ॥**
**टाळ घोळ चिपळ्या नाद। दिंडी पताका मकरंद ॥**
**नाना बागडियांचा छंद। कवच अभेद नामाचा ॥ ३ ॥**

नाथमहाराजही ( शके १४५०–१५२० ) सांगतातः—

**पंढरीसी जा रे आधीं। कृपानिधी तो पहा ॥ १ ॥**

**गाताती भोळे भोळे । प्रेमें सांवळे नाचत ॥ २ ॥**
**कुंचे पताका गरुडटके । वैष्णव निके मेळ मिळे ॥ ३ ॥**
**दिंडी कथा जागरण । एका जनार्दनीं ते पावन ॥ ४ ॥**

तात्पर्य काय कीं, ही विठ्ठलनामकथागंगा ज्ञानोबारायांच्याही पूर्वींपासून महाराष्ट्राला पावन करीत आली आहे. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ यांच्यानंतर तुकोबा आले. या सर्वांनीं नामकथागंगेंत बुड्या मारल्या, स्वतः पावन झाले व तिलाही पावन केली. खांद्यावर पताका घेणें, दिंडी ( वीणा ) हातीं घेऊन नाम गाणें, एकादशीचा उपवास व रात्रीं जागरण करणें, सर्व वैष्णवांनीं पंढरीला नामघोष करीत पायीं जाणें, हीं वारकऱ्यांचीं सामान्य लक्षणें आहेत. पंढरीची यात्रा ही प्राचीन, वारकरी संप्रदायही प्राचीन व संतमेळ्यांची पद्धतही प्राचीन. पांचसातशे वर्षेंपर्यंत केवळ ‘ दिंड्यापताका ’ घेऊन हरिदासांचे थाट पंढरीला जात असत. तथापि पंढरीस पालखी नेण्याचा प्रघात ८० वर्षांपूर्वीं **हैबतरावबाबांनीं** प्रथम पाडला. हे साताऱ्याजवळ आरफळ ह्मणून एक गांव आहे तेथें रहात होते. हे सुखसंपन्न असून ज्ञानोबांचे मोठे भक्त होते. विरक्त होऊन उत्तर वयांत ते आळंदीस येऊन राहिले. त्यांना ज्ञानोबांचा साक्षात्कार असे. त्यांच्या वेळेपर्यंत ज्ञानोबांच्या पादुका हातीं घेऊन भक्तजन नाचत पंढरीस जात. “ हातीं घेऊनी पादुका । उभा बंदीजन तुका ॥ ” असें तुकोबा स्वतःच सांगतात. ज्ञानोबांच्या पादुका पालखींत घालून समारंभानें मिरवत नेण्याच्या प्रघातास हैबतरावांच्या वेळेपासून जोर आला. आळंदीप्रमाणें इतर ठिकाणांहूनही पालख्या जाऊं लागल्या. सध्यां मुख्यत्वें पुढील पालख्या पंढरीस जातातः—

| | | |
|---|---|---|
| १ आळंदीहून | —श्रीज्ञानेश्वरांची | पालखी |
| २ देहूहून | —श्रीतुकोबांची | ,, |
| ३ पैठणाहून | —श्रीएकनाथांची | ,, |
| ४ त्र्यंबकहून | —श्रीनिवृत्तिनाथांची | ,, |
| ५ एदलाबादेहून | —श्रीमुक्ताबाईची | ,, |

| | | |
|---|---|---|
| ६ मच्छेंद्रगडाहून | —श्रीमच्छेंद्रनाथांची | ,, |
| ७ सासवडाहून | —श्रीसोपानदेवांची | ,, |
| ८ आरणगांवाहून | —श्रीसांवतामाळ्याची | ,, |

कांहीं पालख्या नवीन सुरू झाल्या आहेत, व कांहीं मागील बुडाल्याही आहेत. तथापि त्र्यंबक, आळंदी, देहू व पैठण येथील पालख्या मुख्य होत. या पालख्या महिना पंधरा दिवस अगोदर आपापल्या गांवांहून निघतात. सगळ्यांत अधिक यात्रा ज्ञानोबारायांच्या पालखीबरोबर असते. या पालख्यांचे मुख्य दिवस व मुक्काम ठरले आहेत. दिंड्या व पालख्यांबरोबर हजारों लोक जातात पण त्यांची टापटीप व अंतर्व्यवस्था इतकी उत्कृष्ट असते कीं, नवीन राष्ट्रचालकांनाही तशी साधायला आणखी कांहीं वर्षें लागतील.

४. आळंदीच्या पालखीचे मुक्काम तेवढे सांगूं. सर्व पालख्यांचे मुक्काम सांगूं लागल्यास फार विस्तार होईल.

आळंदीच्या पालखीचा मार्ग.

१ ज्येष्ठ वद्य ८ आळंदीस प्रस्थान ठेवतात व व ९ ला निघतात.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २ | जेष्ट | वद्य | ९।१० | पुणें. |
| ३ | जेष्ट | वद्य | ११।१२ | सासवड. |
| ४ | जेष्ट | वद्य | १३ | कापुरवळ. |
| ५ | जेष्ट | वद्य | १४ | शिरवळ. |
| ६ | जेष्ट | वद्य | ३० | लोणंद. |
| ७ | आषाढ | शुा | १ | तरडगांव. |
| ८ | आषाढ | शुा | २ | फलटण. |
| ९ | आषाढ | शुा | ३ | बरड. |
| १० | आषाढ | शुा | ४ | नातेंपोतें. |
| ११ | आषाढ | शुा | ५।६ | माळशिरस. |
| १२ | आषाढ | शुा | ७ | वेळापूर. |
| १३ | आषाढ | शुा | ८ | शेगांव. |

| | | | |
|---|---|---|---|
| १४ आषाढ | शुा | ९ | वांखरी. |
| १५ आषाढ | शुा | १० | रात्रीं श्रीपंढरीस. |

५. आळंदीप्रमाणें देहूहूनही पालखी जेष्ठ वद्य ८ लाच निघते. दोन्ही पालख्या पुण्यास एक होतात, सासवडापर्यंत एकत्र जातात, व तेथून त्यांचे मार्ग पुन्हां निराळे होतात. तुकोबांची पालखी बारामतीच्या मार्गे जाते. सर्व पालख्या वाटेनें चालल्या म्हणजे प्रत्येक मुक्कामाला आणखी वारकरी येऊन तिला मिळतात. नदी उगमापाशीं लहान असते. पण तिला दुसऱ्या नद्या, ओहोळ व नाले जसजसे मिळत जातात, तसतसें तिचें पात्र विस्तीर्ण होत जातें; त्याप्रमाणें या पालख्यांना वाटेंत शेंकडों दिंडीवाले व यात्रेकरू दर मुक्कामास येऊन मिळतात व त्यांचा समुदाय वाढत जातो, तो पंढरी जवळ आली म्हणजे दीड दोन लाख लोकांचा समुद्रप्राय जमाव एकवट होतो. वाखरी व शेगांव यांच्यामध्यें सर्व पालख्या जमल्या म्हणजे पंढरीहून नामदेवरायांची पालखी व पंढरीचे लोक त्यांना सामोरे जातात. आषाढ शुद्ध १० स रात्रीं १२ वाजतां हा सारा प्रचंड समुदाय पंढरीस जमा होतो व पांडुरंगाला वेढा देऊन पूर्णिमेच्या काल्यापर्यंत बसतो!

६. दिंडीपताकावाल्यांचे म्ह० पालख्यांचे मुक्काम अगदीं ठरून गेले आहेत. अमक्या दिवशीं अमुक वाजतां अमुक ठिकाणीं मुक्काम व्हावयाचा हे ठरून गेलें आहे. वारकऱ्यांपाशीं घड्याळें नाहींत, पण ते बिनबोभाट ठरीव जागीं ठरीव वेळेला हजर राहतात. प्रत्येक मुक्कामास सभोंवारच्या गांवचे लोक वारकऱ्यांसाठीं भाकऱ्या घेऊन गाड्याच्या गाड्या भरून येतात. कोणीही यात्रेकरू उपाशीं राहत नाहीं! आमच्या समाजांत वारकऱ्यांविषयीं एवढी पूज्यबुद्धि व प्रेम आहे कीं, तो घरून पताका घेऊन बाहेर पडला कीं, त्याला पंढरीस नेऊन घालण्याची व परत पोंचविण्याची सर्व जबाबदारी समाज आपल्या शिरावर घेतो. वाटेंत कोणापाशीं घोडा असला तर त्याच्या दाणापाण्याची सोय होते. पालखी एका मुक्कामाहून हलावयाची

असली म्हणजे तीन वेळां शिंग फुंकतात. पहिल्या शिंगाला लोक सावध होऊं लागतात. दुसऱ्या शिंगाला पालखीभोंवतीं जमतात, व तिसऱ्या शिंगाबरोबर "पुंडलीक वरदे हारिविठ्ठल" एकदम होऊन पालखी चालूं लागते! एका पालखीबरोबर अनेक दिंड्या असतात. एकंदर दिंड्या शंभरांवर असतील. ज्ञानोबांच्या पालखीबरोबर बारा पंधरा दिंड्या असतात. दिंडी म्हणजे वीणा. वीणाधारी मुख्य बोवा जे असतात त्यांचे शिष्य व अनुयायी त्यांच्या दिंडीबरोबर असायचे. ते आपली दिंडी सोडून दुसऱ्या दिंडींत जायचे नाहींत. ज्ञानोबांच्या पालखीपुढें पहिली दिंडी म्हणजे पालखीच्या दांडीपुढची दिंडी हैबतरावांची असायची; दुसरी राजूरकरांची, तिसरी शेडग्यांची; याप्रमाणें सर्व दिंड्या आपापल्या अनुयायांसह क्रमाक्रमानें जातात. दंगेधोपे होत नाहींत. संथपणानें विठ्ठलनामाचा साद घालीत दिंड्या पालखीबरोबर चालत असतात. वारकरी एकमेकांच्या सोयीकडे नेहमीं लक्ष देतात. वर ज्ञानोबांच्या पालख्यांचे जे मुक्काम दिले आहेत, त्यांत सहावा मुक्काम आजवर अंदुरीचा होता. पण जवळच्या लोणंद स्टेशनावर शहापूर बेळगांवकडचे वारकरी उतरतात म्हणून त्यांच्या सोयीसाठीं त्यांनीं अंदुरी सोडून दिली व सहावा मुक्काम लोणंदचा केला! दीड दोन लाख यात्रा पंढरीस जमली म्हणजे सर्वजण आपापल्या फडावर जातात. एवढ्या प्रचंड समुदायांचे अध्यक्ष कायमचेच सर्व संतांनीं एकमतानें एकदांच नेमून टाकले आहेत! निळोबारायांनीं सांगितल्याप्रमाणेंः—

**हा गे पहा विटे उभा। सच्चिदानंदाचा गाभा ॥ १ ॥**
**देखे सकळांचेही भाव। अध्यक्ष हें यांचे नांव ॥ २ ॥**

१९. या यात्रेमध्यें 'रंगण' हा एक प्रसंग मोठा पाहण्यासारखा असतो. साऱ्या यात्रेंत रंगणाचे प्रसंग दोन तीन येतात. पण त्यांतहि पंढरीजवळ वाखरी आणि शेगांव यांच्या दरम्यान जें रंगण धरितात, तितका आल्हादक दुसरा प्रसंग क्वचितच असेल! मध्यभागीं सर्व पालख्या ठेवून त्यांच्या सभोंवार झेंडे व पताका रोंवतात, पुष्कळ अंतर ठेवून

अतिविस्तृत व अफाट असे चौफेर टाळकरी उभे राहतात, व नामस्मरणाचा जयघोष चालवितात. तेव्हां भाविकांच्या चित्ताला जो शुद्ध प्रेमानंद होतो तो शब्दांनीं काय वर्णावा ? तेवढ्या वेळेपुरती तरी सर्व संसाराची पूर्ण विस्मृति पडते व जीव 'एक अद्वितीय अशा सच्चिदानंदस्वरूपाचा' अनुभव घेतो.' टाळ दिंडी घेऊन हातीं । विठ्ठलराज गाऊं गीतीं ॥' अशी सर्वांची भावना होऊन जातें. जाणीवशहाणीव साऱ्या गुंडाळून ठेवून एका 'भगवत्प्रेमानें' बेहोष होऊन वारकरी एकदां आनंदानें नाचूं लागले म्हणजे प्रेक्षक कितीहि पाषाणहृदयी असला तरी विरघळून जातो. भक्तिसुखाचा सोहळा पंढरीसारखा कोठेंही ब्रह्मांडांत नाहीं. अमृताला कंटाळून अमर या नामामृतासाठीं नरदेहाची वांछा करितात. नरदेहांत येऊन जीवानें भक्तिप्रेमामृताचें प्राशन केलें नाहीं तर तो देह श्वानसूकराच्या देहाहून श्रेष्ठ आहे असें मानतां यावयाचें नाहीं. कर्मठपणाचा किंवा जाणतेपणाचा अभिमान नाशाला कारण होतो. भक्तिसुखांत देहभान तर काय,. पण देहभावनाही उरत नाहीं. 'प्रसंगीं या नाहीं देहाची भावना' असें तल्लीन होऊन भक्तमंडळ जेव्हां पंढरीच्या वाळवंटांत भक्त्यानंदानें उन्मत्त होत्साते विठ्ठलरूप होऊन प्रेमपडिभरानें नाचूं उडूं लागतें तेव्हांचा तो आनंद अनिर्वचनीय आहे. म्हणून तुकाराममहाराजांनीं मथळ्यावर दिलेल्या अभंगांत सांगितलें आहे कीं, "संसाराला—देहादि प्रपंचाला—आलेल्या जीवांनो ! पंढरीस जा. सर्व प्रकारचे ताप नाहींसे करणारा दीनदयाळ पांडुरंग विटेवर उभा आहे. तुमच्या भेटीची त्याला आवडी आहे ! त्याचें दर्शन होतांच मागील पापतापांचा परिहार होतो व पुनः दुःख औषधालाही शिल्लक राहत नाहीं ! श्रीविठ्ठल एकदां कां तुमच्या हृदयमंदिरांत बसला म्हणजे त्रिविध तापादि शत्रूंच्या हातीं तुह्मांला कधीं देणार नाहीं, हा माझा अनुभव मी तुम्हांला सांगता आहें."

---

# १२ होळी.



**होळीमध्यें खाजें आहे । तें तूं विचारूनि पाहे ॥ १ ॥**

—रामदास.

१. पुढील आठवड्यांत शिमग्याचा सण आला आहे. हा सण आपापल्या समाजांत निदान दोन हजार वर्षांचा जुना आहे. गाथासप्तशती नांवाचा एक प्राकृत भाषेंतला ग्रंथ शालिवाहन शकाच्या प्रारंभींच लिहिला आहे, त्यांत ‘ फाल्गुनोत्सव ’ व ‘ धुळवड ’ यांबद्दल स्पष्ट उल्लेख आहेत. ‘ कलौ वेदांतिनो भ्रांति फाल्गुने बालका इव ’ हें वचन प्रसिद्धच आहे. दोन हजार वर्षांपूर्वीं महाराष्ट्रांत जो शिमग्याचा सण होत असे, त्यांत मर्दानीपणा ज्यास्त असे. पुरुषांना स्त्रियांचीं सोंगें देण्याची तेव्हां चाल नव्हती. कलावंतिणीच विलासी जनांच्या मनोरंजनाचें काम करीत असत. रंगपंचमीच्या दिवशीं रंग खेळण्याची चाल तर रजपुतान्यांतून महादजी शिंदे यांनीं दक्षिणेंत आणली म्हणून म्हणतात. सवाईमाधवराव रंग खेळले त्यावेळचा पोवाडा आपल्या इकडे कुलीन स्त्रियांनासुद्धां पाठ असेल. अलीकडे या सणांतला पुष्कळ अश्लीलपणा कमी होत चालला आहे, हें सुचिन्ह आहे.

२ श्रीसमर्थ रामदासस्वामी यांनीं ‘ होळीपंचक ’ म्हणून एक प्रकरण केलेलें बहुतांच्या पाहण्यांत असेल. पूर्णिमेच्या दिवशीं होळी पेटवून तिच्यांत खोबरें टाकायचें व होळीला प्रदक्षिणा घालून ........ उच्चार करून बोंब ठोकायची रीत आहे. ह्या विधीचें रहस्य समर्थ सांगतात:—

[ १ ]

**अवघेचि बोंबलती । होळीभोंवते भोंवतीं ॥ १ ॥**
**मायाहोळी प्रज्वळली । सृष्टिवेढारें लाविली ॥ २ ॥**

ज्या कारणें मुंडाळिती । तेंचि वाचे उच्चारिती ॥ ३ ॥
होळीमध्यें खाजें आहे । तें तूं विचारूनी पाहे ॥ ४ ॥
खाजें खातां सुख होये । परि तें कठिण होतां नये ॥ ५ ॥
खोल दृष्टीनें पाहिलें । खाजें त्याच्या हातां आलें ॥ ६ ॥
एक आपणाचि खाती । एक सकळांतें वाटिती ॥ ७ ॥
रामीं रामदास होळी । केली संसाराची धुळी ॥ ८ ॥

[ २ ]

अजुनि कायरे दुश्चिता । सावधान होईं आतां ॥ १ ॥
नागवीलें योनिद्वारें । म्हणोनि बोंबलतीं पोरें ॥ २ ॥
धुळी टाकिती मस्तकीं । कोणी दाद घेईना कीं ॥ ३ ॥
राडीऐसे नर्क होती । म्हणोनि प्रत्यक्ष दाविती ॥ ४ ॥
धरूनि अकस्मात नेती । अवघीं कौतुकें पाहतीं ॥ ५ ॥
घरोघरीं फेरे करिती । तैशा होती पुनरावृत्ती ॥ ६ ॥

याचा अर्थ स्पष्टच आहे:—" माया होळी पेटली असून तिच्या सभोंवार सर्व प्राणी प्रदक्षिणा घालून बोंब ठोकतात. ब्रह्मांडकोटी व अमित सृष्टि त्या होळीमध्यें जळून भस्म होत आहेत. 'ब्रह्मांडकोटयो नष्टाः सृष्टयो बहुशो गताः' बाह्यतः सारा मायेचा बाजार पसरलेला आहे तरी अंतर्गत सूक्ष्म ब्रह्मस्वरूप कोंदाटलें आहे, त्याचा तूं नीट विचार कर. माया परती सार व नित्यानित्यविवेक ठेवून ब्रह्म तेवढें खाजें आहे तें आपल्या हातानें काढून घे. ब्रह्मसुख भोगतांना परमानंद आहे, पण तें प्राप्त करून घेणें फार कठीण आहे. 'हरिभक्ति आहे सुळावरिल पोळी.' लोखंडाचे चणे खावे लागतात तेव्हां ब्रह्मपदीं नाचण्याचा अधिकार येतो. ब्रह्मतत्व विवेकानेंच जाणायला पाहिजे. जो सूक्ष्मदृष्टीनें पाहील त्याच्याच हातांत हें खाजें येणार आहे. कित्येक महंत सह्याद्रीच्या किंवा हिमालयाच्या शिखरावर किंवा गुहेंत बसून एकटेच हें खाजें खातात; कित्येक परोपकारी संत हें खाजें साऱ्यांना वाटतात ! बापा, अजून तरी सावध हो. 'अहन्यहनि भूतानि गच्छन्तीह यमालयं,' प्रत्यहीं असंख्य जीव यमधानीजवनिकेच्या आंत जातात, हें डोळ्यानें पहात असून तुझी देहबुद्धि अद्याप कशी सुटत नाहीं ? देह हा ओल्या

मातीचा गोळा आहे, याचा भरंवसा काय मानतोस ? कडकडीत वैराग्य धारण कर. हीं पोरें पहा, योनिद्वारें आम्हांला बुडाविलें म्हणून बोंबलत आहेत. आईबाप, बंधुभगिनी, इष्टमित्र कोणीही या यातनेंतून तुला सोडवीत नाहींत, 'सोडवीना राजा देशींचा चौधरी,' म्हणून हीं मुलें डोक्यावर धूळ उडवून घेत आहेत. मुलें अनेक खेळ खेळत आहेत, पण त्यांतसुद्धां खोल अर्थ आहे. 'होळीच्या गौऱ्या पांच पांच' असें ओरडत हीं मुलें घरोघर फेऱ्या करून तुला काय शिकवितात ? देह पंचमहाभूतांचा असल्यामुळें व तो अखेर होळींतच (सरणांत) जाऊन पडणार असल्यामुळें मुलें पांच गौऱ्या मागतात, व घरोघरच्या फेऱ्या करून देहांतरें सुचवितात, म्हणून समर्थ जीवाला बोध करितात कीं, 'बाबारे ! देहबुद्धि सोडून सावध हो, व होळीमधलें खाजें विवेकानें काढून घे व तें स्वतः खाऊन सकळांतें वाटावयाचा सदुद्योग करण्यांत आयुष्याचें सार्थक कर."

समर्थांनीं होळीची उपपत्ति याप्रमाणें लाविली आहे. हीच उपपत्ति खरी आहे अशी आमची समजूत आहे. आमच्या धर्मप्रधान देशांत उत्सव, सण वगैरे प्रसंगसुद्धां धर्मबुद्धि वाढविण्यासाठींच योजलेले आहेत. मानवी आयुष्याची क्षणभंगुरता व नश्वरता लोकांच्या मनांत बिंबवून त्यांना वैराग्यसंपन्न करावें या उदात्त हेतूनें होळीचा सण आमच्या समाजांत रूढ केलेला दिसतो. कित्येक फाजील नाजुक प्रकृतीच्या लोकांना त्यांत इथूनतिथून सारा अश्लीलपणा दिसतो. समाज आहे तेथें कांहीं दांडगेपणा राहणारच. बारा महिन्यांत सारा समाज सारखा पोक्त, गंभीर, व वेदांती राहूं शकणार नाहीं. प्रत्येक देशांतल्या चालीरीतींत कांहीं विशेष मोकळेपणाचे व उद्धटपणाचे प्रसंग असतातच. आपल्या देहांत सुद्धां सर्वच भाग कांहीं ज्ञानेंद्रियें नाहींत. देहाचे सर्व भाग कांहीं नेत्राइतक्या नाजुक व उदात्त रचनेचे नाहींत. खरे राष्ट्रनायक सर्वबाजूंनीं समाजाचा पोक्तपणानें विचार करितात. समाजसुधारकांनीं सामाजिक चालीरीतींत चांगुलपणाचा भाग आहे तो ठेवून वाईट भाग काढून टाकण्यास अवश्य झटावें.

---

# १३ भक्तिमीमांसा.



**विटे ऐसें दुख नोहे भक्तरस । पुढतींपुढती आस सेवावें हें ॥ १ ॥**

—तुकाराम.

१ह्या विषयाकडे आमच्या लोकांचें लक्ष जाणें अवश्य आहे. प्रस्तुतच्या राजकीय क्षोभाच्या धामधुमींत भक्तीसारख्या शांत व उदात्त विषयाकडे लोकांचें लक्ष जितकें वेधेल तितकें हवें आहे. हा विषय सर्वकालीन व सर्व लोकांचा आहे. शांतकाळीं भगवद्भक्ति पाहिजे, तशी ती राष्ट्रीय आपत्तींच्या प्रसंगींही पाहिजे. मनुष्यदेहाचें खरें सार्थक परमात्मप्राप्तींतच आहे. राजकारण उदंड केलें, तरी परमार्थावांचून त्याला शोभा नाहीं. कीर्ति विपुल मिळविली तरी हरिभक्तीवांचून समाधान नाहीं. आमच्या सुविद्य देशभक्तांचें लक्ष या महत्त्वाच्या विषयाकडे जर पूर्णपणें वेधेल व हरिभक्तीचा जिव्हाळा त्यांचे ठायीं उत्पन्न होईल तर त्यांचें राजकारणही पूर्ण यशस्वी होऊन त्यांना इहलोकीं स्वराज्य व परलोकीं परमानंद प्राप्त होईल. म्हणून आजच्या प्रसंगीं भक्तिची मीमांसा करण्याचें आम्हीं योजिलें आहे.

‘ एकमेवाद्वितीयं ब्रह्म ’ असें जें स्वस्वरूप त्याची ओळख पटायच्या मार्गाला तीव्र उत्कंठतेनें लागणें हें परमभाग्य होय.

[ १ ] **तरीच जन्मा यावें । दास विठ्ठलाचें व्हावें ॥ १ ॥**
**नाहीं तरी काय थोडीं । श्वानसूकरें बापुडीं ॥ २ ॥**

[ २ ] **जाणे भक्तीचा जिव्हाळा । तोचि देवाचा पुतळा ॥ १ ॥**
**आणिक नये माझ्या मना । हो कां पंडित शहाणा ॥ २ ॥**

देवाच्या भक्तींत ज्या अवीट प्रेमसुखाची प्राप्ति होते, त्याचा अंशांश सुद्धां पृथ्वीवरील सर्व वैषयिक सुखांच्या समुच्चयांत नाहीं. ‘ बहुता सुकृताची जोडी ’ झाल्यावरच ‘ विठ्ठलीं आवडी ’ उत्पन्न होते. भक्तिभावाचा ओलावा हृदयांत उत्पन्न झाला कीं, मनुष्याच्या

अंतःस्वरूपांत पूर्ण फरक पडतो. तो 'द्विजन्मा' होतो किंवा त्याचा पुनर्जन्म होतो. तो पूर्वींचा दुःखी, अज्ञ, निराधार व पापी जीव रहात नाहीं, प्रतिक्षणीं ईश्वरीप्रेमाच्या नव्या नव्या अनुभवाबरोबर त्याचे मनःसंस्कार निर्विषय व पावन होत जातात, त्याच्या आत्म्याची व्यापकता वाढत जाते, त्याच्या हृदयभूमीवर दैवीसंपत्तीचे गुण उगवतात व त्याचें पूर्ण रूपांतर होत होत तो पशूंचा मनुष्य व मनुष्याचा देव बनत असतो! त्याला कोठेंही एकलकोंडेपणा वाटत नाहीं, तर आपल्या नित्य संगतींत व आपल्या पाठीशीं आणखीं कोणी समर्थ आहे असा विश्वास त्याच्यांत उत्पन्न होऊन त्याची निर्भयता वाढते. सत्वसंशुद्ध व निर्मलभक्तिपूत झालेल्या ह्या भाग्यवंत जीवाला सर्वात्मकपणाचा भोग घडूं लागून अद्भुत आनंदाचा अखंड वाहणारा झरा आपल्याच हृदयांत आहे हें कळून येतें व त्याच्या अंतर्वृत्ति त्या आनंदांत नेहमीं बुडून जात असल्यामुळें त्याच्या दिव्य डोळ्यांला जग आनंदमयच दिसूं लागतें. 'मग देखे, ऐके, त्वचे आढळे जो जो रस चाखे' त्या त्या प्रत्येक गोष्टींत त्याला परमात्म्याची सत्ता दिसूं लागून ताचे त्याचा ध्यास दुणावत जातो. ही निष्ठा वाढली म्हणजे नको म्हटलें तरी देव त्याला सोडीत नाहीं, किंबहुना 'भक्त तोचि देव' ही गुज गोष्ट उघडकीस येऊं लागते व 'वेद जाणूं गेला पुढें मौनावला' तें गुह्य त्याच्या घरीं खेळतें, रांगतें, पोर होऊन बसतें! असा हा परमात्मा 'स्थिर भक्तियोग सुलभ' आहे. वेद, यज्ञ, कर्म, ज्ञान, तप, धर्म, गति—सर्व वासुदेवपर आहे अशी भक्ताची निष्ठा असते. कर्मनिष्ठा व ज्ञाननिष्ठा यांनीं भक्तिच साधावयाची आहे. भक्तिरंगांत सगुण निर्गुण एकमय होतें.

३ कोट्यवधि जीवांत भक्त एखादाच असतो. ईश्वरी प्रेमाच्या अमृतांत निरंतर तळपणारा मीन अत्यंत विरळ! विषयी जीवाची विषयांच्या ठिकाणीं जी उत्कट प्रीति असते तीच त्याची निर्विषय प्रभूच्या ठिकाणीं असणें याचें नांव भक्ति! 'सा परम प्रेमरूपा अमृतस्वरूपा च!' देवाच्या स्मरणांत आनंद व विस्मरणांत विव्हळता

ज्याला वाटते तो भक्त. 'तुझा विसर न व्हावा' हेंचि देवापाशीं मनःपूर्वक दान मागतो तो भक्त. भगवान् स्वमुखानें सांगतातः—

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।**
**मामेवैष्यासि सत्यं ते प्रतिजाने प्रियोसि मे ॥ गीता अ० १८–६५**

४ विषयांत रंगलेल्या मनाला विषयपराङ्मुख करून परमेश्वराकडे वळविण्याचें काम भक्तिभावाच्या योगानें फार लवकर होतें. जीव अज्ञानांत बुडालेले आहेत, व प्रतिक्षणीं विषयांत मुरलेलीं इंद्रियें त्यांस स्वस्वरूपापासून दूर नेतात. मन हें विषयाविषवृक्षावर अहर्निश भटकणारें एक माकड आहे! तथापि दुःसंगतीनें भ्रष्ट झालेल्या या मनालाही भजनानंदाची गोडी एकदां लावून दिली कीं तें मनच प्रभुपायीं मुरडून बसेल. 'मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयोः' मनाला विषयांच्या व्यसनांतून युक्तीनें सोडवून निर्विषयाचें व्यसन मात्र लावून दिलें पाहिजे. हें महत्कार्य भक्तिभावानेंच उत्तम होतें. मनोरूपी घोरपडीला परमेश्वराकडे उन्मुख करावें म्हणजे तें आपल्या ओढीनेंच ब्रह्मपर्वताचा कडा गांठल्याशिवाय राहणार नाहीं! नवविधा भक्तीच्या नऊ पायऱ्या चढून गेल्यावर आपणच अखंड स्वरूपाकारपणें नांदूं लागूं, पण मन वश झाल्याशिवाय सर्व फुकट आहे. मनाची तगमग मोडली नाहीं तोंपर्यंत विवेकवैराग्यादि गुण अंगीं बाणणार नाहींत. म्हणूनः—

**मन आधीं मुंडी, वासनेतें दंडी, । विठ्ठल ब्रह्मांडीं एक आहे ॥१॥**

अशा चंचल मनाला भक्तिप्रेमाची शर्करा चाखवून तेथेंच त्याला थोपवून धरावें. गति व अधोगति दोन्ही देणारें मनच आहे. मनाला जिंकल्यावांचून देवपण हातीं येणार नाहीं. आसनीं, शयनीं, एकांतीं, लोकांतीं, सर्व काळ भगवंताचें नाम गाण्याचा वाचेला व्यासंग लावून द्यावा म्हणजे नामप्रतापानें व प्रभुध्यानानें मनही वश होतें.

**तुझें कुशल नाम बा ! हळुहळू मना आकळी ।**
**दुरत्यय असा महा-खळहि त्यास भी हा कळी ॥** —केकावली ७४

हा सर्व साधकांचा अनुभवच आहे. विषयांपासून, मिथ्या जगा-

पासून परतल्याशिवाय सच्चिदानंदप्रभूची प्राप्ति नाहीं. हें परतणें मनानें मुरड खाल्ल्याशिवाय शक्य नाहीं व मनाला मुरडायला लावावयाचें सामर्थ्य भगवद्भक्तीशिवाय कशांतही नाहीं ! भगवद्भक्तीच्या सुखाचा वारा मनाला जसजसा लागत जातो, तसतसें तें खालच्या क्षुद्र विषय-सुखाला कंटाळतें, त्याला तुच्छ मानूं लागतें, व निवांतपणीं शुद्ध-चित्तानें अनंत व अपार अशा भक्तिप्रेमानंदाच्या महासागरावर तरंगूं लागतें. मनुष्य सुखासाठीं धडपडत असतो, व विषयांच्या दारीं कुत्र्याप्रमाणें राबूनही विषयांच्या हाडांतून कांहीं रस गळत नाहीं हें जेव्हां त्याला पूर्व सुकृतानें कळतें, तेव्हांच तो तीं विषयांचीं हाडें चघ-ळण्याचें सोडून देतो ! हाडांत रस नाहीं हें मनुष्याला दिसतें, पण त्यांत रस आहे अशा भ्रांतीनें कुत्रें मिटक्या मारमारून तें चघळीत असतें ! विषयी मनुष्याची अशीच अवस्था असते. विषयांच्या ठिकाणीं सुखभ्रांति आहे तोपर्यंत तो विषय सोडणार नाहीं. विषयाचीं हाडें चघळतां चघळतां दांत दुखून पडायची वेळ आली म्हणजे तो तीं टाकून देतो, मग त्याला कळतें कीं जें आपणास प्रिय आहे तेंच श्रेयस्कर आहे असें नाहीं ! उपनिषदाच्या भाषेनें सांगायचें म्हणजे जें प्रेयान् आहे तें श्रेयान् नाहीं. मनाला एकीकडून विषयांचा वीट येत राहणें व दुसरीकडून शुद्धतर, अनिर्वाच्य व अनुभवैकगम्य अशा दिव्य सुखाचा अनुभव येत जाणें ह्या दोन्ही गोष्टी एकदम भगद्भक्ती-च्या योगानें प्राप्त होतात. हा भक्तीचा एक महदुपयोग व महदुपकार आहे.

५ पण भक्ति ओलाव्याची—जिव्हाळ्याची—पाहिजे. “ माझा ज्याला सप्रेम अनुराग आहे, माझ्या स्वरूपावांचून ज्याच्या बुद्धीला दुसरा विषय नाहीं, माझ्या संकल्पावांचून ज्याचें मन दुसरें कांहीं जाणत नाहीं, माझ्या प्रेमावांचून ज्याच्या इंद्रियांला दुसरें कांहीं प्रिय नाहीं, असा जो परमभक्त “ तयाचें आह्मां व्यसन । आमुचें तो निजध्यान. ” इतका तो भगवंताला प्रिय असतो. ज्ञानेश्वरमहा-राज भक्तांची स्थिति वर्णितातः—

**जयांचिये वाचे माझे आलाप । दृष्टी भोगी माझेंचि रूप ।**
**जयांचा मन संकल्प । माझाचि वाहे ॥ ४४५ ॥**
**माझिया कीर्तिवीण । जयांचे रिते नाहीं श्रवण ।**
**जयां सर्वांगीं भूषण । माझी सेवा ॥ ४४६ ॥**

ते आणखी म्हणतात:—

**मग मींचि डोळां देखिला । जिहीं कानीं मींचि ऐकिला ।**
**मींचि मनीं भाविला । वानिला वाचा ॥ ३५९ ॥**
**सर्वांगीं सर्वांठायीं । मीच नमस्कारिला जिहीं ।**
**दानपुण्यादिकें जें कांहीं । तें माझियाचि मोहरां ॥ ३६० ॥**
**जिहीं मातेंचि अध्ययन केलें । जे आंतबाहेरि मियांचि धाले ।**
**जयांचें जीवित्व जोडिलें । मजचिलागीं ॥३६१॥** (ज्ञाने० अ० ९).

'जे आंतबाहेरि मियांचि धाले' त्या सद्भक्तांचें पूर्णभाग्य कोण वाखाणील ? ज्यांना हरिभक्तीचेंच भूषण, हरिलोभामुळेंच जे *लोभी*, हरिकामामुळेंच जे सकाम, हरिविस्मरणप्रसंगींच जे सक्रोध, असे जिव्हाळ्याचे भक्त फार फार दुर्मिळ आहेत ! अंतरापासून हरिप्रेमाची आस्था म्हणजे उत्कंठा वाटावयास लागली म्हणजे हरिभक्तांच्या माळिकेच्या तळच्या वर्गांत बसावयाचा अधिकार प्राप्त झाला असें समजावें !

६ परमात्मा एकच आहे व कोणत्याही देवतेची अनन्यसेवा केली तरी त्या 'एक अद्वितीय ब्रह्मालाच' पोंचते. श्रुति स्पष्ट सांगते:—

**एको देवः सर्वभूतेषु गूढः सर्वव्यापी सर्वभूतांतरात्मा ।**
**कर्माध्यक्षः सर्वभूताधिवासः साक्षी चेताः केवलो निर्गुणश्च ॥ १ ॥**

'येप्यन्यदेवताभक्ताः' [ गीता ९—२३ ] ह्या श्लोकांत किंवा 'सर्वदेवनमस्कारः केशवं प्रतिगच्छति' ह्या श्लोकांत तरी हेंच रहस्य सांगितलें आहे.

**गोविंदा तूं जळ मी तेथें कल्लोळ । असो सर्व काळ ऐक्यसूखें ॥ १ ॥**

अशा प्रकारचे एकात्मतेचे उद्गार हे एकांत भक्ताचे उद्गार आहेत. 'आतां जाऊनि कोठें पाहूं । जिकडे पाहूं तिकडे देवू !' अशी अवस्था होणें,

परमात्म्याच्या अनंतत्वविभूत्वादि गुणचिंतनांत जीवभाव विरघळून जाणें, अंतर्बाह्य अवघा हरि कोंदाटलेला आहे ही प्रतीति येऊन स्वसुखसुखी होणें हीं एकांतभक्तीचीं लक्षणें होत. 'एकांतभक्ति गोंविंदे या सर्वत्र तर्दीक्षणम्' ( श्रीभागवत ७–७–५५).

७ संसारांतून आपली सोडवणूक व्हावी, भगवंतानें आपल्यावर प्रसादपट टाकावा अशी खरी खरी आस्था, उत्कंठा, आतुरता पाहिजे. विवेकानंद स्वामी एकदां म्हणाले होते कीं, " बहुतेक सर्व लोक नास्तिकच आहेत ! पाश्चात्य लोकांत केवळ जडवादी असे नास्तिक अतिशय आहेत, पण मला एक प्रकारें त्याबद्दल आनंदच होतो. कारण ते नास्तिक तरी खरे आहेत ! जे आस्थाशून्य असून धर्माच्या गप्पा मात्र ठोकतात व धर्माच्या गोष्टींवर वितंडवाद करून निष्कारण रणें माजवितात, पण धर्मतत्व करून घेण्याची जे खटपट करीत नाहींत व ईश्वरी प्रेमाचा ओलावा ज्यांच्या हृदयांत लवमात्र वसत नाहीं अशा दांभिकांपेक्षां ते शतपटींनें बरे ! " समर्थांनींही म्हटलें आहे:—

**देवावांचूनि कांहीं नाहीं । ऐसें बोलती सर्वहि ।**
**परी त्यांची निष्ठा कांहीं । तैसीच नसे ॥ १ ॥**

जीवनावांचून मासोळी जशी तळमळते, अन्नावांचून प्राण जसा कासावीस होतो, मातृवियोगी पोर जसें घाबरें होतें तशी ईश्वरप्राप्तीची कासाविशी पाहिजे. ईश्वरप्राप्तीच्या अभावीं घरदार, इष्टमित्र, हें सर्व ओकें वाटलें पाहिजे. परमेश्वर हा पिंडांतला व ब्रह्मांडांतला प्राण आहे व त्यावांचून सारें विश्व प्रेतवत् आहे, अशी भावना पाहिजे. विद्यार्थी परीक्षेसाठीं रात्रंदिवस जागून जी जिवाची आटापिटी करितात, कारकून व नौकर लोक यजमानाची तब्बेत सांभाळण्यासाठीं जसे धडपडतात, स्त्री पतीच्या संतोषासाठीं जशी कायावाचामनोभावें झटत असते, कृपण आपल्या धनाला जसा जपतो, ती आटापिटी, ती धडपड, ती जपणूक जर परमेश्वराविषयीं आपल्या मनांत उत्पन्न होईल तर हा सर्व संसार आनंदरूप होईल ! भक्त-

कांहीं घरदार, बायकापोरें यांना सोडून देत नाहीं, पण हें सर्व परमेश्वराचें आहे व आपण निमित्तमात्र आहोंत ही जागृति निरंतर ठेवून कर्मयोगी होतो. ' निर्मळ निश्चळ विठ्ठलीं विश्वास ' अगत्य पाहिजे.

**सकळ जीवांचा करतो सांभाळ । तुज मोकलील ऐसें नाहीं ॥ १ ॥**
**जैसी स्थिति आहे तैशापरी राहे । कौतुक तूं पाहे संचिताचें ॥२॥**

अशा वृत्तीनें सर्व संसार देवापायीं वाहून तो संसारांतच राहतो. देवाला तुमचें कांहींएक नको, तो केवळ प्रेमाचा भुकेला आहे. देवावर प्रेम केल्यानें तें तुम्हांलाहि अमृतरूप होतें, व अन्य जीवांकडे परमात्मभावानें पाहण्याची त्यायोगें संवय झाल्यानें सर्व जीवांनाही तें आनंददायक होतें. संतांच्या गांवीं प्रेमाचा सुकाळ असतो व दुःखाचा लेशही नसतो हें अगदीं खरें आहे. ईश्वराकडे ओढ घेण्याचा चित्ताला व्यासंग लावून द्यावा. ' मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय' ( गीता १२–८ ). एकदां जीवानें गोडी घेतल्यावर मग तें सोडणार नाहीं. एकदां एक शिष्य गुरूकडे गेला व मला धर्मतत्व शिकवा म्हणून त्यास म्हणाला. गुरूनें तें रोज ऐकावें पण कांहीं बोलूं नये. एके दिवशीं त्या शिष्यानें गुरूची पाठ पुरविली; तेव्हां गुरूनें शिष्यास आपल्या बरोबर गंगास्नानास नेलें. शिष्यानें पाण्यांत बुडी मारली हें पाहून गुरूनें त्याचें डोकें पाण्यांतच खालीं दाबलें ! शिष्यानें बरीच धडपड केली तरी त्यानें त्याला वर उसळी मारूं दिली नाहीं. त्याचा प्राण कासावीस झालासें पाहून मग त्यास सोडलें. पाण्यावर डोकें येतांच त्याला धीर आला व बरें वाटलें. तेव्हां गुरूनें विचारलें, " पाण्यांत बुडाला होतास तेव्हां तुला सर्वांहून अधिक प्रिय अशी कोणती वस्तु पाहिजे होती ? " शिष्यानें ' वारा ' म्हणून उत्तर केलें. तेव्हां गुरुजी म्हणाले, "इतकी कासाविसी ईश्वरप्राप्तीविषयीं तुझ्या मनाची झाली आहे काय ? जर झाली असेल तर माझ्या आश्रमांत चल. एका प्रहरांत ईश्व-

राची तुला ओळख करून देतों, नसेल तर याच पावलीं घरीं चालता हो !! " तात्पर्य,

**झुरोनि पांजरा होऊं पाहे आतां । येईं पंढरीनाथा! भेटावया ॥ १ ॥**

इतक्या दर्जाची आतुरता पाहिजे असेल तर श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या शब्दांनीं देवापाशीं एवढेंच मागावें:—

**परिमळाची धांव भ्रमर वोढी । तैसी तुझी गोडी लागो मज ॥ १ ॥**
**अविट गे माय विटेना । जवळी आहे परी भेटेना ॥ २ ॥**
**तृषा लागलीया जीवनातें वोढी । तैसी तुझी गोडी लागो या जीवा ॥३॥**
**बापरखुमादेवीवर विठ्ठलीं आवडी । गोडियेसी गोडी मिळोनि गेली.**

वर्ष २ रें, अंक ३७ वा.

———

# ७ भारती वीर.



**जातीनें अधम असो, घातकहि असो, असो महा घोर।**
**जो काय कृतप्रज्ञ, प्राज्ञमतें पुरुष तो जगीं थोर ॥ १ ॥**

—मोरोपंत.

१ मोरोपंतांनीं वरील आर्येत थोर वीरांचें सामान्य लक्षण सांगितलें आहे. वीर अनेक प्रकारचे आहेत, केवळ लढवय्यांनाच वीर ही संज्ञा लावतां येत नाहीं. युद्धकर्मांत जसे वीर असतात, तसे ते इतर सर्व कर्मांत असतात. सर्ववीरांत धर्मवीर, युद्धवीर व भाषावीर हे प्रमुख होत. पृथ्वीवरच्या सर्व देशांत सर्वकाळीं सर्व प्रकारच्या मनुष्यांत वीर निपजतात. वीर जसे उत्तम जातींत निपजतात तसे ते अधम जातींतही निपजतात. सत्कर्माचरणांत जसें वीरपण आढळतें तसें तें घातकर्मांतही आढळतें. दयाशीळपणाच्या कार्यांत जसें वीरपण प्रकट होतें तसें तें महाघोरपणाच्या कामांतही दिसतें. त्याचें लक्षण 'कृतप्रज्ञ' ह्या एका शब्दानें पंतांनीं दिलें आहे. कृतप्रज्ञ म्हणजे एका विषयाच्या ठिकाणीं ज्यानें आपली प्रज्ञा म्हणजे बुद्धि स्थिर केली आहे तो. ज्यानें आपली विषयवासना जिंकली, संसाराची निःसारता ओळखली, वृत्तींची चंचलता मोडली व एकाच उद्दिष्टाला आपलें तनमनधन म्हणजे सर्वस्व वाहिलें तो कृतप्रज्ञ ऊर्फ वीरपुरुष होय! खरे वीर जगांत फार विरळ असतात. आपण कशाला जन्मलों, कोणीकडे जाणार, आपलें पुढें काय होणार, याचा विचार न करितां खावें, प्यावें, ल्यावें, नेसावें, आलें तसें एक दिवस मरून जावें, असें बहुतेकांचें संक्षिप्त चरित्र आहे! पण आपल्या आयुष्याचें एक उद्दिष्ट एकदां ठाम ठरवून त्याच्या सुकाणूप्रमाणें वागण्याचा निर्धार करून तो कसल्याही आपत्तींतून पार पाडणें हें खऱ्या वीराचें लक्षण आहे. वीर कृतप्रज्ञ व स्थिरप्रज्ञ असतात. करारीपणा, निश्चयीपणा, प्रतिज्ञा किंवा यश यांचें रक्षण करण्यासाठीं

सर्वस्वाचा होम करण्याची तयारी, हें स्थिरप्रज्ञेशिवाय होणार नाहीं. आयुष्य क्षणभंगुर आहे, ही गोष्ट वीरांच्या मनावर बिंबलेली असल्यामुळें ते या पांचभौतिक पिंडाची प्रतिष्ठा मानीत नाहींत. दिलीपानें ( रघुवंश सर्ग २ ) म्हटल्याप्रमाणें:—

**एकांतविध्वंसिषु मद्विधानां पिंडेष्वनास्था खलु भौतिकेषु।**

केव्हां तरी एकदां ज्याची चिमुटभर राख होणार त्या पिंडाविषयीं वीरांची अनास्था असते, व म्हणूनच त्यांना मरणाची भीति वाटत नाहीं. देहाच्या अस्थिरतेविषयीं नित्य जागृति असल्यामुळें आपल्या जीविताची अमुक एक इतिकर्तव्यता आहे असें एकदां मुक्रर ठरवून वीर पुरुष आपली बुद्धि त्या इतिकर्तव्यतेला वाहतो, त्याच्या बुद्धीची चलबिचल होत नाहीं, त्याची प्रज्ञा एकनिष्ठतेमुळें स्थिर होते.

२ महाभारतकालीं भरतखंडांत कृतप्रज्ञ वीरांचा पाऊस पडला होता ! कौरवांचा असत्पक्ष होता व पांडवांचा सत्पक्ष होता, तरी दोन्ही पक्षांकडे वीरपुरुष होते. धर्म, अर्जुन, भीम, भीष्माचार्य, द्रोणाचार्य, कर्ण, दुर्योधन व अश्वत्थामा हे सर्व वीरपुरुष होते. भारतकाळांतील माणसें जिवंत होतीं, आजच्याइतकीं मेलेलीं नव्हतीं. आपण पांचचारच उदाहरणें घेऊं. ( १ ) प्रथम **धर्मा**कडे पहा. धर्म कमी शूर नव्हता, पण धर्माच्या भक्कम पायावर समाजाची इमारत उभी आहे, धर्मावांचून विश्वाला दुसरा आधार नाहीं, ही त्याची बुद्धि दृढ असल्यामुळें त्यानें धर्मापेक्षां पूज्य दुसरें कांहींच मानलें नाहीं. वनपर्वांत द्रौपदीनें व भीमानें त्याचा एवढा उपमर्द केला तरी ‘ प्राणांस तुम्हांसहि मी त्यजिन, न धर्मासि पळहि सोडीन ’ असेंच त्यानें त्यांस उत्तर केलें ! सत्वधीर व खऱ्या मार्गानें जाणाऱ्यांस चिरदुःख भोगावें लागत नाहीं व श्रीकृष्ण आपल्या भक्तांस मोकलीत नाहीं ही धर्मराजाची निष्ठा होती. धर्मराजाला एकदां ‘ नरो वा कुंजरो वा ’ म्हणून खोटें बोलावें लागलें, इतकेंच काय पण विराटघरीं मी धर्माचा आश्रित कंकभट आहें म्हणून त्यास सतत वर्षभर खोटें बोलावें लागत होतें ! ! थोरांतही दोष नसतात असें नाहीं. ‘ सर्वारंभा हि दोषेण धूमेनाग्नि-

रिवावृता: ' ह्या सिद्धांताप्रमाणें जो देहाला आला तो दोषगुणानें युक्त असतो हा सिद्धांत आहे. मनुष्याचें चरित्र गुणदोषयुक्त असणारच. मात्र एका उदात्त उद्दिष्टासाठीं तो आपल्या सर्वस्वाची होळी करायला सिद्ध झाला म्हणजे तो वीर या पदवीस पोंचतो. ह्या सिद्धांताप्रमाणें धर्मासाठीं प्राणांस, राज्यास व भावांसही सोडण्यास तत्पर असलेले धर्मराज वीरपुरुषच होत. धर्माच्या ठिकाणीं त्यांनीं आपली प्रज्ञा स्थिर केली होती. ( २ ) **भीमाची** गोष्ट अशीच आहे. दुःशासनानें द्रौप- दीची भरसभेंत विटंबना केली व वेणी धरून तिला सभेंत फरफरा ओढलें तेव्हां त्याचें रक्त पिण्याची भीमानें प्रतिज्ञा केली व ती घोर कर्मानें शेवटासही नेली. मनुष्यानें मनुष्याचें रक्त पिणें हें अत्यंत घोर कर्म होय. पण ह्या घोरकर्माबद्दल व्यासांनीं भीमाची आपल्या भारतांत कोठेंही निंदा केली नाहीं ! बहुतेक मराठी कवींनीं तर त्या घातकर्माचें कौतुकानें वर्णनच केलें आहे ! भीमानें दुःशासनाचा कंठनाल चरचर चिरला, व ' मटमट मिटक्या देऊन तो तें रक्त घटघट प्याला, ' हें महत्कृत्य त्यानें ' सत्य करावया बिरुद ' केलें, याबद्दल मोरोपंतादि मराठी कवींनीं भीमसेनाचें गौरवच केलें आहे. दुःशासनाचें रक्त पिऊन व दुर्योधनाच्या मांडीवर गदा मारून दुष्टांचा दुष्ट कृत्याबद्दल सूड उगविणें ही भारतीयुद्धारंभीं भीमसेनानें प्रतिज्ञा केली होती व ती त्यानें अखेरीस खरी करून दाखविली म्हणूनच तो वीर या संज्ञेस पात्र होतो. दुःशासनाचें रक्त प्याला म्हणून भीम वीर ठरत नाहीं, तर आपल्या प्रतिज्ञेसाठीं तो वीरश्रीनें लढला म्हणून तो वीर होतो. लांडगे वाघ, सिंह, हे दुसऱ्या प्राण्यांचें काय थोडें रक्त पितात ? पण व्यासांनीं त्यांचे पराक्रम भारतांत वर्णिले नसून भीमादिकांचेच वर्णिले, यांतील बीज येथेंच आहे. ( ३ ) **कर्णाची** गोष्ट अशीच आहे. उद्योगपर्वांत श्रीकृष्णाची शिष्टाई फुकट गेल्यावर कर्णाला भेद करून पांडवांकडे ओढण्याचा कृष्णानें प्रयत्न केला तेव्हां कर्णानें जें बाणेदारपणाचें उत्तर दिलें तेथें त्याचें खरें वीरपण दिसून येतें. ' तूं कुंतीचा कानीन म्हणजे कुमारावस्थेंत झालेला पुत्र आहेस, पांडवांकडे चल, धर्मराजादि पांच

पांडव तुझें दास्य करून तुला राजा करतील ' अशी लालूच कृष्णांनीं दाखविली तरी कर्ण मोहाला वश झाला नाहीं. श्रीकृष्ण परमात्मा आहे, त्याचा पाठिंबा असल्यामुळें पांडव अजिंक्य होतील, कौरवांचा नाश होईल, व आपणांस फुकट मरावें लागेल हें पक्कें माहीत असून कर्णानें आपली माता राधा व मित्र दुर्योधन यांना सोडण्याचें साफ नाकारलें. कर्णाची कृतज्ञताबुद्धि व मित्रनिष्ठा प्रसंगीं अढळ राहिली. पांडवांची राज्यश्री आयती घरीं चालून आली असतां कर्णाच्या तोंडाला पाणी सुटलें नाहीं, व एकदां धरिलेल्या दुर्योधनपक्षाला चिकटून राहून ' सार्जुन किंवा सकर्ण पांच पांडव उरतील ' असा निकराचा जबाब त्यानें कुंतीस दिला. याच गोष्टींत कर्णाचें वीरपण आहे ! अर्जुनवधप्रतिज्ञा दहांत केलेली मी मोडणार नाहीं, असें कुंतीस त्यानें स्पष्ट सांगितलें. भीमसेनानें प्रतिज्ञेप्रमाणें दुःशासनाचें रक्त प्राशिलें तसें कर्णाचें वचन खरें झालें नाहीं म्हणून भीमापेक्षां कर्ण कमी प्रतीचा वीर होता, असें मानणें योग्य होणार नाहीं ! जयापजय किंवा यशापयश ह्या मनुष्याच्या हातच्या गोष्टी नाहींत. भीम जसा कृतप्रज्ञ महावीर होता, तसाच कर्णही कृतप्रज्ञ महावीर होता. वेलिंग्टननें नेपोलिअनचा पराभव केला म्हणून कांहीं नेपोलिअनची योग्यता कमी ठरत नाहीं. जयापजय हे वेळेचे लागेबांधे आहेत. वेळेला नामर्दास जय मिळेल व मर्दाचा पराभव होईल; पण ' काकः काकः पिकः पिकः ' हेंच शेवटीं खरें राहणार. केलेल्या प्रतिज्ञेप्रमाणें न डगमगतां अखेरपर्यंत सारखा नेट धरणें हेंच वीराचें लक्षण आहे. प्रज्ञेची स्थिरता, करारीपणा प्रतिज्ञापालन व यशसंरक्षण याहून प्राणाचीही किंमत जास्त न वाटणें, हा गुण ज्याच्या अंगांत आहे तोच पुरुष खरा वीर होय; मग तो कोण-त्याही जातीचा असो, कोणत्याही पक्षाचा असो, व त्याचीं कर्मेंही कसलींही असोत ! ( ४ ) **द्रोणाचार्यां**ची कथाही प्रसिद्ध आहे. गुरु-बंधु द्रुपदराजानें भरदरबारांत केलेल्या अपमानाचा सूड उगविण्याकरितां द्रोण कौरवांकडे गेले व धनुर्विद्या कौरव-पांडवांस शिकवून परमभक्त जो अर्जुन त्याजकडून द्रुपदराजाच्या मुसक्या बांधून त्यांनीं त्याला

पकडून आणिलें. पुरुषाच्या ठिकाणीं अशी तेजस्विता पाहिजे, आपलें तेज रक्षण करण्याची उमेद पाहिजे, तेजोभंग ज्याला सहन होतो तो मनुष्य मेलेला आहे असें समजावें ( ५ ) **भीष्माचार्यांच्या** करारीपणाबद्दल कांहीं सांगावयासच नको. शांतनुसाठीं ब्रह्मचर्य जन्मभर पाळण्याची त्यांनीं शपथ केली. यावरून त्यांची पितृभक्ति उघडच होते. ज्या सत्यवतीसाठीं त्यांनीं ब्रह्मचर्याची शपथ केली, तिचे दोघे पुत्र वारल्यावर वंशवर्धनासाठीं तिनें अत्याग्रह केला तरी भीष्मानें आपलें वचन फिरविलें नाहीं ! 'अग्नि आपलें दाहकत्व सोडील, सूर्य अप्रकाशित होईल, सुटलेला बाण परतेल, पण हा भीष्म आपलें वचन खोटें होऊं देणार नाहीं,' ही भीष्माची वाणी ऐकून त्या महात्म्याची धन्यता प्रत्येकास वाटल्याशिवाय राहत नाहीं. अर्जुनाशीं युद्ध करितांना भीष्मानें जेव्हां त्याजवर बाणांचा भडिमार करून पळसाच्या वृक्षांप्रमाणें त्याला आरक्त केलें तेव्हां 'शस्त्र न धरीन युद्धीं' ही आपली प्रतिज्ञा मोडून कृष्णाला हातीं शस्त्र घेऊन अर्जुनाचें रक्षण करण्याचा मोह पडला ! ह्यावरून कोणास वाटेल कीं तर मग कृष्ण कृतप्रज्ञ नव्हे, तर असें नाहीं. भीष्मही कृतप्रज्ञ व कृष्णही कृतप्रज्ञ ! कृष्णाची मुख्य प्रतिज्ञाच मुळीं भक्तां राखे पायांपाशीं ! दुर्जनाशीं संहारी ' ही ठरलेली. मग पार्थ भक्त होता व भीष्म काय नव्हता अशी कोणी शंका काढील तर त्यास उत्तर हेंच कीं, दोघेही परम भक्त होते, पण भीष्मानें कौरवांची बाजू धरली होती. सर्वच सत्यनिष्ठ होते. सत्य म्हणजे परमेश्वराचा कायदा. हा अढळ असतो. परमेश्वरी कायदा मोडत असेल तर अधर्माचें स्वराज्यही नको ! अधर्म यशाला जात नाहीं. प्रल्हादानें परमेश्वरासाठीं व परमेश्वराच्या कायद्यासाठीं जनकाला सोडलें, भरतानें आपल्या आईला व राज्याला सोडलें. परमेश्वराचा कायदा हाच न्याय व हीच दया. न्याय व दया ईश्वराच्या ठिकाणीं भिन्न नाहींत. त्या ईश्वरी सत्याचा जयजयकार असो.

३. भारती काळांत पुरुषांप्रमाणें स्त्रियाही कृतप्रज्ञ असत. **विदुला व कुंती** हीं दोनच उदाहरणें पुरे आहेत. लढाईतून पळून आलेल्या

आपल्या संजय नामक पुत्राचा विदुलेनें धिक्कार करून त्याला लढाईस परत पाठविलें, ही गोष्ट प्रसिद्धच आहे. लढाईतून जीव वांचविणाऱ्या आपल्या मुलास ' क्लीबा, मंदा, कसा पळालास ' म्हणून म्हणणारी व ' मरण विहित, न पलायन ' हें धर्मशास्त्र मुलाला शिकविणारी वीर माता विदुला स्थिरप्रज्ञांपैकींच होय ! भारतीयुद्धारंभीं कुंतीनें कृष्णाबरोबर पांडवांस जो निरोप पाठविला त्याचें तात्पर्यः—

**कृष्णा मन्मत हें कीं, यश रक्षावें न अंग लेंकांहीं !**

हें आहे. महाराष्ट्रांत १०० वर्षांपूर्वी कुंती व विदुला यांची परंपरा चालविणाऱ्या वीरस्त्रिया होत्या. दत्ताजी शिंदे याची बायको भागीरथीबाई आपल्या पतीचें मरण ऐकून रडणाऱ्या आपल्या पुतण्यास म्हणजे जनकोजीस म्हणाली होती कीं, " बायकोसारखा रडतोस ! पाटील काय घेऊन गेले ! धन, दौलत जेथल्या तेथें टाकून गेले. यश मिळवून वाढवावें तरच जन्मास आल्याचें सार्थक ! भावजींच्या पोटीं तूं मुलगी झाला असतास तर एक जांवई तरी येता ! " पतिशोकाचा उमड गिळून पुतण्यास असा बोध करणारी भागीरथीबाई कुंतीहून कमी योग्यतेची मानतां येत नाहीं ! मल्हारराव होळकराची बायको गौतमाबाई, इनेंही असाच लढाईत पळून आलेल्या आपल्या नवऱ्याचा खरपूस समाचार घेतला होता. शिंद्यांचीं मुलें कोंवळ्या वयांत पराक्रमाची शर्थ करून गेलीं व आपले केंस पिकले तरी तुम्हीं पळून आलांत अशी गौतमाबाई जेव्हां मल्हाररावावर कडाडली तेव्हां ' आम्हीं मरावें असें तुझ्या चित्तांत आहे ? ' असा त्यानें क्रोधोद्गार काढला. यावर न डगमगतां तिनें खडखडीत उत्तर दिलें, " अखंड सुवासिनी असतां वैधव्याची आस्था धरील अशी कोण चांडाळीण आहे ? पण घेतलें वाण सतीचें तैसें सांभाळावें. आपण लोंकर विणायाचें काम करीत असतां सहजच वांचायाची आस्था धरली असती ! " मला वाटतें कीं, विदुलेपेक्षांही गौतमाबाईचा अधिकार जास्त मानायला हवा. विदुलेनें पुत्राचेच कान उपटले, पण गौतमाबाई आपल्या पतीच्या समोर असा

खडखडित जबाब करण्यास भ्याली नाहीं. हीं असलीं कृतप्रज्ञ माणसेंच जिवंत होत.

४ कृतप्रज्ञता ही सर्व प्रकारच्या लोकांत आढळते. ( अ ) ' देह जावो अथवा राहो । पांडुरंगीं दृढ भावो ' ही भगवद्भक्ताची कृतप्रज्ञता. ( आ ) ' पेशवाई हरप्रयत्नें रक्षावी ' ही नाना फडणिसाची कृतप्रज्ञता. ( इ ) ' हिंदुधर्मासाठीं आम्हीं फकीरी घेतली आहे ' ही गोब्राह्मण-प्रतिपालक शिवाजीमहाराजांची कृतप्रज्ञता होय. ( ई ) ' जरि हा मयूर नाहीं तरि लोकांना न दीसती आर्या ' ही महाकवींची कृतप्रज्ञता होय. तात्पर्य:—आपली योग्यता पूर्णपणें लक्षांत घेऊन आपल्या बुद्धि-शक्तींचा लोककार्यार्थ व्यय करावयाचा व आपलें उद्दिष्ट डोळ्यांपुढून पळभर ढळूं द्यायचें नाहीं हा बोध आपण घेतला पाहिजे. आमच्या राष्ट्राला आज असे स्थिरप्रज्ञ पुरुष पाहिजे आहेत.

———

# ८ श्रद्धा.

—xxx—

**श्रद्धामयोयं पुरुषो यो यत्श्रद्धः स एव सः ॥**

—श्री. गीता. १७

१ रशियन रामदास काउंट टॉलस्टॉय हे एकदां म्हणाले, " श्रद्धा हें मनुष्याचें जीवन आहे. मनुष्यप्राणी विश्वास व श्रद्धा यांच्या आधारावर जगत असतो. आपल्याला कांहीं सुख मिळणार आहे, आपली स्थिति सुधारणार आहे, आपला संसार अधिक सुखाचा थाटला जाणार आहे, किंवा आपणावर परमेश्वर कृपा करणार आहे; अशी श्रद्धा असल्याशिवाय मनुष्य जगणारच नाहीं. मनुष्याची कशावर तरी, कसली तरी श्रद्धा असते. जग सत्य आहे अशी त्याची श्रद्धा असली तर तो ऐहिक संपत्ति मिळविण्याची अहर्निश खटपट करितो, जग मिथ्या आहे अशी त्याची श्रद्धा असली तर तो पारलौकिक संपत्ति मिळविण्याची खटपट करितो; पण जीवमात्राच्या ठिकाणीं श्रद्धा ही आहेच. प्रत्यक्षावर तो श्रद्धा ठेवील, तर स्वराज्यापर्यंत सर्व मिळविण्याविषयीं तो उमेद बाळगील. प्रत्यक्षावर त्याची श्रद्धा नसेल व तो सर्व दृश्यावर थुंकणारा ऋषि असेल तर अवाङ्मनसगोचर अशा वस्तूची प्राप्ति करून घेण्याची तो आटोकाट मेहनत करील. श्रद्धेवांचून जीवित्व नाहीं. " आणि गीतेंत भगवंतांनीं तरी दुसरें काय सांगितलें आहे? पुरुष हा श्रद्धामय आहे व तो ज्याविषयीं सश्रद्ध होईल तेंच निश्चयानें तो होईल. श्रद्धा हें मनुष्याचें मुख्यत्त्वाचें बळ आहे. श्रद्धा हें चैतन्य आहे, श्रद्धा हें मनुष्यत्वाचें सर्वस्व आहे.

२ मनुष्याची जशी श्रद्धा असते तशी विश्वमंदिरांत त्याची योग्यता ठरते. ' यो यत्श्रद्धः स एव सः ' मनुष्य देहात्मवादी असला तर स्त्रीपुत्र, घरदार यांच्या घरट्यांत तो कोंडला जाऊन संकोचून लहान होईल; मुलगा जन्मला कीं हंसेल, मेला कीं रडेल; द्रव्य मिळालें कीं

आनंदी होईल, गमावलें कीं दुःखी होईल, त्याच्या घरच्या चार भिंतीच्या आंत त्याचें विश्व सामावेल; व 'देह तोची देव भोजन ते भक्ति मरण ते मुक्ति पाखंड्याची' ह्या तुकोक्तीप्रमाणें तो पाखांडी ठरेल. संसारांत गुरफटलेले कोट्यवधि जीव याच प्रकारचे असतात. बरें खावें, बरें जेवावें, बरें ल्यावें, बरें नेसावें, आलें तसें एक दिवस मरून जावें, याच्या पलीकडे जाणारे व मी कोण, आलों कोठून, जाणार कोठें, हा शोध घ्यायला प्रवृत्त होणारे जीव थोडेच असतात! उलटपक्षीं मनुष्य मन विशाळ करून सर्वात्मकपणाचा अनुभव घेण्यास तयार होईल; आपलेपणा, आपला देह व आपलें घर यांच्याहून मोठा होऊन सर्वत्र पाहील, तर संकल्पलोप होऊन तो याच देहीं व याच काळीं मुक्त होईल! जीव मी दरिद्री आहें अशी श्रद्धा ठेवील तर तो दरिद्रीपणाचेच क्लेश भोगील; मी ईशसत्तेचा अंश असल्यामुळें 'शाश्वतप्रकृतिरंक' नाहीं असा दृढ विश्वास धरील तर त्याचें दरिद्र तत्क्षणीं झडेल! मी शिवस्वरूप आहें असें भावील तर परमात्मा दूर नाहीं व दुसरा नाहीं, हें त्याचक्षणीं त्याच्याही पूर्णपणें अनुभवाला आल्याशिवाय राहणार नाहीं!! पण हें सर्व श्रद्धेचें फळ आहे. जें होण्याची मनुष्य इच्छा करील तेंच तो होईल. मनुष्यदेह हा कल्पवृक्ष आहे, व या कल्पवृक्षाखालीं बसून मनुष्य ज्याची वांच्छा करील तेंच होईल! कल्पवृक्ष हा स्वर्गांत नाहीं तर प्रत्यक्ष आहे. आपले देह हेच चालते बोलते कल्पवृक्ष आहेत!

३ श्रद्धेसंबंधानें एक गोष्ट विसरतां उपयोगी नाहीं. श्रद्धा ही स्वयंभू आहे खरी, तथापि ती विचारांशीं विसंगत नसेल व सत्याला धरून असेल तरच तिची किंमत कोहिनूर हिऱ्यापेक्षां अनंत पटीनें जास्त ठरेल. विचार आणि विश्वास किंवा प्रज्ञाबळ आणि श्रद्धाबळ या दोहोंचा संयोग झाला पाहिजे. विचारानें विश्वास उत्पन्न होत नाहीं, विचार व विश्वास यांचें ऐक्य झालें ह्मणजे श्रद्धेला आपण स्फूर्ति असें म्हणूं लागतों! ज्ञान आणि भक्ति अथवा विचार आणि विश्वास यांचा मिलाफ ही पूर्णता होय. सर्व थोर पुरुषांच्या ठिकाणीं दोन्ही असतात.

तुकारामरामदासांच्या उद्गारांची किंमत परमेश्वराच्या वाणीइतकी असते, याचें कारण विचार व विश्वास यांच्या मिश्रणांतून व मूळाला धरून ते निघालेले असल्यामुळें निर्मळ सत्यरूप असतात हें होय. उपनिषदें, गीता व सर्व संतांचे उद्गार हे सत्याच्या महामेरूवर उभारले आहेत व त्याच्या भोंवतीं सूर्यचंद्रादिक शेंकडों शतकें फिरत आहेत व फिरत राहतील. भोळीभाबडी श्रद्धा वाईट नाहीं, पण विचार म्हणजे ज्ञान किंवा सत्य याला धरून ती असेल तर तिची किंमत जास्त आहे. रंगनाथस्वामींनीं भोळा भक्त व ज्ञानी भक्त यांच्या संवादावर एक मनोरम ग्रंथ केला आहे, असें निगडीच्या मठांतील एका भल्या गृहस्थानें पंढरीस मला एकदां सांगितलें होतें. तो ग्रंथ छापला गेला नाहीं व आम्हांला मिळालाही नाहीं.

४. काउंट टॉलस्टॉय यांनीं ईश्वरविषयक श्रद्धेबद्दल आपला स्वानुभव सांगितला आहे:—" देव नाहीं हें फार चांगलें आहे, ईश्वर माझ्या कल्पनेच्या बाहेर नाहीं, मी कल्पितों तेव्हां तो जर असेल तर तो खरा नाहीं ! यावरून देव केवळ कल्पनामय आहे, माझ्यासारखा प्रत्यक्ष व खरा नाहीं, असा माझा प्रथम निश्चय झाला ! पण पुढें माझ्या मनांत असें आलें कीं ईश्वरविषयक कल्पना तरी कोठून व कशी स्फुरते ? हाच विचार विद्युद्वेगानें माझ्या डोक्यांत जेव्हां संचरला व मी कल्पनेचें मूळ शोधूं लागलों तेव्हां काय आश्चर्य सांगावें ! मी एकदम देहभान विसरलों, आनंदाच्या पुरांत बुडलों, माझ्या रंध्ररंध्रांत अनिर्वचनीय प्रेम व आनंद उत्पन्न झाले, व क्षणैक या अवस्थेचा अनुभव घेऊन मी भानावर येऊन पाहतों तों सर्व सचेतन व अचेतन सृष्टि मला परमेश्वररूप व आनंदरूप दिसूं लागली ! ! नंतर मला सुचलें कीं, परमेश्वराची ज्ञप्ति म्हणजे परमेश्वर कांहीं विचारानें आकळला जाणार नाहीं, मी ये म्हणतांच तो येणारा नाहीं, तो स्फुरद्रूप आहे. वरील तूर्या अवस्था नेहमीं टिकत नाहीं, तथापि मी अनुभवानें हेंच सांगतों कीं, श्रद्धामय असणें हेंच खरें जिवंतपण होय. श्रद्धारूप व ईश्वररूप असणें हें जिवंतपण व ईश्वरविस्मृतींत राहणें हा मृत्यु होय ! देवस्वरूपीं रमणें हा

जिवंतपणा व देवस्वरूपाची विस्मृति हा मृत्यु; हा माझा निश्चय झाला आहे!" देवाच्या शोधाला जो जो लागेल त्याला त्याला हाच अनुभव येईल. आमच्या साधुसंतांच्या कवितेंत अशा स्वानुभवाच्या कित्येक आनंददायक गोष्टी सांगितल्या आहेत. ज्ञानेश्वरी, नाथभागवत, दासबोध व नामदेवतुकारामादिकांचे अभंग नित्य गुणगुणत रहावे व विचार करून देवशोधन चालवावें. चित्त शुद्ध होतांच 'येऊनी अंतरीं राहील गोपाळ। (व) सायासाचें फळ बैसलीया' प्राप्त होईल.

———

# १ वेदांताचा व्यवहारांत उपयोग



१ वेदांत शास्त्रांत विशेष काय आहे हें आपण आज पाहूं या. तुमच्या आमच्या रोजच्या व्यवहाराला वेदांताचा कांहीं उपयोग नाहीं, असें जे कोणी म्हणतात त्यांला उपयोगाचें प्रमाण कोणतें धरावयाचें हें विचारलें पाहिजे ! भाजीभाकरी मिळवून देण्याच्या कामीं वेदांत निरुपयोगी आहे असें जर त्यांचें म्हणणें असेल तर मनुष्याला मनुष्यपणा प्राप्त करून देणारीं यच्चयावत् सर्व शास्त्रें व ललितकला निरुपयोगी आहेत असें म्हणावें लागेल ! धान्य उत्पन्न करणारे बैल, भांडीं तयार करणारे कासार, व स्वयंपाक करणारे आचारी, एवढे मात्र धंदे मग पूर्ण उपयोगी ठरतील, व बाकीचे जगांतील सर्व अवाढव्य व्यापार निरर्थक समजले जातील ! ! पण राष्ट्र जोंपर्यंत केवळ बल्लवाजुयायांचें बनलें नाहीं, तोंपर्यंत शरीरपोषणापलीकडचे विचार केवळ निरर्थक नाहींत ! अन्नपाणी अवश्यक आहे व मनुष्यानें पोटापाण्याचे उद्योग सोडून द्यावे असें वेदांतानें कधींही सांगितलें नाहीं. तुम्ही शेतशेतकी करा, उद्योगधंदे करा, संसार थाटा, व्यापारी, वकील, ग्रंथकार जे कांहीं होण्याची तुमची महत्त्वाकांक्षा असेल ते व्हा, राजकारणें करून इकडची सृष्टि तिकडे घाला, पण या सर्वांत गुरफटून जाऊन आपलें स्वरूप विसरूं नका एवढेंच वेदांत सांगतो. मी कोण आहें, हें विश्व कसें झालें, याचा कर्ता कोण, मला पुढें कोठें जायचें आहे, हा विचार नित्य जागृत ठेवून संसारकर्में करा, हें एवढेंच वेदांताचें सांगणें आहे. संसार हा मायेचा पसारा आहे, व प्रपंच लटिका आहे हें त्रिकालाबाधित सत्य आहे, ‘ स्वप्नप्राय क्षणिक संसार ’ ही गोष्ट पळभरही विसरूं नका असें वेदांत सांगतो, तें खोटें आहे काय ? समर्थांनीं प्रपंचनिरूपणांत म्हटलें आहे:—

**पदार्थीं बैसली बुद्धि शुद्धि नाहीं परातिंची ।**
**प्रपंच शेवटीं कैंचा गेल्या हा देह हातिंचा ? ॥ १ ॥**
**घर गांव स्थान माझें वाढे शेत मळे गुरें ।**
**पुत्र कन्या वंधु माझे सर्व सांडोनि चालला ॥ २ ॥**

प्रत्येक विचारी मनुष्यास प्रपंचाचें मिथ्यात्व प्रतीत झाल्याशिवाय राहात नाहीं. केवळ रजोगुणी अशा इंग्रजी समाजांत मुरलेल्या शेक्सपीअरसारख्या महाकवीला सुद्धां ‘ We are such stuff as dreams are made of ? ’ असा एका काळीं उद्गार काढावा लागला ! ग्रे, वर्डस्वर्थ, कार्लाइल इमर्सन वगैरे इंग्रजी ग्रंथकारांच्या ग्रंथांतूनही ‘ जगन्मिथ्या ’ याच तत्वाचा अनुवाद केलेला सांपडतो. कार्लाइलची Philosophy of clothes म्हणजे तर केवळ मायावाद होय ! जगाचें मिथ्यात्व जीवांला केव्हांना केव्हां तरी पटलें पाहिजे. डोळ्यांवर कांहीं काळ पडदा ओढून घेतल्यानें व Life is real, Life is real, म्हणून म्हटल्यानें आत्मवंचन मात्र होईल ! अलीकडे कित्येकांना अशी भीति वाटते कीं आयुष्य क्षणभंगुर आहे, जग मिथ्या आहे, संसार लटिका आहे, या गोष्टी तरुण मुलांच्या तरी कानांवर पडतां उपयोगी नाहींत. कारण मग त्यांचें संसारांतून चित्त उठेल व त्यांच्या हातून देशभक्तीचीं कामें होणार नाहींत ! पण ही भीति वृथा आहे. सत्यवस्तुप्रकाश जीवाच्या अंतःकरणावर जितका लवकर पडेल तितकें चांगलें. तरुणपणींच काय, पण बाळपणींही वेदान्तशास्त्र शिकविण्याची योजना झाली पाहिजे. निधड्या छातीचे वीर वेदांत पचविल्यानेंच निर्माण होतील. समर्थ म्हणतातः—

**आधींच सर्व जाणावें काय येतें समागमें ।**
**निर्वाणीं अंतिंचा देवो कोणी येकें चुकों नये ॥ १ ॥**

वेदान्त माया दूर करून खऱ्या देवाची ओळख करून देतो. फुटेना, तुटेना, चळेना, वळेना, अशा आत्मस्वरूपाचें दर्शन वेदांतामुळें होतें. वेदान्त मिथ्यात्व मोडून सत्य स्तुत्य हातीं देतो, नारळाची कवची टाकून खोबरें देतो, मळमूत्रादिकांनीं भरलेल्या व

क्षणोक्षणीं विकार पावणाऱ्या देहावरील आंधळेपणा उडवून नित्य शुद्धबुद्ध अशा स्वस्वरूपाची प्राप्ति करून देतो. तुला जन्ममरण नाहीं, फुटेना, तुटेना असें तुझें रूप आहे, तूं आनंदरूप आहेस असें सांगून वेदान्त निर्भयपणाचें कवच अंगावर चढवितो. ' अभयं वै प्राप्तोसि जनक ' असें कधीं न आटणारें धन जनकाला याज्ञवल्क्य मुनींनीं दिलें होतें. वेदांतज्ञान अंगीं बाणल्यास चित्त अभंग, स्थिर, गंभीर व आनंदी राहातें. आपत्तींतून तरून जाण्यास वेदांतासारखी दुसरी नौका नाहीं. संसारसत्यत्व समजणारा मनुष्य आपत्तीच्या झुळकेसरसा उडून जाईल, पण ' आकारलेलें सर्व काळ मोडीत असतो ' हें जगन्मिथ्यात्वाचें तत्व ज्याला पक्कें समजलें आहे तो आपत्तीच्या झंझावातांतसुद्धां पर्वतासारखा अचल राहील ! उपाधींत गुप्त असलेलें चैतन्यधन ज्याला सत्सहवासानें प्राप्त झालें त्याच्या श्रीमंतीची बरोबरी प्रत्यक्ष कुबेरालासुद्धां करतां येणार नाहीं ! वेदांतशास्त्र जीवाला परब्रह्मच बनवितें. वेदांताच्या बळावर संसारभार हलका होतो. राजकारणांत भौतिक पिंडावर अनास्था उत्पन्न झाल्यामुळें मरणभय उरत नाहीं. संसार, राष्ट्रसंसार, ब्रह्मसंसार सुखानें करण्यास ' कर्मण्येवाधिकारस्ते ' या तत्वाप्रमाणें कर्तव्यबुद्धीची वाढ वेदांतामुळें होते. याप्रमाणें वेदांताची उपयुक्तता निराबाध सिद्ध आहे. ' पण लक्षांत घेतो कोण ?'

३ पाश्चात्यांच्या राजसी विद्यांच्या संसर्गानें आमच्या कांहीं विद्वानांना वेदांताची ' कर्मकटकट ' वाटूं लागली आहे. त्यांच्या मतें हा विषय म्हाताऱ्याकोताऱ्यांचा व बायाबापड्यांचा आहे ! शंकराचार्य, विद्यारण्य, ज्ञानेश्वर, रामदास, असले नरवीर ज्या वेदांतशास्त्राचीं प्रमेयें पचवून प्रचंड जगदुपकर्ते झाले तें शास्त्र बायाबापड्यांचें आहे असें म्हणणारे धन्यच म्हणावेत ! लोखंडाचे चणे पचवून ब्रह्मपदीं नाचण्यास समर्थ होणें यासारखें पौरुष जगांत दुसरें कोणतें आहे ! पंत भागवतांत म्हणतातः—

**वस्तुविचार दृढ करुनि देहाद्यध्यास करिल जो दूर ।**
**सर्वगतीं मद्रूपीं मन अर्पिल तोचि निश्चयें शूर ॥ १ ॥**

**बा ! अर्थसिद्धिकर परि नश्वर हें नरशरीर जाणोनी ।**
**मोक्षार्थ मृत्युपूर्वी यत्न करावा मनांत आणोनी ॥ २ ॥**

पाश्चात्य संस्कृति विषयतृष्णा अनिवार वाढविणारी ( व ती तृप्त करण्याचीं साधनें शोधणारी ) असून आमचा वेदांत प्रथमच वितृष्ण होण्यास सांगतो ! पाश्चात्यांना रात्रंदिवस खळबळ पाहिजे असते, व शांति हें आमच्या सर्व प्रयत्नांचें साध्य आहे ! आसुरी संपत्तीनें उन्मत्त होऊन दुसऱ्यांच्या डोक्यांवर नाचावें ही बुद्धि पाश्चात्य संस्कृतिचें कडू फळ आहे ! आमचा वेदांत आह्मांला परपीडेपासून परावृत्त करितो. 'आत्मौपम्येन सर्वत्र' पाहण्यास तो शिकवितो, त्यामुळें दयामाया, प्रेमप्रीति आमच्याकडे जास्त दृष्टीस पडते. सध्यां आमच्या राष्ट्रावर जें औदासीन्य पसरलें आहे, तें वेदांताचा परिणाम नाहीं, तर हा वेदांत विसरल्याचा परिणाम आहे ! 'कुरु कर्मैव तस्मात्त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतम्' असें कर्तव्यतत्पर बनविणारें जर कोणतें एक शास्त्र असलें तर तें वेदांतशास्त्रच होय ! पाश्चात्य संस्कृति ( Civilisation ) जगावर सुखशांतीचें साम्राज्य पसरविण्याच्या मिषानें जगाच्या सुखशांतीचा विध्वंस करणारी आहे. म्हणून आमच्या लोकांनीं वेदांतशास्त्राचें अध्ययन करून अगोदर आपलें सत्स्वरूप ओळखावें, स्वतः मुक्त होण्याच्या तयारीला लागावें, व कर्तव्यपर व्हावें एवढेंच वेदांतशास्त्राचें सांगणें आहे. नारायणोपनिषदांत स्पष्ट सांगितलें आहे.---

**वेदांतविज्ञानसुनिश्चितार्थाः संन्यासयोगाद्यतयः शुद्धसत्वाः ।**
**ते ब्रह्मलोकेषु परांतकाले परामृताः परिमुच्यंति सर्वे ॥ १ ॥**

---

## १७ व्यसनांतून सुटावें कसें ?



**अभ्यासेन तु कौंतेय ! वैराग्येण च गृह्यते ॥ ३५ ॥** ( गीता अ० ६ )

१ वऱ्हाडांतून एका 'व्यसनग्रस्तानें' पत्र पाठवून आह्मांस विचारलें आहे कीं "एखाद्या वाईट व्यसन जडलेल्या मनुष्यास त्यांतून सुटण्याचा सुलभ उपाय कोणता ? अन्य उपाय न करतां फक्त ईश्वरनामाचा कांहीं जप केल्यानें तें कार्य साधेल काय?" हा प्रश्न फार महत्त्वाचा असल्यामुळें व असा प्रश्न प्रत्येक विचारी मनुष्याच्या डोळ्यापुढें नेहमीं उभा असल्यामुळें त्याचा थोडासा विचार करूं 'व्यसनग्रस्ताच्या' शंकेचें समाधान करण्याच्या प्रौढीनें हा लेख आम्ही लिहीत नाहीं. व्यसनग्रस्त नाहीं कोण? जीवन्मुक्त होईपर्यंत प्रत्येकजण व्यसनग्रस्तच आहे. या संसाराचें महाव्यसन प्रत्येक जीवास जडलेलें आहे, या व्यसनांतून सुटलेले भाग्यवंत फारच विरळ आहेत ! व्यसन म्हणजे आसक्ति म्हणजे संकट. आसक्तीमुळें संकटें येतात, आसक्तीमुळेंच विघ्नें उद्भवतात. आसक्तिमुळें अडथळें व विघ्नें उत्पन्न होतात. भागवतांत जडभरताची दिलेली कथा प्रसिद्धच आहे. ऋषभ राजाच्या शंभर पुत्रांतला ज्येष्ठ पुत्र भरत यानें दिग्मंडळ जिंकून समुद्रवलयांकित पृथ्वीचें राज्य केलें. हा वस्तुतः त्याच जन्मीं मुक्त व्हायचा. पण कोल्हें शिकलें ! संनिहितप्रसूतिकाळीं एक मृगी सिंहाची आरोळी ऐकून पळाली व तिचा गर्भ धाकानें गळून पडला. तेव्हां त्या अर्भकास त्या दयाशील भरतानें आपल्या आश्रमीं आणून पुत्रवत् पाळिलें व पुढें त्याचा त्याला अत्यंत लळा लागला. व तो इतका लागला कीं, त्याचें मनच मृगमय होऊन गेलें. मृत्यु पावतांच त्यास मृगजन्म मिळाला. पूर्वानुष्ठानानें त्यास श्रीकृष्णस्मरण होतें, म्हणून तिसऱ्या जन्मीं जडभरत होऊन तो मुक्त झाला. या कथेचें तात्पर्य नाथांनीं असें सांगितलें आहेः—

**यालागीं साचचि जाण । ममतेपाशीं असे मरण ।**
**जो निर्ममें संपूर्ण । त्यासी जन्ममरण स्पर्शेना ॥ १ ॥**

**अंतकाळीं जे मती। तेचि प्राणियासी जाण गती।**
**यालागीं श्रीकृष्ण चित्तीं। अहोरातीं स्मरावा ॥ २ ॥**

ममतेपाशीं मरण आहे, यासाठींच साधुसंत लोकांना निर्भय होण्यास, निर्वासन होण्यास सांगतात. आवड उत्पन्न झाली कीं, मन तेथेंच बिलगतें. गुळाला जशी माशी चिकटते, तशी आवडीमुळें वासना पदार्थाच्या ठिकाणीं जडते. आवडच बुडविते. या आवडाबाईच्यापायीं मोठमोठे ठार बुडाले आहेत ! एखादा पदार्थ आधीं आवडूं लागतो; त्याची आवड वाढली म्हणजे दृढासक्ति होते; आसक्तीच्या योगानें मन तदाकार झालें कीं सारासारविचार, पापपुण्यविचार, कर्तव्याकर्तव्य-विचार पार नाहींसे होतात; मनुष्य असा विमूढात्मा झाला कीं त्या पदार्थाच्या प्राप्तीबरोबर काम व अप्राप्तीबरोबर क्रोध वाढत जातो; काम, क्रोध, लोभ हीं पतनाचीं द्वारें असल्यामुळें तो त्या पदार्थाच्या चिंतनानें तद्रूप होऊन पदार्थासवें नाशाप्रत पोंचतो. सर्व पदार्थाच्या आसक्तीची हीच तऱ्हा आहे. मग ती आसक्ति संसाराची असो, परदारेची असो, कांचनाची असो, मद्यमांसाशनाची असो, किंवा दुसरी कसलीही असो. म्हणून समर्थासारखे पुरुष ‘ मना संग हा सर्व सोडोनि द्यावा ’ असें सांगत आले आहेत. नाशवंत पदार्थांची ‘ आसक्ति ’ म्हणजे ‘ आवड ’ सोडून पदार्थावेगळा जो परमात्मा त्याचें चिंतन करा; म्हणजे जन्ममरणरूप व्यसन तुम्हांला बेजार करणार नाहीं, व तुम्हीं अविनाश पदाप्रत पावाल, असाच सर्व संतांचा उपदेश आहे.

२ ‘ व्यसनग्रस्तास ’ कोणतें व्यसन जडलें आहे याचा त्यांनीं खुलासा केला नाहीं, तथापि तें कांहीं तरी विषयविषयकच असलें पाहिजे. त्यांतून सुटावें अशी त्यास उत्कंठा लागली आहे, हीच आनंदाची गोष्ट आहे. पुष्कळ व्यसनी लोक आपापल्या व्यसनांत इतके बुडून गेलेले असतात कीं, आपल्या व्यसनाबद्दल खेद, लज्जा, पश्चात्ताप वगैरे त्यांस कांहीं न वाटतां उलट ते आपल्या व्यसनाची तारीफच करूं लागतात ! चहा पिणें, विडी ओढणें, तंबाखू खाणें, गांजा ओढणें, नाटक व तमाशा पाहाणें, दारू पिणें, परदारासक्त होणें, वगैरे

अनेक प्रकारचीं व्यसनें आहेत ! कांहीं व्यसनें कमी अपायकारक असतात, व कांहीं देखत देखत अधोगतीला नेऊन पोंचविणारीं असतात. कोणतेंही व्यसन अंगीं न जडणें व पोटापुरतें अन्नवस्त्र मात्र जरूरीस्तव घेणें हें किती सुखकारक असतें ? 'साजुक अथवा शिळी' पण भुकेच्या वेळीं पोटभर पोळी दे, व नवें अथवा जुनें पण अंगभरून वस्त्र दे, यापेक्षां माझें 'मागणें लई नाहीं,' इतकें दिलेंस म्हणजे मी अहर्निश तुझ्या नामचिंतनाचें सुख भोगीन, असें एका अभंगांत पांडूरंगापाशीं तुकोबांनीं मागितलें आहे ! हिंदुस्थानासारख्या समशीतोष्ण देशांत साधें व जाडेंभरडें अन्नवस्त्र मिळालें म्हणजे पुरतें. जास्त गोष्टींचा हव्यास जो उत्पन्न होतो तो विवेकानें मारला पाहिजे. अभिलाष हें पतनाचें बीज आहे. काम म्हणजे अभिलाष—याच्या पाठोपाठ क्रोध येतो. इच्छिलेल्या दहा गोष्टींपैकीं ९ मिळत नाहींत,व एक मिळाली तथापि पचनीं पडत नाहीं.विषयाचें ध्यान करणाऱ्या मनुष्याला प्रथम विषयाचा काम उत्पन्न होतो. कामापासून क्रोध व क्रोधापासून संमोह उत्पन्न होऊन मनुष्य विवेकभ्रष्ट म्हणजे मूढ होतो. संमोहामुळें स्मरणशक्ति नाश पावते. मी कोण आहें,कोठें आहें,काय करतों याची जाणीव राहात नाहीं. स्मृतिभ्रंशामुळें समूळ नाश होतो. असा हा खालीं गडगडण्याचा दादर आहे. मनुष्य एकदां पहिल्या पायरीवर आला कीं गडगडत तो तळाला जाणार म्हणून नक्की समजावें ! म्हणून प्रथम विषयाचें ध्यान सोडावें. मनांत विषयाचा कंटाळा आणि तिटकारा उत्पन्न करावा. व्यसनांतून सुटायचा पहिला उपाय म्हणजे विषयांविषयीं कंटाळा व तुच्छता मनांत जागृत झाली पाहिजे. विषय सुखकर आहेत ही कल्पनाच मुळीं सोडून द्यावी. ज्ञानोबाराय म्हणतात:—

**येऱ्हवीं विषयीं सुख आहे । हें बोलणेंचि सारिखें नोहे ।**
**तरी विद्युत्स्फुरणें कां न पाहे । जगामाजी !** ( ज्ञाने० अ० ५–११३ )

विषयांत सुख आहे हें बोलणेंच योग्य नाहीं. विद्युत्प्रकाशासारखें क्षणभर चमकणारें सौख्य विषयांत आहे असें मानलें, तरी क्षणाच्या सुखासाठीं आधीं आणि नंतर हजारों क्षण चिंतनांत आणि शोकांत

घालावे लागतात ! विषयांला ते सुखदायक आहेत असें म्हणणें म्हणजे विषकंदाला मधुर म्हणण्यासारखेंच आहे ! सर्पफणीच्या सावलींत मूषकाला जितकें सुख असतें तितकेंच विषयवृक्षाच्या छायेखालीं राहणाऱ्या जीवाला असणार ! सर्प जसा वाटेल तेव्हां गट्ट करून टाकील, तसें विषयांच्या फांसांत पकडलेल्याला विषय हवे तेव्हां ठार मारतील यांत नवल काय, पण विषयसुखाची मनांत लवमात्र कल्पना राहिली तरी ती ठार मारील. ज्ञानोबाराय म्हणतात.

**जैसा कां विषाचा लेश । घेतलिया होय बहुवस ।**
**मग निभ्रांत करी नाश । जीवितासी ॥ १ ॥**
**तैसी विषयाची शंका । मनीं वसती देखा ।**
**घात करी अशेखा । विवेकजाता ॥ २ ॥**

मनानें विषयाला दृढ धरल्यामुळें जीवाचें पतन होत असतें, म्हणून विषयांतून मनाला काढण्याचा अभ्यास दृढ ठेवला पाहिजे. मन चंचल आहे व विषय आकर्षक आहेत. ह्या दोघांची गांठ पडूं देतां कामा नये. मनाला दुसरा व्यासंग लावून दिला ह्मणजे मन विषयावरून निघतें.

३. विषयावरचें मन काढावयाचें कसें व तें दुसऱ्या कोठें जडवावयाचें ? विषयावरचें मन काढणें फार कठिण आहे. अनेक जन्मांचा व अनेक वर्षांचा त्यांचा स्नेह जमलेला आहे तो तोडणें हें मोठ्या पुरुषार्थाचें काम आहे. मनाला विषयापासून परावृत्त करणें हें जवळ जवळ अग्नीवर आत्मनाशार्थ उडी घालणाऱ्या पतंगाला आवरण्यासारखेंच आहे. मन हें माकडासारखें चंचळ आहे. मनाच्या माकडचेष्टांना आळा घालणें अत्यंत कठिण आहे, ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. ज्ञानराज ह्मणतातः—

**हें मन कैसें केवढें । ऐसें पाहों तरी न सांपडे ।**
**येऱ्हवीं राहाटावया थोडें । त्रैलोक्य यया ॥ ४१२ ॥**
**ह्मणौनि ऐसें कैसें घडेल । जें मर्कट समाधी घेईल ! ।**
**कां रहा ह्मणतलिया राहेल । महावात ॥ ४१३ ॥**
**मन विवेकातें भुलवी । संतोषातें चाड लावी ।**
**बैसिजे तरी हिंडवी । दाही दिशा ! ॥** ( ज्ञाने० अ० ६-४१५)

मनाचा हा दुष्ट व भटक्या स्वभाव, आणि त्याला आवरण्याची आपली असमर्थता यांचा विचार केला ह्मणजे मनुष्य स्वतःवर प्रथम कावून कावून जातो! बाहेर मोठमोठ्या पंडिताच्या गोष्टी सांगणारा मनुष्य आत्मपरीक्षण करूं लागला कीं, त्याची त्यालाच लाज वाटूं लागते. शेंकडों लोकांवर वरिष्ठपणा गाजवावयाची संवय असून मन माझ्या गळ्यांत दोरी अडकवून विषयांचे उकिरडे फुंकायलाच लावतें, तस्मात् माझ्या विद्वत्तेला धिक्कार असो असें ज्याचें त्यालाच वाटल्याशिवाय राहात नाहीं! शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध ह्या पंचविषयांची आवड मनाला बहुतकाळची लागलेली आहे! "शब्दगुणाला लुब्ध झाल्यामुळें हरिण, स्पर्शगुणाला लुब्ध झाल्यामुळें हत्ती, रूपाला भुलणारा पतंग, रसाला लुब्ध होणारा मत्स्य व गंधाला लुब्ध होणारा भ्रमर हे सर्व त्या त्या गुणाच्या विषयाला लुब्ध होऊन नाशाप्रत जातात; मग पांचही इंद्रियांना पांचही विषयांच्या स्वाधीन करणाऱ्या मनुष्याची केवढी दैना उडाली पाहिजे हें वर्णन करणें सुद्धां दुर्घट आहे!" असे उद्गार श्रीमच्छंकराचार्यांनीं काढले आहेत!! सुखलेश व दुःखसागर असा अनुभव देणारी ही संसारयात्रा आहे. मनुष्यप्राणी हा सुखदुःखांच्या मधला एक लंबक आहे असें एका इंग्रजी कवीनें ह्मटलें आहे! पण मनाचें दुर्जयत्व पाहून आपणास घाबरून जाण्याचें कारण नाहीं; दुर्जय मनालाही वश करण्याला मार्ग आहेत. मार्ग नसते तर कोणीही मुक्त न होता. पण शेंकडों संत संसारबंधनापासून मुक्त झालेले आहेत. मनाला वश करण्याचे उपाय स्वानुभवावरून त्यांनीं सांगितलेही आहेत. खुद्द भगवंतांनीं श्रीभगवद्गीतेंत अभ्यास व वैराग्य ह्या दोन साधनांनीं मन वश करितां येतें असें सांगितलें आहे. विषय हे विषाहून दुष्ट आहेत हें मनाला शिकवून विषयांच्या ठिकाणीं दोषदृष्टि उत्पन्न करणें म्हणजे वैराग्य वाढविणें हा एक उपाय; व भगवच्चिंतनाचा मनाला अभ्यास लावून तेथें तें जडविणें हा दुसरा उपाय. ह्या दोन माऱ्याच्या जागा आहेत. एकीकडे विषयांविषयीं अप्रीति वाढविणें, व दुसरीकडेस स्वरूपाविषयीं प्रीति वाढविणें. दोन्ही प्रकार एकदम वाढवीत जाणें;

हेंच मनाला वश करण्याचें मुख्य साधन आहे. मनावर बुद्धीचा पाहरा ठेवावा, मन मोकाट सोडलें तर आपला शत्रु होतें, पण तेंच मन बुद्धिवश ठेवलें तर आपला परम मित्र होतें; 'मन करा रे प्रसन्न। सर्व सिद्धिचें साधन' ह्या अभंगांत तुकोबारायांनीं मनाची थोरवी गायिली आहे ती याच उद्देशानें. 'उद्धरेदात्मनात्मानं' ह्या श्लोकाचा अर्थ तरी हाच आहे. भागवताच्या ११ व्या स्कंधाच्या २० व्या अध्यायांत मनोवशतेचा उपाय सांगितला आहे:—

**धार्यमाणं मनो यर्हि भ्राम्यदाश्वनवस्थितम्।**
**अतंद्रितोऽनुरोधेन मार्गेणात्मवशं नयेत्॥ १०॥**
**मनोगतिं न विसृजेत् जितप्राणो जितेंद्रियः।**
**सत्त्वसंपन्नया बुद्ध्या मन आत्मवशं नयेत॥ २०॥**

**अर्थ**—धारण करितांना मन चटकन् भ्रमण करूं लागेल, विषयांकडे धांवेल व चंचल होईल; म्हणून सावधपणें जागृत राहून त्या मनाच्या थोडें अनुरोधानें ह्न० कलानें घेऊन नंतर त्यावर आपलें खोगिर ठेवावें! मनाचा मार्ग सोडूं नकोस, त्याचा सारखा पिच्छा पुरीव. मन कोठें कोठें भटकतें तें सावधपणें पहात जा. बुद्धि सत्वसंपन्न करून मनाला कह्यांत ठेव. मन चंचल व अनावर आहे, विषयाकडे ओढ घेतें म्हणून वर सांगितलें खरें. पण या मनाचा एक मोठा सद्गुण आहे. त्याला जिकडे वळवावें तिकडे तें जातें. ज्ञानेश्वर म्हणतात:—

**परि या मनाचें एक निकें। जे देखिलिया गोडीचिया ठाया सोके।**
**ह्मणोनि अनुभवसुखाचि कवातिकें। दावीत जाइजे।** (ज्ञाने० ६–४२०)

पाण्याचा प्रवाह वळवावा तिकडे वळतो. मन हें पाण्याच्या पाटासारखें आहे. त्याला विषयाची चटक तरी कां लागली? तोच अभ्यास त्याला करूं दिला ह्मणून. तसाच परमार्थाचा, भगवच्चिंतनाचा ध्यास लावला म्हणजे लागतां लागतां तोच गुण घेऊन मन उठेल. भागवताच्या ११ व्या स्कंधाच्या १४ व्या अध्यायांत व्यासांनीं स्पष्ट सांगितलें आहे:—

**विषयान्ध्यायतश्चित्तं विषयेषु विषज्जते।**
**मामनुस्मरतश्चित्तं मय्येव प्रविलीयते॥ २०॥**

भगवंतांनीं गीतेंतही सांगितलें आहे:—

**यतो यतो निश्चरति मनश्चंचलमस्थिरम् ।**
**ततस्ततो नियम्यैतत् आत्मन्येव वशं नयेत् १ ॥**

मुखानें नेहमीं भगवन्नाम गावें, हृदयांत भगवत्स्वरूप चिंतावें, कानानें भगवद्गुण ऐकावे; पायांनीं भगवंताच्या प्राप्तिसाठीं चालावें; हातांनीं भगवंताची व संतांची सेवा करावी; डोकें देवापुढें व संतांपुढें वांकवावें; हृदयांत विषयाला ठाव देऊं नये; सर्व जागा परमेश्वराच्या परमप्रीतीनें व्यापून टाकावी; डोळ्यांनीं भगवंताला पाहावें; फार काय पण सर्व संकल्प भगवत्पर करावेत; जागृतींत—स्वप्नांत, घरीं—दारीं सर्वकाळ भगवंताला नामसूत्रानें हृदयाशीं दृढ आवळून टाकावें. भगवंताच्या नामाचा महिमा लहान समजूं नये. दासीपुत्राचा नारद झाला. नामासाठीं आमचा जन्म अमृतरूप झाला. “ तुका म्हणे रामनामीं । कृतकृत्य झालों आम्ही ” असे तुकोबासारख्यांचे ठसठसित उद्गार आहेत. म्हणून ‘ मुखीं नाम, हातीं मोक्ष । ऐसी साक्ष बहुतांसी ’ ह्या तुकोक्तीवर पूर्ण विश्वास ठेवून अहर्निश मनाला नामाचा छंद लावून द्यावा, म्हणजे अवघी काया गोविंदरूप होईल. क्षुद्र विषयांचीं दिवाभीतें नामधारकाच्या वाऱ्यालाहीं उभीं राहात नाहींत. विषयांच्या नादीं लागलें तर मन कुतऱ्याचें सहोदर बनतें, पण त्याला नामाचें भक्त बनविलें तर अमृताचा चारा खाणारें तेंच हंस बनतें.कोणीहि व्यसनासक्तानें विषयांना भिऊं नये. मागें झालें तें सर्व माफ.

**आतां तरी पुढें हाचि उपदेश । नका करूं नाश आयुष्याचा ॥ १ ॥**

तुकाराममहाराजांनीं आपल्या मनाला हंसाची उपमा देऊन म्हटलें आहे:—

**हरिनामवेली पावली विस्तार । फळीं पुष्पीं भार वोल्हावली ॥ १ ॥**
**तेथें माझ्या मना ! होई पक्षीराज । साधावया काज तृप्तीचें या ॥ २ ॥**
**मुळीचिया बीजें दाखविली गोडी । लाहो करी जोडी जालियाची ॥ ३ ॥**
**तुका ह्मणे क्षणक्षणां जातो काळ । गोडी ते रसाळ अंतरेल ॥ ४ ॥**

येत्या विजयादशमीच्या मुहूर्तावर जर विषयांनीं घालून दिलेल्या

सीमेचें उल्लंघन करावयाचा आम्हीं निश्चय केला तर सर्व व्यसनांपासून आम्ही मुक्त होऊन स्वस्वरूपप्राप्तीचें सोनें लुटूं आणि साम्राज्यपटावर अधिष्ठित होऊं यांत तिळमात्र शंका नाहीं. आपण सर्वच विषयसीमेचें उल्लंघन करूं या, रामनामाचे बाण हातीं घेऊन मोक्षगड घेण्यासाठीं विठ्ठलाचे गाढे वीर होऊं या, म्हणजे आपल्या जन्माचें सोनें होईल; इतकेंच काय पण सर्व विश्वाचें लोहपण नाहींसें होऊन तें सर्व स्वर्णमय होईल. नामधारकाला आजवर कधींहीं व कोठेंहीं अपयश आलें नाहीं. दशेंद्रियें भगवंताला जो अर्पण करील त्याचीच जगांत नित्य फत्ते होईल !

———

६

कीर्तनपुराणव्याख्यान श्रवण करीत असतांना वक्त्याच्या रूपरंगाकडे व विद्वत्ता वगैरे गुणांकडे न पाहतां व दोषांकडे मुळींच लक्ष्य न देतां त्याच्या भाषणाचें सार घ्यावें, त्याचा उपदेश चित्तीं धरावा. खापरींतलें लोणी किंवा मडक्यांतले रुपये त्याज्य समजणारा मूर्ख होय !

Judge not thy preacher for he is thy Judge;
Do not grudge
To pick out treasures from an earthen pot.
George Herbert.

उपदेश तो भलत्याहातीं । झाला चित्तीं धरावा ॥ १ ॥
नये जाऊं पात्रावरी । कवठी सार नारळीं ॥ २ ॥
स्त्रीपुत्र बंदीजन । नारायण स्मरविती ॥ ३ ॥
तुका रत्न सार । परी उपकार चिंधीचे ॥ ४ ॥

* * *

तुका ह्मणे शिरीं वहावें खापर । माजी असे सार नवनीत ॥ ४ ॥

# १८ संक्रांतीच्या हलव्याचे दाणे.

१ ‘ सुख पाहतां जवापाडें । दुःख पर्वताएवढें ’ ही तुकाराममहाराजांची उक्ति मननीय आहे. सुख हें पुण्याचें फळ आहे, व दुःख हें पापाचें फळ आहे. ह्या जगांत पुण्यापेक्षां पाप कोटपटीनें जास्त घडत असल्यामुळें सुखदुःखाचें प्रमाण मेरुसर्षपन्यायानें विलक्षण सांपडतें.

२ याशिवाय आणखी एक विचार आहे. लोक पापबीजाची जोपासना झटून करितात तशी पुण्यबीजाची करीत नाहींत. शेतकरी शेतांत दाणे पेरून त्यावर माती पसरून टाकतो तेव्हांच ते दाणे अंकूर धरितात. दाणे उघडे टाकले तर ते चिमण्याकावळे खाऊन टाकतात. लोक अहंतेमुळें मोहरीएवढें पुण्य केले तरी तें उघड करितात, पण पर्वताएवढें पाप केलें तरी तें झांकून ठेवतात ! अर्थात् उघड केलेलें आणि तेंही अत्यल्प असलेलें पुण्य उडून जातें व झांकून ठेवलेलें व तेंही पर्वताकार असलेलें पाप मोड घेऊन उठतें व त्याचा प्रचंड वृक्ष बनतो ! !

३ दाण्याला भूमि व सिंचन लागत असतें. पापरूप दाणे आपण खोल अंतःकरणभूमींत पेरून त्याला मननाचें सिंचन देत असतों त्यामुळें ते मोड धरितात !

४ आणि पापपुण्य म्हणजे तरी काय ? सत्य हेंच पुण्य व असत्य हेंच पाप. ब्रह्म हें सत्यस्वरूप असल्यामुळें अखंड ब्रह्मचिंतन हें खरें पुण्य व मायेचे सर्व व्यवहार हें पाप. समर्थ सांगतातः—

**सत्याएवढें सुकृत नाहीं । असत्याएवढें पाप नाहीं ।**
**प्रचीतिविण कोठेंच नाहीं । समाधान ॥**
**सत्य ह्मणजे स्वरूप जाण । असत्य माया हें प्रमाण ।**
**येथें निरोपिलें पापपुण्य । रूपें सहित ॥**
**दृश्य पाप वोसरलें । पुण्य परब्रह्म उरलें ।**
**अनन्य होतांच उरलें । नामातीत ॥** दासबोध द १० स. १०.

असत्य हें पाप व सत्य हें पुण्य. आपण असावें तसें दिसावें ही

बुद्धि खरेपणाची म्ह० पुण्याची. आपण जसें असावेंसें आपणांस वाटतें तसेंच जगाला दिसावें ही बुद्धि खोटी म्ह. पापाची. म्हणूनच जगांत सत्यनिष्ठा कमी म्ह० पुण्य कमी, अर्थात् सौख्यही कमी, म्हणून तुकोबारायांची ' सुख पाहतां इ. ' उक्ति सर्वथैव खरी आहे.

५ पुण्य झांकून ठेवण्याची बुद्धि पाहिजे. पुण्य झांकलें तरच तें अंतःकरणांत मोड धरील. म्हणून ज्ञानेश्वर म्हणतातः—

**नाना कृषीवळ आपुलें । पांघुरवी पेरिलें ।**
**तेसें झांकी निपजलें । दानपुण्य ! ॥ ज्ञा० अ० १३-२०७ ॥**

६ गीतेच्या ११व्या अध्यायांत विश्वरूपदर्शनाची जी पुण्यकथा आहे तिचें तात्पर्य 'मत्स्थानि सर्व भूतानि न चाहं तेष्ववस्थितः' ह्या श्लोकार्धांत आहे ! सर्व सृष्टि परमात्म्याच्या ठायीं आहे हें पाहण्यास श्रीकृष्णानें पार्थास शिकाविलें. विष्णुमय जग पाहणें हाच वैष्णवधर्म होय.

७ शिष्य आणि गुरु यांमध्यें भेद आहे असें ज्यास वाटतें तो गुरु नव्हे व गुरु आणि देव यांत भेद आहे असें ज्यास वाटतें तो शिष्य नव्हे ! ! देव, गुरु आणि सच्छिष्य हे एकरूप आहेत.

८ दूध ही अमोलिक वस्तु आहे व गवळण ' दूध घ्या दूध ' असें रस्त्यानें जरी ओरडत जाते तरी ज्याला त्याची गरज आहे तोच तें विकत घेतो ! त्याचप्रमाणें वेदांतशास्त्रांतलीं रहस्यें जगाला फुकट देण्यासाठीं जरी तुकारामासारख्या वाण्यानें मोफत दुकान काढलें आहे, तरी परमार्थाची ज्याला तहान लागली असेल, तोच त्या दुकानापाशीं जाईल !

९ भूतांची दया अंतःकरणांत अनिवार उत्पन्न झाल्यामुळेंच प्रत्युपकाराची अपेक्षा न करितां व वेळीं छळ, अपेष्टा व हाल सोसूनही ' विषयविष न पितां कथामृताकडे वळा. ' असेंच जीवाला संत सांगत असतात.

१० पशुपक्षी ज्वालामुखीजवळ जात नाहींत, त्याप्रमाणें सुखदुःखादि द्वंद्वें ज्ञानाग्नीनें देदीप्यमान् झालेल्या महात्म्याजवळ जाऊं शकत नाहींत.

११ सच्छिष्यानें सद्गुरूला जी गुरुदक्षिणा द्यावयाची असते ती नित्यानित्यविवेकादि साधनचतुष्टयानें पवित्र झालेली हृदयभूमि हृचि होय !

१२ हिरा उकिरड्यांत पडून मळला तरी तो मळ झाडून टाकतांच त्याचें स्वयंसिद्ध तेज प्रकट होतें, त्याप्रमाणें मनावरचे वासनेचे मलिन संस्कार झडून जातांच आत्मस्वरूपाची प्रभा व्यक्त होते. वासनेचे संस्कार गळून पडल्यावरच चित्ताचें चैतन्य होतें.

१३ सपाट जमिनीवरून चालतांनाहीं आंधळा प्रतिपदीं भयग्रस्त होऊन चाचरतो त्याप्रमाणें अज्ञ जीव लहान लहान प्रसंगानें सुद्धां गांगरून जातात. खरें आंधळेपण म्हणजे अज्ञानच होय ?

१४ श्रुतिस्मृतिपुराणेतिहासादि ग्रंथ हीं भवसागरांतून तारून नेणारी नौका आहे व सद्गुरु हे नाविक आहेत. श्रुतिस्मृतींचा अर्थ गुरुमुखानें व सांप्रदायपरंपरेनेंच श्रवण केला पाहिजे.

१५ वाचन आणि श्रवण यांत महदंतर आहे. केवळ आपल्या बुद्धिमत्तेच्या जोरावर ग्रंथमर्म आपणांस सांपडेल अशी कोणींही घमेंड मारूं नये. श्रवण, मनन, व निदिध्यासन ह्याच आत्मसाक्षात्काराच्या तीन पायऱ्या आहेत.

१६ माझ्या ३ वर्षांच्या शांतानामक मुलीला मी एकदां कांहीं खायचा पदार्थ देऊं लागलों, पण ती हात पुढें न करितां ह्मणाली— " मला नको. तें काय आहे कोण जाणे ! तूं तें खाऊन गोड आहे कीं नाहीं, तें मला सांग म्हणजे मी खाईन ! " शांतीचें तें भाषण ऐकतांच मी चकित झालों. सद्गुरु तरी यापेक्षां दुसरें काय करितो ? ब्रह्मज्ञानाचें मधुर फळ स्वतः खाऊन तृप्त झाल्यावरच तो तें शिष्याच्या हातीं देतो !

१७ प्रपंच व परमार्थ हीं दोन्ही ज्याला साधतां येतात त्यालाच उभयलोकांतलीं बहुविध सुखें अनुभवायला सांपडतात. महापुरुषाचें लक्षण समर्थ असें देतातः—

**प्रपंचीं जाणे राजकारण । परमार्थ साकल्यविवरण ।**
**सर्वांमध्यें उत्तम गुण । त्याचा भोक्ता ॥ १ ॥**

१८ परिपक्व झालेल्या फळांमध्यें पाडास आलेलें फळ ठेवलें तर त्यांच्या संगतीनें तें लवकर परिपक्व होतें, त्याप्रमाणें साधकांच्या संगतीनें मुमुक्षु साधकावस्थेला जाऊन लवकर पोंचतो !

१९ नित्यनेमाचा प्रघात सुटों देणें ही धर्मदृष्ट्या अत्यंत मोठी हानि आहे. लहर येईल तेव्हां वाचावें, मनास येईल तेव्हां पूजन करावें, तब्बेत लागेल तेव्हां धर्मकर्म करावें हा 'मनःपूतं समाचरेत्' चा आळशांचा मार्ग अनर्थावह आहे. नित्यनेमाचें महत्व समर्थ वर्णितातः—

**नित्यनेम दृढचित्तीं । तेणें शुद्ध चित्तवृत्ति ।**
**होवोनियां भगवंतीं । मार्ग फुटे ॥ १ ॥**
**एकाग्र करूनियां मन । अंतरीं करावें ध्यान ।**
**सर्व सांग पूजाविधान । प्रत्यहीं कीजे ॥ २ ॥**

२० मनुष्याच्या ठिकाणीं घरादारांविषयीं विलक्षण प्रेम असतें व साडेतीन हाताच्या देहावर आपलेपणाचा मोठा अभिमान असतो. गेहदेहांची व्यापकता वाढवा असें संतांचें सांगणें असतें. विश्वाएवढें आपलें सत्तेचें घर व चराचराएवढा आपला देह असतांना आपण कल्पनेच्या दुःसंगानें व्यर्थ दारिद्र्य कां भोगावें ? ज्ञानोबाराय म्हणतातः—

**हें विश्वचि माझें घर । ऐसी मती जयाची स्थिर ।**
**किंबहुना चराचर । आपण जाहला ! ॥ १ ॥**

---

७

संपत्तीचा परोपकारार्थ व्यय होत असेल तर मात्र ती तिरस्करणीय नाहीं.

Surely use alone
Makes money not a contemptible thing.
—George Herbert.

सा लक्ष्मीरुपकुरुते यया परेषाम् ।
—भारविकृत किरातार्जुनीय.

# १९ श्री शिवलिंगाचें रहस्य.



**शिवहर शंकर नमामि शंकर शिवशंकर शंभो ।**
**हे गिरिजापति भवानिशंकर शिवशंकर शंभो ॥ १ ॥**

१. लिंग, महालिंग शिवलिंग हें परब्रह्माचें वाचक आहे व लिंग-पूजा ही परमात्म्याची पूजा आहे. माघ महिन्यांत महाशिवरात्रीची मोठी यात्रा पुष्कळ ठिकाणीं भरत असते. महाराष्ट्रांतलि लोक जसे हरिभक्त आहेत तसे हरभक्तही आहेत. हरि आणि हर स्वरूपतः एकच आहेत, एका वेलांटीशिवाय त्यांत कांहीं फरक नाहीं. 'एक एकाचे हृदयीं । गोडी साखरेचे ठायीं ।' ध्यानाला मनोहर रूप हवें असतें म्हणून गणपतीचें ओंकारस्वरूप, शिवाचें महालिंग व विष्णूची शंखचक्रगदापद्मांकित मूर्ति हीं एकाच परमात्म्याचीं रूपें आहेत. शिव, विष्णु, विठ्ठल, दत्त, गणपति, राम, ह्या इतक्या देवांच्या उपासना महाराष्ट्रांत चालू आहेत, ही भाषा बरोबर नसून एकाच परमात्म्याला हीं निरनिराळीं नामरूपें देऊन महाराष्ट्रांतील लोक अभेद-भावानें भजतात ही भाषा योजली पाहिजे. देव एक आहे व सर्व उपासक एकाच देवाची पूजा करतात. नरहरि सोनारांचा शिवशंकर, तुकोबारायांचा विठ्ठल, समर्थांचा राम, हे सर्व स्वरूपतः एकच आहेत. कांहीं बहिर्मुख भेदभाव पाळीत असतील, पण 'मुदला दोहींसी ऐक्य शुद्ध । मग उपासकांसी कां विरुद्ध ?' असा प्रश्न नाथांसारखे संत विचारतात ( एकनाथी भागवत अ० ११–१२५५-६० ). हरिहरां भेद नाहीं असें बजावून 'तुका म्हणे ऐक । भेद नाहीं दोघे एक.' अशी हरिहरांची एकात्मता आहे. कोणाचीही उपासना घेतली तरी, ती पूर्णच आहे.

**यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति ।**
**तस्य तस्याचलां श्रद्धां तामेव विद्धाम्यहम् ॥ १ ॥**

ही भगवदुक्ति प्रसिद्धच आहे. आज लिंगपूजेविषयीं थोडा तात्विक विचार करावयाचा आहे.

२. ' लिंग ' हा शब्द ' लिग् ' जाणणें ह्या धातूपासून झाला असून लिंग म्हणजे ज्ञान किंवा पारमेश्वरी ज्ञान म्ह० आत्मज्ञान होय. ( कूर्मपुराण अ. ११—९४ व अ. २४—१०३ मध्यें, लिंगपुराण अ० १९—१५ व अ. ४७—६ मध्यें व अग्निपुराण अ. ५३–३ मध्यें ' लिंग ' शब्दानें काय सूचित होतें तें स्पष्ट सांगितलें आहे. ) ह्या सर्व ठिकाणीं लिंग म्ह० परब्रह्माचें मूर्तस्वरूप होय असेंच सांगितलें आहे. सर्व पिंडी मिळून महालिंग म्हणतात. वेदी म्हणजे पिंडीचा आधारभूत खालचा सर्व भाग. वेदीमध्यें मूलपीठ व ऊर्ध्वपीठ असे दोन भाग आहेत. मुलपीठ, ऊर्ध्वपीठ व पिंडी मिळून महालिंग असें शिवसांप्रदायांत ह्मणण्याची परिपाठी आहे. मूलपीठ हा ब्रह्मा किंवा रजोगुणाचें चिन्ह, ऊर्ध्वपीठ हा विष्णु किंवा सत्वगुणाचें चिन्ह, व लिंग हा शिव किंवा तमोगुणाचें चिन्ह व एकंदर महालिंग म्हणजे ब्रह्माविष्णुमहेशात्मक त्रिमूर्तिरूप परब्रह्म. ह्या गोष्टीचें विशेष विवेचन लिंगपुराण व मत्स्यपुराण ह्यांत केलेलें पहावें.

३ लिंग हें मस्तक व महालिंग हें शिवाचें शरीर. असें म्हणतात कीं समाधिस्थितींत योग्याचें शरीर महालिंगाच्या आकाराचें होतें व अनेक क्षेत्रांतून स्वयंभूलिंगें म्हणून जीं आढळतात तीं महायोग्यांचीं शरीरेंच होत !

४ स्वयंभू लिंग जें आढळतें, तें महायोग्याचें दगड बनलेलें घट्ट शरीर होय. असें समजण्याचें आणखी एक कारण असें आहे कीं, महालिंग हें योगांतील एक उत्तम आसन होय ! मूलपीठ म्ह० पद्मासनांतील जुळलेले पाय, व ऊर्ध्वपीठ हें मधलें शरीर व लिंग हें मस्तक. शंकर हे परमयोगी म्हणून प्रसिद्धच आहे.

५. लिंग हें परमात्म्याचें विराट्शरीराचें चिन्ह आहे असें समजलें कीं, पंचमुखें हीं पंचज्ञानेंद्रियांचीं चिन्हें आहेत हें सहज लक्षांत येतें. शंकर हे महायोगी आहेत व प्रकृति म्हणजे पार्वती त्यांच्या

अंगभूत आहेच. त्यांच्या अंगाला विभूति लावतात, ते स्मशानांत राहतात, त्यांच्या गळ्यांत रुंडमाळा असतात ह्या गोष्टी निस्सीम वैराग्याच्या द्योतक आहेत. महालिंग हें सगुणब्रह्म आहे व म्हणून उपासकांना उपास्य योग्य आहे.

शंकर हे त्रिशूळ हातीं धारण करून त्रिपुरासुराचा वध करितात. त्रिपुर म्हणजे स्थूळ, सूक्ष्म व कारण हीं तीन शरीरें व त्यांचा नाश बोधरूप किंवा ज्ञानस्वरूप शंकर हें श्रवण, मनन व निदिध्यासन ह्या त्रिशूळानें करितात. शमदमादि देवांचें संरक्षण करण्यासाठीं ते कामक्रोधादि असुरांचा नाश करितात. श्रवण, मनन, निदिध्यासन ह्या साधनत्रयीच्या त्रिनेत्रानें बोधरूप शंकराचें स्वरूप उमगतें, किंवा ही साधनत्रयी ज्यापाशीं आहे तोच त्र्यक्ष. ज्ञानस्वरूप शंकर ज्या त्रिपुराचा नाश करितात, तें स्थूळसूक्ष्मकारण देहांचें त्रिपुर हें विश्व तैजस व प्राज्ञ यांनीं भोग्य ह्मणून बळकावलें आहे. ही त्रिपुरासुरांची नगरी आकाशांत म्हणजे कारणांत प्रगट होते ! त्रिपुर म्हणजे वस्तुतः गंधर्वनगरीच आहे. ह्या नगरींत इंद्रियाश्वांवर आरूढ होऊन कामादि असुर आकाश व्यापून टाकतात ह्मणजे कारणब्रह्माला लोपून टाकतात ! त्या असुरांच्या हातांत स्रक्, चंदन, व कामिनीकटाक्ष इत्यादि आयुधें आहेत ! ह्या काममदादि असुरांनीं त्रिपुरनगरींत प्रळय मांडिला ह्मणजे शमदमादि देव दीन होऊन जातात. देव दीन होऊन ईश्वराला शरण गेले ह्मणजे तत्वांचा शोध करूं लागले का दानव पुनः लुले पडतात, त्यांच्या तृष्णादि बायका घाबऱ्या होतात व दानवांना हृदयाकाशांत वासनारूप होऊन लपून बसावें लागतें ! हीं नानारूपें धरून गुप्त होण्याची व संधी पाहून पुनः प्रगट होण्याची दानवांची रीत पुराणप्रसिद्ध आहे !! ह्या दानवांना जिंकणें असेल तर ज्ञानरूप शंकराला सर्वभावानें शरण जाणें हाच एक मार्ग जीवांना मोकळा आहे. ज्ञानावांचून कैवल्य ह्मणजे मोक्ष नाहीं हा सिद्धांत त्रिसत्य आहे. शंकराला शरण जाणें ह्मणजे श्रवणमनननिदिध्यासन ह्या साधनत्रयीचा अखंड अवलंब करणें होय. कामादिरिपुसुखांना

सुकविणारें प्रचंड ध्यानवीर्य, इंद्रियें एकनिष्ठेनें प्रभुपदीं लावणारें तीव्र **तप** व जीवपरमात्म्याचें ऐक्यरूप **सत्य** हे गुण अंगीं आले ह्मणजे ज्ञानरूप शंकराचा पूर्णप्रसाद झाला असें निश्चित समजावें! शिव विष्णु एक आहेत व ते एकमेकांचे भक्त आहेत. तमोगुणमूर्ति शंकर अखंड विष्णुध्यान करितात, ह्मणून ध्यानबळानें ते कर्पूरगौर झाले आहेत व सत्वगुणमूर्ति विष्णु अखंड शंकरध्यान करितात ह्मणून ते श्यामसुंदर झाले आहेत!! दोघांनाही अभिन्नभावानें शतवार प्रणाम असोत.

---

८

स्त्री ही पुरुषाची छाया आहे ही कल्पना वाल्मीकिमहर्षींची व बेन जॉन्सन ह्या इंग्रज कवीची एक कशी आहे पहाः—

कृतकृत्याच वैदेही छायेवानुगता पतिम् ।

—वाल्मीकिरामायण अयोध्या० ४०

Say, are not women truly then
Styled but the shadows of us, men?

—Ben Johnson.

हा छायेचा दृष्टांत पतिपत्नीप्रमाणें बंधुबंधु, देवभक्त, स्वामीसेवक यांनाही उत्तम लागतो. रामलक्ष्मणांचें ऐक्य पहाः—

छाया तनूची तनुला न सोडी । त्या बंधुची एक तशीच जोडी ।
परस्परीं त्यांसि अपार गोडी । त्या मित्रभावा उपमाचि थोडी ॥

—मोरोपंत.

# २० हिंदुधर्म.

—:०ऽ०:—

**पैं अहितापासूनि काढिती। हित देऊनि वाढविती।**
**नाहीं श्रुतिपरौती। माउली जगा॥ ४६२॥** —श्रीज्ञाने० अ०१६.

१ हिंदु म्हणजे अहिंसाशील. ‘ हिन्सा दूयते ’ म्हणजे हिंसेनें जो दुःखित होतो तो हिंदु, ही हिंदु शब्दाची व्युत्पत्ति सामान्यतः सर्वांनीं ग्रहण करण्यास कांहीं हरकत नाहीं असें आम्हांस वाटतें. व्युत्पत्तीनें व ऐतिहासिक सत्यतेच्या बाजूनें पाहतां इतर खंडांतील लोकांपेक्षां आर्यावर्तांतील लोक कायिक, वाचिक व मानसिक हिंसा कमी करितात म्हणून तेच हिंदु अथवा अहिंसाशील ह्या पदाचे अधिकारी आहेत. आम्हीं ‘हिंदु’ आहोंत, आमचा धर्म हिंदु आहे, आमच्या देशाचें नांव ‘हिंदुस्थान’ आहे. आमच्यांत मतभेद, पंथभेद, सांप्रदायभेद कितीहीं असले, तरी श्रुतीला ह्म० वेदाला प्रमाण मानणारे आम्हीं सर्व एकाच हिंदु धर्माचे आहोंत. स्मार्त व वैष्णव, द्वैती व अद्वैती, सगुणभक्त व निर्गुणभक्त कोणीही असो, तो जोंपर्यंत वेदप्रामाण्य मानीत आहे तोंपर्यंत तो हिंदुच आहे. हिंदु लोक वेदग्रंथाला प्रमाण मानणारे व अहिंसा ह्या प्रधान गुणावर आपल्या नीतिमत्तेची मदार ठेवणारे सोशिक, सत्वस्थ व प्रायः शांतवृत्तीचे आहेत.

२. हिंदुधर्म म्हणजे काय याचा थोडासा विचार आजच्या लेखांत करावयाचा आहे. धर्म म्हणजे ज्यानें हें विश्व धारण केलें जातें, समाज धारण केला जातो, सर्व पोटसमाज स्थितीवर ठेवतां येतात तो धर्म. धर्माची कल्पना भय ( Terror ) किंवा आश्चर्य ( Wonder ) ह्यापासून निघाली असावी असे पाश्चात्य पंडितांचे तर्क आहेत. तान्हें मूल डोळे उघडून जगाकडे पाहूं लागलें म्हणजे आश्चर्य व आनंद ह्या मनोवृत्तींनीं प्रथम त्याचें चित्त भरून जातें; त्याप्रमाणेंच पंचविषयांनीं व्यापलेली व निष्कल्मषमनाला शुद्ध आनंद देणारी ही विविध व विचित्र सृष्टि पाहून मानवांच्या पहिल्या पूर्वजाला पराकाष्ठेचें कौतुक

वाटलें असेल ! कांहीं काळानें स्वप्नावस्थेचा अनुभव आल्यावर त्याला एक नवीन कल्पना सुचली असावी. गडप अंधारांत डोक्यावर पांघरूण घेऊन सारीं दारें लावून व दिवे मालवून निजल्यावर पूर्वीं कधीं न पाहिलेलीं किंवा अर्धवट पाहिलेलीं माणसें व अनुभवलेले किंवा अर्धवट अनुभवलेले प्रसंग जेव्हां त्याच्या स्वप्नसृष्टींत निर्माण झालेले त्यानें पाहिले असतील, तेव्हां जागृतपणाची सृष्टि व स्वप्नांतील सृष्टि ह्या दोन भिन्न असून त्यांचा द्रष्टा मी कोणी स्वतंत्र आहें अशी कल्पना येऊन त्याला अपूर्व आनंद झाला असेल ! स्वप्नांत वृत्ति तरी क्षुब्ध असतात, पण वृत्ति निःशेष निमाल्यावेळची सुषुप्तावस्था व तिचें अनुपम सुख अनुभवून ह्या एका देहांत तीन अवस्था व तसेच तीन देह आहेत व अर्थात् या सर्वांस साक्षी असणारा ह्या जडाहून कोणी निराळा आहे असें विचारांतीं त्याच्या मनांत आलें असेल ! ही साक्षित्वाची कल्पना दृढ झाल्यावर मृत्युप्रसंग वरचेवर पाहून, मृत झालेल्या प्रिय माणसांना अन्य देहांत व अन्य योनींत पाहून, मनुष्य जन्मतांना कांहीं वासना व संस्कार बरोबर घेऊन येतो व १००।५० वर्षें केलेल्या व चिंतिलेल्या विविध प्रसंगांचे संस्कार बरोबर घेऊन जातो असें वाटून, निरनिराळ्या अवस्था व निरनिराळे देह धारण करणारा आत्मा अजरामर आहे असा त्याचा निश्चय झाला असेल. आत्म्याचें अमरत्व हेंच धर्मकल्पनांचें बीज होय !

३. मृतांचे आत्मे भेटल्याच्या कथा सर्व देशांत व सर्वधर्मीय ग्रंथांत सांपडतात. आम्हीं श्राद्धपक्ष करणारे लोक पूर्वजांच्या स्मरणार्थ जसा धर्मविधि करितों, तसाच विधि नसला तरी तशीच भावना सर्व देशांत आहे. चिनी व जपानी लोक पूर्वजांचे उपासक आहेत. इजिप्त देशांत राजाराणींचीं प्रेतें मोठ्या समारंभानें पुरून ठेवीत. यांत हेतु एवढाच असे कीं, मृतदेहाचा नाश होऊं नये. मृतदेहाबरोबर त्या भाग्यवंतांचे आत्मेही अमर व्हावेत ही इजिप्शीअन लोकांची बुद्धि ह्या वहिवाटीच्या मुळाशीं होती. ख्रिस्ती, मुसलमान व इतर लोक ह्यांची अशी कल्पना आहे कीं, मृतांचे देह पुरून ठेवले म्हणजे पुनरुत्थानाच्या

दिवशीं (Judgment Day) ते आपले स्थूल किंवा जड (Physical bodies) देह घेऊन पुन्हां आपल्या कर्माकर्मांचें फळ घेऊन उठतील. सर्व धर्मकल्पनांच्या बीजांतील बीजरूप कल्पना म्हणजे आत्म्याचें अमरत्व ही होय. आत्मा अमर आहे असें ठरल्यावर सुद्धां निरनिराळ्या पिंडांतील आत्मे वेगवेगळे आहेत कां सगळें मिळून एकच वेगळी जीवसृष्टि आहे, पिंडांतील आत्मा ( जीव ) ब्रह्मांडांतील आत्मा ( ईश्वर ) ह्याहून स्वरूपतः वेगळा आहे का तन्मयच आहे इत्यादि मुद्द्यांवर हिंदुस्थानांत सुद्धां मतभेद झाले आहेत. ईश्वर सगुण मानायचा का निर्गुण मानायचा हाही एक वादाचा मुद्दा आहे. हें तत्वज्ञान कोणत्याही मतावर झुकत असलें, तरी पंडितांत ईश्वरोपासनेचें स्वरूप आंतलें व बाहेरचें काय समजायचें ह्याबद्दलही अनेकदां रणें माजलीं आहेत ! ! हिंदुधर्माचा कांहीं विशेष असला, तर तो या सर्व मतांचा व पंथांचा आपल्या पोटांत थोरपणानें समावेश करतो हा होय ! कोणत्याही देवतेचा उपासक व कोणत्याही मताचा अनुयायी असला तरी वेदप्रामाण्य मानणारा व सर्व भूतांच्या ठिकाणीं समबुद्धि ठेवणारा अहिंसाशील असला कीं तो हिंदुच आहे; मात्र चातुर्वर्ण्यव्यवस्था ही सामाजिक घटना त्यानें मान्य केलीच पाहिजे.

४. हिंदुसमाज व हिंदुधर्म यांचें मर्म पाश्चात्य पंडितांच्या नीटसें लक्षांत येत नाहीं. हिंदु लोकांचा धर्म त्यांच्या आचरणांत मुरलेला आहे. ‘Fatherhood of God and Brotherhood of man’ ह्या समानतेच्या तत्वावर सर्व भेद मोडून टाकण्याची हांव बांधणाऱ्या पाश्चात्य राष्ट्रांत कायिक, वाचिक व मानसिक हिंसा ज्या भयंकर प्रमाणावर झालेली अद्याप आढळतें, त्याहून ती वर्णभेद व जातिभेद शास्त्रसिद्ध मानूनही आनंदानें व एकोप्यानें राहणाऱ्या हिंदुसमाजांत फारच कमी प्रमाणानें आढळते ! बायबलचे अनुयायी ‘Love thy neighbour’ ही आज्ञा जितक्या आतुरतेनें पाळतात, त्याहून किती पटीनें ज्यास्त सलोख्यानें आपल्या शेजाऱ्यांशीं व परदेशीय व परधर्मीय लोकांशींही हिंदु वागत आले आहेत ! अनेक शतकांचा मुसलमानी छळ व अन्याय सोसणाऱ्या

हिंदी लोकांच्या शिवाजीसारख्या राज्यक्रांतिकर वीरराजानें सूड घेण्याच्या बुद्धीनें मुसलमानांना ताप देणारें एकही दुष्ट कृत्य केलेलें नाहीं, उलट त्यानें मुसलमानांची एक पलटण आश्रयार्थ आलेली पाहून तिला पदरीं ठेवलें व आपल्या आरमारावर एक मुसलमान अंमलदार नेमला ! अहिंसाशील अशी सात्विक प्रवृत्ति हिंदु मनुष्याची निसर्गतः असते. ह्या सात्विक वृत्तीपायीं अनेक छळ व अपेष्टाही हिंदु-राष्ट्रानें सोसल्या आहेत ! वरील गोष्टीचें बीज आपल्याप्रमाणेंच सर्व भूतांच्या ठायीं ईश्वरी तेजाचा वास आहे व आत्मा अमर असून सर्व-व्यापक आहे, ह्या आमच्या धर्मकल्पनेंत आहे. ' भूतमात्रीं हरीवीण । न पाहेचि दूजेपण ' हा आमच्या धर्मांचा मुख्य उपदेश आहे. हा उपदेश वेद, शास्त्रें व पुराणें ह्या सर्वांनीं सर्वत्र केलेला आहे.

**विश्वीं विश्वंभर । बोले वेदांतींचा सार ॥ १ ॥**
**जगीं जगदीश । शास्त्रें वदती सावकाश ॥ २ ॥**
**व्यापिलें हें नारायणें । ऐसीं गर्जती पुराणें ॥ ३ ॥**
**जनीं जनार्दन । संत बोलती वचन ॥ ४ ॥**
**सूर्याचिया परी । तुका लोकीं क्रीडा करी ॥ ५ ॥**

५ वेदवेदांत, शास्त्रें, पुराणें व संत हे सर्वजण एकच तत्व प्रतिपादित आले आहेत. **हिंदुधर्म वेदशास्त्रपुराणोक्त आहे.** वेद तर आम्हांला पूज्य आहेतच; शास्त्रेंही वेदांततत्व प्रतिपादन करणारींच आहेत व पुराणेंही वेदांचेंच मर्म लोकांच्या आवडत्या भाषांतून कथारूपानें सांगणारीं आहेत. वेद तेवढे खरे व पुराणें--शास्त्रें खोटीं असें मानण्याचा कित्येकांचा खटाटोप आहे, पण तो व्यर्थ आहे. समर्थतुकोबांसारखे आमचे खरे धार्मिक पुढारी भेद वाढवीत नाहींत व उलट भेदांत अभेदत्व दाखवीत असतात. समाज कोणत्याही बाजूनें फोडायचें काम पुढाऱ्यांचें नाहीं तर तो जोडायचें आहे ! ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद हे चार वेद व ह्या प्रत्येक वेदाचे संहिता, ब्राह्मण व उपनिषदें हे तीन भाग मिळून हिंदु लोकांचे वेद किंवा श्रुति आहेत. सनातन धर्माचा आधारस्तंभ म्हणजे वेद हे आहेत. पण वेदाध्ययन सर्वांच्या हातून होणें कठिण आहे म्हणून शास्त्रें निघालीं. शास्त्रेंही सामान्य बुद्धीच्या माणसाला

कळणार नाहींत म्हणून त्यांचींच तत्वें प्रतिपादणारीं पुराणें निघालीं व संस्कृत भाषाच लोकांस कळेनाशी होऊन प्राकृत भाषा वाढल्या तेव्हां साधुसंतांनीं तींच तत्वें प्राकृत भाषांतून बहुजनसमाजाच्या आटोक्यांत आणून ठेवलीं व ह्याप्रमाणें अधिकारपरत्वें वेद, शास्त्र, पुराणें व संत-वचनें हीं सर्व एकाच आत्मसिद्धांताचें प्रतिपादन करणारीं झालीं आहेत !! वर दिलेला तुकोबारायांचा अभंग अप्रतिम आहे. त्यांत व्यापक ऐति-हासिक दृष्टीचा विचार लोकसंग्रहाची व समाजसंरक्षणाची किंमत जाण-णाऱ्या थोर पुढाऱ्याला शोभण्यासारखाच केलेला आहे ! जे वेद, शास्त्रें व पुराणें यांत फूट पाडून समाज फोडायचा प्रयत्न करितात, त्यांनीं हें संतांचें धोरण जरूर शिकावें ! हिंदुधर्म जसा वेद, शास्त्रें, पुराणें व संत-वाणी यांनीं प्रदिपादिलेला आहे, त्याचप्रमाणें निर्गुण-उपासना कर-णाऱ्या ब्रह्मनिष्ठापासून तों मूर्तीची पूजा करणाऱ्या, फार काय पण गायवडपिंपळापर्यंत सर्व स्थावर वस्तूंची पूजा करणाऱ्या, अज्ञ व अशिक्षित समजल्या गेलेल्या स्त्रीशूद्रादिकांपर्यंत सर्वांचा संग्रह हिंदु-धर्मानें केला आहे.पूजनीय परमात्मा एकच आहे ही सर्व हिंदूंची शुद्ध भावना आहे, म्हणून उपास्य देवतांचीं रूपें व नांवें निरनिराळीं असलीं म्हणून काय बिघडलें आहे ? वेदांत इंद्र, वरुण, उषा, मरुत्, रुद्र इत्या-दिकांचीं जीं स्तोत्रें आहेत, तीं पृथक् देवतांचीं आहेत असें जरी दिसतें तरी प्रत्येक देवता ‘ एको देवः सर्वभूतेषु गूढः सर्वव्यापी सर्व भूतांत-रात्मा’ अशा भावनेनेंच तीं पूर्ण आहेत. विठ्ठल, राम, कृष्ण, दत्त को-णत्याही देवतेचा उपासक असो, तो तो उपासक ती ती देवता पूर्ण सच्चिदानंद परमात्मा ह्याच भावनेनें उपासितो; त्यामुळें उपास्यें पुष्कळ असलीं, तरी उपासना एकाचीच होते ! ‘जें जें देखिजे भूत । तें तें मानिजे भगवंत ’ हा सर्व संतांचा उपदेश आहे. सर्व जर ब्रह्मरूप आहे तर ‘ प्रतिमा तो देव कैसा नव्हे ? ’ तुळशीला किंवा पिंपळाला एक-निष्ठभावानें प्रदक्षिणा घातल्या, तर त्या सर्वज्ञ व दयाशील देवाला कां बरें पोंचणार नाहींत ? अलबत पोंचतील. असो, हिंदुधर्म वेदशास्त्र-पुराणोक्त आहे. उपास्यें भिन्न भिन्न असलीं तरी सर्व हिंदु एकाच पर-

मात्म्याची उपासना करितात. निर्गुणापासून मूर्तिपूजेपर्यंत सर्वांचा हेतु एकच. सर्वत्र परमात्म्याला पाहणें व सर्व भूतांवर प्रेम करणें हें आमच्या धर्माचें मुख्य अनुशासन आहे. तो सनातन आहे, तो पुरुषोत्तमाधिष्ठित आहे. '**धर्मस्य प्रभुरच्युतः**' हा इहपरगति देणारा आहे. ह्या श्रेष्ठ धर्माचें अनुष्ठान करणें हें आमचें आद्य कर्तव्य आहे.

---

९.

' भ्रममूलमिदं जगत् ' ह्या भ्रमरूप जगच्चक्राकडे जो सूक्ष्मदृष्टीनें पाहील त्याला त्यांतच परमात्मा दिसेल.

In the centre of the whirlwnd, verily now as in the oldest days, dwells and speaks a God.

—Carlyle.

या उपाधिमाजी गुप्त । चैतन्य असे सर्वगत ।
तें तत्त्वज्ञ संत । स्वीकारिती ॥ ( ज्ञाने० २–१२६ )

हें परमात्मचैतन्य आपल्या हृदयांत आहे. ' ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ' हें गीता सांगते. कार्लाईलही त्याच म्ह० ' भूत आणि वर्तमान ' ह्या ग्रंथांत म्हणतो:—

A man has, in his own soul, an Eternal.

# २१ निंदकांचे उपकार.



**जेणें हा देह निंदावा । तो आपुला आप्त जाणावा ।**
**तो निंदक वानावा । विवेकबळें करूनियां ॥ ३९ ॥**

—जुना दासबोध स० १२

१ मनुष्यमात्राच्या ठिकाणीं देहाभिमान सदा जागरूक असल्यामुळें त्याला स्तुति आवडते व निंदा खपत नाहीं. आत्मस्तुतिपरनिंदा हा जीवमात्राचा स्वभाव आहे; पण या स्वभावानें उलट खाऊन परस्तुति-आत्मनिंदा आवडूं लागली कीं, परमार्थबुद्धीचा अंकुर फुटूं लागला आहे असें निश्चित समजावें. साडेतीन हातांचा देह तो मी, अशी बुद्धि बळकट झाली असल्यामुळें व जनीं जनार्दन पाहण्याइतकी समरसता प्राप्त झाली नसल्यामुळें सामान्य मनुष्याला आपली स्तुति कानानें ऐकणें जितकें आवडतें, तितकीच परनिंदा जिव्हेनें करणें सुद्धां आवडतें. माझ्या भरतानें राज्य करावें, व सवतीच्या रामानें वनवास भोगावा अशी कैकेयीची दशरथापाशीं दुहेरी मागणी होती. ' तुझा भरत राज्य करूं दे, पण माझ्या रामाला वनवासाला पाठवूं नकोस' ही दशरथाची सयुक्तिक विनंतीही तिला रुचली नाहीं. देहाहंकृतीचा स्वभावच कैकेयी-प्रमाणें असा दुहेरी आहे कीं स्वस्तुति व परनिंदा हीं सारख्या प्रमाणानें व एकसमयावच्छेदेंकरून तिला आवडत असतात ! आत्मस्तुति पाहिजे तर करीत रहा पण परनिंदा तरी करूं नकोस हा दशरथी उपदेशही तिला रुचत नाहीं. ज्याला आत्मस्तुति आवडते तोच परनिंदेनें खूष होतो. जेथें एक आहे तेथें दोन्हीं आहेत, जेथें एक नाहीं तेथें दोन्ही नाहींत. ' परगुणपरमाणूंचे पर्वत करणारे ' व त्या उदात्त भावनेनें आपल्या ठिकाणीं डोलणारे सज्जन जगांत फार विरळ आहेत. ' मज आहे तुज साजेना । हें तों ठाउकें आहे जना ' असा समर्थांनीं लोकस्वभाव वर्णिला आहेच !

२ आत्मस्तुति–परनिंदा हा अनिवार जीवभाव असल्यामुळें व मनुष्यप्राणी त्रिगुणात्मक अतएव गुणदोषयुक्त असल्यामुळें कोणीही सर्वथा निर्दोषी असूं शकत नाहीं, व स्तुतिनिंदेच्या तडाख्यांतून प्रायः कोणीही सुटत नाहीं. परनिंदेच्या पोटांत आत्मस्तुति गर्भित असते व आत्मस्तुतीच्या पोटांत परनिंदाही गर्भित असते असा सर्वसाधारण नियम आहे.

३ ॲडिसन ह्या सुप्रसिद्ध इंग्रज निबंधकारानें एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं, ' Censure is the tax which a man pays to the public for being eminent; it is folly for a wise man to think of es#caping it and a weakness to be affected by it " चारचौघांपेक्षां अधिक गुणवान् व लौकिकवान् असलेल्या प्रत्येक मनुष्याला ' टीका उर्फ निंदा ' हा कर लोकांना द्यावा लागतोच, म्हणजे लौकिकवान् मनुष्यास लोकांच्या टीकेला किंवा निंदेला पात्र व्हावेंच लागतें. लोकनिंदेपासून मी सुटेन अशी अपेक्षा शहाण्यानें करणें वेडेपणाचें आहे व लोकनिंदेनें विव्हळ होणें हें दुबळेपणाचें लक्षण आहे! ॲडिसनच्या म्हणण्याचा भावार्थ हा असा आहे. इंग्रजी भाषेंतला विख्यात ग्रंथकर्ता व पहिला कोशकर्ता सुप्रसिद्ध डॉ॰जान्सन हा टीकाकारांच्या कोल्हेकुईला अगदीं न भिणारा धीरपुरुष होता. त्याच्यावर टीकाकारांनीं व निंदकांनीं एकदां वाग्बाणांचा वर्षाव केला असतांना तो धीर पुरुष बॉस्वेलनामक आपल्या शिष्याजवळ एवढेंच म्हणाला होता: ' Let the dogs bark, they dare not harm my reputation." म्हणजे कुत्रीं भुंकोत बिचारीं, त्यांच्या भुंकण्यानें माझ्या यशोमंदिराचा एक चिराही ढळणार नाहीं ! टीका व निंदा कोणत्याही खऱ्या कार्याची महती कमी करूं शकत नाहींत. फाजील स्तुतीनें जसा कोणी अजरामर होत नाहीं, तसा फाजील निंदेनें कोणीही चिरकालीन अपयशाला पात्र होत नाहीं.

४ वर ॲडिसन किंवा जॉन्सन यांच्या मुखांतले जे उद्गार दिले आहेत त्यांत निंदकांविषयीं एक प्रकारची तुच्छबुद्धि तरी दिसते. निंदेचे वाग्बाण बोथट करून टाकणाऱ्या अशा धैर्याचीही प्रशंसा करणें योग्य

आहे खरें; तथापि निंदकांचा तिरस्कार करणाऱ्यांपेक्षां निंदकांविषयीं उदासीन असणारे पुरुष वरच्या पायरीचे आहेत. डॉ. जान्सनच्या वरील उद्गारापेक्षां भवभूतीचेः—

ये नाम केचिदिह नः प्रथयंत्यवज्ञां ।
जानन्तु ते किमपि तान्प्रति नैष यत्नः ।

हे उदासीनतेचे उद्गार जास्त वरच्या पायरीचे आहेत. निंदकांची उलट निंदा करणें हा गौण पक्ष! निंदकांविषयीं उदासीन असणें हा मध्यम पक्ष व निंदकांना व्यापकपणानें आपणांत मिळवून घेणें व त्यांना मित्र व गुरु समजणें हा उत्तम पक्ष ! ! पहिल्या पक्षानें सारा व्यवहार भरला आहे, दुसऱ्या पक्षांत प्रशंसनीय मनोधैर्य प्रकट होतें, व तिसरा पक्ष हा साधुसंतांच्या चरित्रांतच पाहण्यास सांपडतो. उदासीनपक्षांत पोटांत तरी जळजळ असण्याचा संभव असतो; पण साधुसंतांच्या विश्वव्यापक प्रेमांत द्वेषासारख्या हीन मनोवृत्तींना थारा मिळणें अशक्य असतें; त्या पार वितळूनच जातात.

५ ज्याला परमार्थाची कांस धरून भगवत्प्राप्ति करून घ्यायची आहे त्यानें निंदेला निंदा, ठोशाला ठोसा, हा राजसी लोकांचा मार्ग सोडलाच पाहिजे, व निंदा गिळून निंदकाला मित्र म्हणून आलिंगन द्यायला पुढें सरसावलें पाहिजे; निंदेंत जो ग्राह्यांश असेल तो घेऊन आपले दोष जाणून टाकायला शिकलें पाहिजे. ‘ निंदकाचें घर असावें शेजारीं’ ही गोष्ट खरी आहे. आपल्या कृतींतले दोष अंध आत्मप्रेमामुळें आपल्यास दिसत नाहींत, ते जो बिनपगारी मित्र आपण होऊन उदारपणानें आपल्यास दाखवून देतो त्याची ‘ निंदक ’ ह्या अमंगळ नांवानें आपण तरी कां हेळणा करावी बरें ? दानस्नानजपोपवासनियमादिकांनीं जें पाप नाहींसें होत नाहीं तें निंदकांच्या दोषैकदृष्टीमुळें होतें, म्हणून निंदकांची दोषदृष्टि ही आपली उपकर्ती गुरु माउली आहे अशी भावना ठेवून साधकानें निंदकांचा राग करितां कामा नये. परहितकार्यांत अग्रेसरत्वाचा मान निंदकांच्या जिव्हेला दिला पाहिजे ! परांचा दुरितभर बळें माथा घेणारे निंदक बहुकष्टानें सांचविलेलें आपलें पुण्य परकार्यांत

खर्चतात म्हणून परोपकारी पुरुषांत त्यांचा नंबर पहिला लागला पाहिजे; म्हणून पंतांनीं म्हटलें आहे,—

आर्या

**देवा ! निरामय सुखी शतवत्सर सर्व खळ असावेच ।**
**व प्रार्थितां नच करिल पंकाचा तीर्थजळ असा वेंच ॥**

६ मुद्याची गोष्ट ही कीं, आपल्याला देहबुद्धीची राखरांगोळी करायची असेल तर निंदकांसारखे साह्यकर्ते खरोखरीच दुसरे कोणीही मिळायचे नाहींत. मी पांचभौतिक स्थूळाहून निराळा आहें हें अंतरीं ठसविण्यासाठीं स्थूळाचा कंटाळाच आला पाहिजे व निंदक तरी स्थूळाचीच निंदा करीत असतात.आहीं होऊनच देहास निंदितों व जो देहास निंदितो तो आमचा पूर्ण हितकर्ता होय. नाथांचें पुढील बहारीचें पद वारंवार गुणगुणून त्यांच्या अर्थाचें मनन करीत निंदोक्तींतूनही आपलें हित तेवढें काढून घ्यावें:—

पद.

**निंदक कामाचा कामाचा । गडी आत्मारामाचा ॥ ध्रु० ॥**
**निंदक आमुची काशी । आमुचीं पातकें अवघीं नाशी ॥ १ ॥**
**निंदक आमुची गंगा । आमुचीं पातकें नेते भंगा ॥ २ ॥**
**निंदक आमुचा सखा । आमचीं वस्त्रें धुतो फुका ॥ ३ ॥**
**निंदक आमुचा गुरु । एका जनार्दन थोरु ॥ ४ ॥**

———

१०.

एकांताचें वर्णन शेक्सपीअर As you like it ह्या नाटकांत करितों:—

And this our life exempt form public haunt,
Finds tongues in trees, books in the running brooks,
Sermons in stones and good in every thing!

तुकोबाराय लिहितात:—

वृक्षवल्ली आम्हां सोयरीं वनचरें । पक्षीही सुस्वरें आळविती ॥१॥
येणें सुखें रुचे एकांताचा वास । नाहीं गुणदोष अंगा येत ॥२॥

# २२ हिंदुधर्माची योग्यता.



## एका अमेरिकनाचें व्याख्यान.

मायरन् एच् **फेल्प्स** नामक एका प्रसिद्ध अमेरिकन सद्गृहस्थाचें गेल्या एप्रिल महिन्यांत ( इ० स० १९१० ) विवेकानंद वाचनालयांत अमेरिकेंत कौलालंपर नामक गांवीं ' हिंदु लोकांस हिंदुधर्माचें महत्त्व ' या विषयावर एक अत्युत्कृष्ट व्याख्यान झालें. त्याचा गोषवारा आम्हीं आपल्या वाचकांसाठीं पुढें देत आहोंत.

१ " मला हिंदु लोकांपुढें व्याख्यान देण्यांत फार समाधान वाटतें. स्वामी विवेकानंद यांचा माझा प्रथम परिचय इ० स० १८९३ मध्यें चिकॅगो शहरीं झाला व नंतर ते कित्येक वेळां न्यूयॉर्क शहरीं माझ्या घरीं माझे पाहुणे म्हणून उतरले होतें. त्यांची विद्वत्ता, वक्तृत्व व लोकचित्ताकर्षकत्व अलौकिक होते. मी हिंदुलोकांच्या धर्मग्रंथांचा तेवीस वर्षें अभ्यास करीत असून त्यामुळें इंडियनांविषयीं माझ्या मनांत फार प्रेमभाव उत्पन्न झाला आहे.

२ " इतर धर्मांपेक्षां हिंदुधर्माची योग्यता तीन कारणांनीं श्रेष्ठ आहे. पहिलें कारण असें कीं, **हिंदुधर्म जिवंत धर्म आहे**. हिंदुधर्माचें सार या एका गोष्टींत आहे कीं, मनुष्यदेहांत असतांनाच विदेहस्थितीचें, ईश्वरदर्शनाचें व अपरोक्षानुभवाचें पद प्राप्त करून घेण्याचें सामर्थ्य प्रत्येक मनुष्यांत स्वभावसिद्ध आहे असें तो प्रतिपादितो ! स्वतःला अनुभवसुख प्राप्त झाल्यांवर तो तें दुसऱ्यास देण्याचा अधिकारी अथवा संत होतो. अनुभव एकच आहे पण त्याचे साक्षी जे संत त्यांची अविच्छिन्न परंपरा चालू रहाण्यांत मुख्य फायदा हा असतो कीं वेडगळ कल्पना व ढोंगमत यांचा बाजार पसरणें तेणें करून अशक्य होतें. अशी परंपरा हिंदुस्थानांत अनादिकालापासून चालत आहे.पाश्चात्य देशांत मात्र त्यांचा दुष्काळ आहे; येशु ख्रिस्त पॉल आणि जॉन हे महाज्ञानी झाले खरे

पण त्याचा परंपरा अबाधित चालू राहिली नाहीं. ख्रिस्ताची शिकवण अत्युत्कृष्ट होती, पण शेंकडों ख्रिस्ती धर्मपंथांना आज कित्येक शतकें अज्ञानांधःकारांत चांचपडावें लागत आहे, व महत्त्वाच्या बाबतींतही त्यांचें एकमत झालेलें नाहीं. जे येशूवर श्रद्धा ठेवीत नाहींत अशा पातक्यांना कोणती शिक्षा असावी, ख्रिस्त हा देवपुत्र होता का नुस्ता मनुष्य होता इ० प्रश्न या प्रकारचे होत. चर्च व सत्य यांत फारकत झाल्यामुळें चर्चची मतें तर्काच्या कसोटीला उतरत नाहींत व त्यामुळें कोणाचेंही समाधान होत नाहीं. ख्रिस्त्यांचीं प्रार्थनामंदिरें म्हणजे सामाजिक संस्था झाल्या आहेत ! अनुभवी उपदेशकांची तेथें वाण पडल्यामुळें त्यांचा लोकांच्या चारित्र्यांवर कांहीं परिणाम होत नाहीं. हिंदु धर्माची वाट याप्रमाणें चुकलेली नाहीं; संशयात्मक तर्कांना तो बळी पडला नाहीं. आत्मानुभवी संत हिंदुस्थानांत सारखे उत्पन्न होत असल्यामुळें त्याच्या सत्यत्वाबद्दल आणि विश्वसनीयत्वाबद्दल शंकाही घेण्याचें कारण नाहीं. ( Hinduism has been held to facts by Living witnesses; it is therefore a true and reliable Guide )

३. " हिंदुधर्माची योग्यता सर्व धर्मांहून जास्त मानण्याचें दुसरें कारण असें आहे कीं, **हिंदुधर्म जगाचा आदिपर्व आहे.** तो अति प्राचीन आहे, सनातन आहे व सर्व धर्मांचें उत्पत्तिस्थान आहे; इतकें असून शिवाय तो पूर्णत्वास पोंचलेला, शास्त्रसिद्ध व व्यवहार्य आहे. ( It is also the most highly developed, the most scientific and the most practical of Religions. ) चवदाशें वर्षांपूर्वी लढवय्या व कमी सुधारलेल्या अरब लोकांना जो धर्म बरा वाटला त्यानें किंवा प्राप्तीची ज्यांना विशेष उत्कंठा नाहीं अशा पाश्चात्यांच्या ( of Westerners who are in no hurry to get to God ! ) गरजा भागविणारा जो ख्रिस्ती धर्म त्यानें हिंदी लोकांची धर्मतृष्णा तृप्त होणार नाहीं. अनादिकालापासून ईश्वरासंनिध जाण्याची अत्यंत उत्कंठा हाच ठळक गुण ज्या हिंदी लोकांच्या हाडींमांशीं खिळला आहे, त्यांची तृप्ती वरील गरीब धर्मांनीं कशी होणार? धर्माचीं सर्व तत्वें किंवा अध्यात्म-

शास्त्राचीं सर्व रहस्यें वेदांत संग्रहीत झालेलीं आहेत. जें पाहिजे तें वेदांत आहे. वेद ही सर्व धर्मांची आई आहे. वेदांला मनुष्यप्रामाण्याची गरज नाहीं. ( Her authority is dependent upon no man ) किंवा वेदाचे सिद्धांत एकाद्या व्यक्तीच्या चरित्राशीं संलग्न झालेले नाहींत. वेद अनादि आहेत अशी हिंदूंची श्रद्धा आहे व ती अगदीं योग्य आहे. बुद्धधर्म, ख्रिस्तीधर्म, मुसलमानी धर्म, पारशी धर्म इत्यादि धर्म एकेका व्यक्तीच्या उपदेशावर उभे राहिले आहेत, ते त्या त्या व्यक्तीच्या चरित्रांत मिळून गेले आहेत; यामुळें त्यांची शाश्वती मानतां येत नाहीं. येशुख्रिस्त ही व्यक्तीच झाली नाहीं असें सिद्ध झालें तर ख्रिस्ती धर्मांची काय अवस्था होईल ? असें सिद्ध होण्याचा संभवही आहे; म्हणूनच जोसेफनें जो ‘ ज्यू लोकांचा इतिहास ’ लिहिला त्यांत येशू ख्रिस्ताचें नांवही नव्हतें, म्हणून ख्रिस्ती चर्चनें त्याचें नांव असलेला प्रक्षिप्त भाग त्यांत घुसडून दिला ! यावरून इतर धर्मांची अशाश्वती व हिंदुधर्मांची शाश्वती यांचा विचार मनांत येऊन हिंदुधर्मांची उभारणी किती स्थिर पायावर व कशी अभेद्य दुर्गावर झाली आहे हें नीट मनावर बिंबतें ! हिंदुधर्मांचा प्रसार करणारे महात्मे तरी किती झाले आहेत. हिंदुधर्मांचीं नुसतीं तत्वेंच लोकोत्तर नाहींत तर त्याचे प्रवर्तकही तसेच लोकोत्तर होऊन गेले आहेत. तामील प्रांतांत त्रेसष्ट संत झालेले आहेत. राम, कृष्ण, शंकराचार्य, चैतन्य, रामानुज, रामकृष्ण परमहंस इत्यादि हजारो महात्मे हिंदुधर्मांचे संरक्षक झाले. यांपैकीं प्रत्येकाला स्वतंत्र धर्म स्थापतां आला असता, पण या वेड्या हांवेच्या भरीस न पडतां त्यांनीं हिंदुधर्मप्रसारार्थच आपापलीं बहुमोल आयुष्यें खर्च केलीं. नवे नवे धर्म काढण्याचें सामर्थ्य अंगीं असून त्यांनीं तसें न करितां वेदधर्मांचा—हिंदुधर्मांचा—जयजयकार केला.

४ “ यज्ञयागादि धर्मकर्मांचाही विचार केला तर असें दिसून येतें कीं, सर्व दर्जाच्या व सर्व तऱ्हेच्या लोकांच्या हाताला व मनाला असा उद्योग लावून देण्याचा त्यांचा हेतु दिसतो कीं, जेणेंकरून आपापलीं कर्में करीत असतांना सर्वांचाच परमेश्वराकडे ओढा लागावा. इतिहास-

पुराणें व रामायणमहाभारतादि ग्रंथही याच हेतूनें तयार झालेले आहेत. धर्म ही अत्यंत व्यवहार्य व शास्त्रीय गोष्ट आहे. ब्रह्मविद्या ही अत्यंत कठिण व कष्टसाध्य आहे व तिच्या प्राप्तीचा मार्ग सुलभ करण्याचाच यांचा हेतु दिसतो. शास्त्रागमांचाही एकच हेतु आहे.

५ " एक उदाहरण घेतों. पाश्चात्यांच्या मानसशास्त्राला ( Phychology ) जागृति व स्वप्न या दोनच अवस्था माहीत आहेत. ज्या अवस्थेंत विचाराची ( thought ) क्रिया बंद आहे पण जाणीव ( consciousness ) आहे अशा अवस्थेची त्यांना कल्पनाच नाहीं ! पण हिंदु तत्वज्ञान्यांच्या ग्रंथांवरून जगाला ही गोष्ट प्रथम कळली कीं, मन आणि आत्मा हे एकच नव्हत तर ते भिन्न आहेत ! त्यांनीं आम्हांला शिकविलें कीं, विचार किंवा वृत्ति शून्य झाल्या तरी आत्मत्वाची जाणीव कायम राहते. ही गोष्ट कोणाही सोत्कंठ मनुष्याला प्रतीतीनें कळून येणार आहे.

६ " भगवान् श्रीकृष्णांनीं गीतेंत सांगितलें आहे कीं, आत्मा अविकारी व शाश्वत आहे व मर्त्य आणि विकारी अशा मनापासून भिन्न आहे, आणि मन पवित्र असल्यास आत्मप्राप्तीच्या उद्योगास चांगलें साह्यकारी होतें आणि तेंच अपवित्र व मलिन असल्यास प्रतिबंधक होतें. भगवान् स्पष्ट सांगतात कीं, प्रत्येक पारमार्थिक मनुष्यानें आपलें मन निर्मळ ठेवावें. कां कीं तेंच आत्मप्रतीतीच्या व जीवशीवैक्याच्या आड येतें. मन निष्कल्मष आणि साधनचतुष्टयादि साधनांनीं तयार झालें असेल तरच आत्मा व परमात्मा यांचे ऐक्यज्ञानासंबंधाचा मधला पडदा दूर होऊं शकेल (Only the purified and disciplined mind can lift the veil which prevents the spirit from knowing itself and God.) समजा, तुमच्या बापानें तुमच्या तैनातीला एक चाकर दिला व तो देतांना तुम्हांला बजावून सांगितलें कीं, " हाच जन्मभर तुमचा सहचर राहावयाचा आहे. " तर त्या चाकराला दुष्टसंगती लागूं नये, तो व्यसनाधीन होऊं नये, तो शुद्धमनाचा व मोकळा रहावा अशाबद्दल तुह्मी खबरदारी घेणार नाहीं

काय ? घ्यालच घ्याल. हीच गोष्ट मनाला लागू आहे. आपलें मन दुर्विकारांच्या व हीनवृत्तींच्या अधीन होऊं न देण्याविषयीं आपण जपलें पाहिजे. मन निष्पाप कसें ठेवावयाचें ? शास्त्राच्या आज्ञा पाळून, शास्त्र प्रमाण मानून, आपले विचार आधीं व्यवस्थित करा म्हणजे आचार आपोआपच सुधारतील. संतसज्जनांच्या उपदेशानें चाला; विषय-वासना जिंका; दुर्गुण टाका, प्रेम आणि औदार्य यांचा अभ्यास करा.

७ " तुमच्या धर्मासंबंधानें तिसरी महत्वाची गोष्ट ही कीं, **हिंदु धर्म हें हिंदूंच्या राष्ट्रीयत्वाचें मुख्यांग आहे** व तिकडे तुम्ही दुर्लक्ष कराल तर तुमचें राष्ट्र दुबळें व निर्जीव होईल. प्रत्येक राष्ट्र कांहीं विशेष संस्था निर्माण करितें व त्या त्याच्या परिस्थितीला योग्य असतात; त्या संस्थांत त्या राष्ट्राचें वाङ्मय, त्याच्या रीतिभाती, त्याचे समाजनिर्बंध, जाति इत्यादिकांचा समावेश होतो. ह्या सर्व परस्परानुबंधि असतात व त्या सर्व मिळून राष्ट्र बनतें. प्रत्येक राष्ट्रानें आपलें विशिष्टपण सांभाळलें पाहिजे. स्वदेशाची भाषा सोडणें म्हणजे आपल्या पूर्वजांच्या विचारांशीं फारखत मागणें होय. पूर्वजांनीं महत्प्रयासानें संपादिलेल्या सुविचाररत्नांचा भाग्यप्राप्त लाभ दवडणें यापरतें मूर्खत्व कोणतें ? तुमचा धर्म आणि तुमचें वाङ्मय हे पर्यायशब्दच आहेत. हिंदूचे धर्मग्रंथ मूळांतच वाचले पाहिजेत म्हणजे त्यांतील विचारांचा जिवंतपणा अंगांत मुरतो. तुमच्या मुलामुलींना परकीयांच्या मार्फत शिक्षण मिळत असल्यामुळें त्यांच्या मनाचा कल कोणीकडे वाहतो आहे बरें ? मूलींचाच विचार प्रथम करा. मिशन बोर्डिंग स्कुलांत उत्पन्न होणारे स्नेहसंबंध किंवा संस्कार, तेथें त्यांच्या डोक्यांत शिरणारे पाश्चात्यांचे विचार, तेथील शिक्षक व ग्रंथ यांचा त्यांच्या कोमल मनावर होणारा परिणाम, यामुळें पाश्चात्यांचें अनुकरण करण्याची बुद्धि त्यांच्या मनांत सहजच उत्पन्न होते! (Consider first your girls. The associations of their life in the Mission Boarding School, the Western ideas which they imbibe there, both from their teachers and books which they study, fill them with the desire to imitate Western life ). हिंदु मुलींनाच हिंदूच्या साध्याभोळ्या

चाली आवडेनाशा होतात! हे दुष्परिणाम टाळण्याकरितां मुलींचे कित्येक पालक आपल्या मुलींना मिशनस्कूलमध्यें न पाठवितां घरींच अज्ञानांत ठेवतात, आणि खरोखरीच मुलींच्या मनांवर मिशनरीसंस्कार होऊन त्या सुशिक्षित होण्यापेक्षां त्या अशिक्षित राहण्याचे कमी प्रतीचे दुष्परिणाम ते खुषीनें पत्करतात!........तात्पर्य, तुमच्या धर्माचें महत्त्व तुह्मीं ओळखून आपल्या राष्ट्रीय संस्था जतन केल्या पाहिजेत." फेल्प्स् साहेब शेवटीं म्हणतातः—"These then are the three reasons because of which you should cherish your religion the fact that it is a living religion in a unique sense, that it is scientific, carefully elaborated, and practically valuable to an extent not approached by any other religion and finally that it is a part of your racial character, knit up inseparably with it and with your language and customs, and on no account to be discarded."

———

१

परमात्मा दयाघन आहे असा श्रुतिशास्त्रांचा डिंडिम आहे व माझा अनुभवही आहे. लोकांवर व माझ्या स्वतःवर आलेल्या अनेक आपत्तींचा सूक्ष्म विचार करून पाहतां शेवटीं हेंच सार निघतें कीं देव दयाळु आहे!

२

ज्यांना आपण आपत्ति, संकटें, विघ्नें, आघात, दुःखप्रसंग असें वरवर पाहून म्हणतों ते सारे प्रसंग भगवंताच्या दयेचेच निदर्शक आहेत असें खोल विचारांतीं आढळून येतें.

३

आमचीं कायावाचामनाचीं कर्में किती अमंगळ असतात हें पाहतां आमच्या दुष्कृतींच्या मानानें आम्हांस भोगाव्या लागणाऱ्या यातना कांहींच नाहींत व हा विचार मनांत येऊन देवाच्या दीनदयाळुत्वाच्या स्मरणांत मी गहिंवरून जातों.

# २३ एका भिक्षूची गोष्ट.



## पद.

तूं तो राम सुमर जग लढवादे ॥ ध्रु० ॥
कोरा कागद काली शाई । लिखत, पढतवाकु पढवा दे ॥ तूं० ॥१॥
रंडी चंडी शितला देवी । फतर पुजतवाकु पुजवा दे ॥ २ ॥
हत्ती चलत है आपने गतमो। कुतर भुकतवाकु भुकवा दे ॥ ३ ॥
कहत कबीरा सुनभइ साधू । नरक पचतवाकु पचवा दे ॥ ४ ॥

१ श्रीमद्भागवताच्या ११ व्या स्कंधांत २३ व्या अध्यायांत एका भिक्षूची मनोहर कथा सांगितली आहे ती वाचकांनीं नाथभागवतांत नाथांच्या सुंदर टीकेसह वाचावी अशी प्रथमच विनंती करून त्या कथेंतील मुख्य मुद्द्याचा प्रस्तुत लेखांत विचार करूं. ह्या राजस जगांत एखादा भाग्यवान् पुरुष परमार्थमार्गाचें आक्रमण करूं लागला तर त्याचे इतर सोबती त्याला प्रोत्साहन देण्याऐवजीं त्याचे पाय धरून कसे ओढतात. व त्यांचा छळच त्याच्या उद्धारास कसा पोषक होतो, हें ह्या गोष्टीवरून समजतें.

२ देहाहून आत्म्याचें विलक्षणत्व सांगण्याच्या ओघांत भगवान् श्रीकृष्ण म्हणाले कीं, “ आत्मस्वरूपाच्या चिंतनांत पुरुष रंगून गेला कीं, देहविषयक सर्व विचारांपासून,विषयांपासून व विकारांपासून तो मुक्त होतो. आत्मप्राप्ति इच्छिणाऱ्या पुरुषाचा दुष्ट मत्सरी लोकांनीं छळ केला, अपमान व तिरस्कार केला, उपहास केला, त्याचें उपजीविकेचें साधन नाहींसें केलें, त्याला मारलें व आत्मचिंतनापासून त्याचें मन भ्रष्ट करण्याचा प्रयत्न केला, इ० संकटें त्यावर आणून त्याचा उच्छेद करण्याची आटोकाट खटपट केली तरी ‘ **मुमुक्षूनें** ’ ती विवेकानें सहन करून आत्मनिष्ठा दृढतर करावी व आपल्याला संसारबंधनांतून सोडवून घ्यावें;–‘ श्रेयस्कामः कृच्छ्रगत आत्मनाऽऽत्मानमुद्धरेत् ’–हा श्री-

कृष्णाचा उपदेश ऐकून 'विद्वानांचें सुद्धां बळ प्रकृतिप्रभावापुढें कांहीं चालत नाहीं तर मग एवढा इंद्रियजय मुमुक्षुसाधकांना कसा साधणार' असा उद्धवानें प्रश्न केला. त्याला उत्तर म्हणून भगवंतांनीं भिक्षुचरित्र उद्धवास सांगितलें.

३ पूर्वी मालव देशांत अवंतीनामक नगरांत कृषिवाणिज्य म्ह० शेतीव्यापारावर राहणारा एक ब्राह्मण होता. त्याचा स्वभाव पराकाष्ठेचा कद्रु होता. स्वतःच्या पोटाला खायचा नाहीं; पुत्र, दारा, देवता, अतिथि व चाकरमाणसें यांना छळायचा, अशा स्वभावाच्या माणसाला कदर्यु उर्फ कद्रु म्हणतातः—

आत्मानं धर्मकृत्यं च पुत्रदारांश्च पीडयन् ।
देवतातिथिभृत्यांश्च स कदर्य इति स्मृतः ॥ १ ॥

त्याच्या पराकाष्ठेच्या कृपणपणास कंटाळून त्याचीं बायकापोरेंसुद्धां त्याचा द्वेष करूं लागलीं. द्रव्य महाअनर्थाचें बीज होय. द्रव्य मित्रामित्रांत वैर पाडतें; बंधूंची जोडी फोडतें; पितापुत्रांत विरोध आणतें; स्त्रीपुत्रांसीं द्वंद्व वाढवितें; चोरी, हिंसा, असत्य, दंभ, काम, क्रोध, गर्व, मद, वैर, अविश्वास, भेद, स्पर्धा, स्त्री, द्यूत व मद्य हे सर्व एका अर्थाचे पंधरा अनर्थ आहेत! 'तस्मादनर्थमर्थाख्यं श्रेयोऽर्थी दूरतस्त्यजेत् ।' द्रव्याच्या व स्त्रीच्या नादीं लागून जे पुरुष नरदेहाची माती करितात ते परम अभागी होत. असो. कालांतरानें त्या भिक्षूला त्याच्या आप्तेष्टांनीं सोडलें, त्याचें द्रव्य गेलें व ईशसंकल्पानुसार त्याच्या मनांत तीव्र निर्वेद म्ह० वैराग्य उत्पन्न झालें. "द्रव्यमोहानें माझें वय, बळ, सौख्य, आप्त, मित्र सर्व नष्ट झाले; खचित कोणत्या मोहानें बरें मनुष्य क्लेश भोगण्यास तयार होतो? हा लोक मृत्युग्रस्त आहे हें लोक कां बरें विसरतात? अथवा मला वाटतें माझे आतां तरी डोळे उघडले ही देवाची कृपाच होय!

**नूनं मे भगवांस्तुष्टः सर्वदेवमयो हरिः ।**
**येन नीतो दशामेतां निर्वेदश्चात्मनः प्लवः ॥ २८ ॥**

सर्व देवांचा देव मजवर खास संतुष्ट झाला आहे, म्हणूनच आत्मो-

द्धाराची नौकाच असें दृढतर वैराग्य मजला प्राप्त झालें आहे! यापुढें उरलेल्या आयुष्याचा प्रत्येक क्षण मी आत्मचिंतनांतच घालवीन. ह्या कामीं सर्व देवदेवतांचा मला पाठिंबा असावा."

४ ह्याप्रमाणें ठाम विचार करून त्या भिक्षूनें आपल्या हृदयांतील अहंममतादि सर्व बंध सोडले व तो शांत आणि मननशील असा मुनि झाला. सर्वसंगाचा परित्याग करून मुक्त झालेला तो भिक्षु आपली योग्यता लपवून राहिला. तो भिक्षेसाठीं मात्र गांवांत शिरत असे. त्या भिक्षूची योग्यता न ओळखणारे त्याच्या पूर्वींच्या ओळखींचे लोक त्याचा उपहास व छळ करूं लागले. रजोगुणी लोकांना त्यांच्याचपैकीं एकादा जर सत्वगुणसंपन्न होऊन वरच्या पायरीवर चढला, कीं तें खपेनासें होऊन ते त्याचा छळ करितात. 'ऊर्ध्वं गच्छन्ति सत्वस्थाः' ह्या न्यायानें त्याच्या ऊर्ध्वगतीला मदत करण्याचे किंवा प्रोत्साहन देण्याचे ऐवजीं ते त्याचा पाय धरून खालीं ओढण्याचा प्रयत्न करितात! बाकी अशा प्रयत्नांनीं स्वोन्नतीच्या मार्गास लागलेल्या मुमुक्षूचें अहित न होतां उलट हितच होतें. असो, त्या वृद्ध व उपशम पावलेल्या भिक्षूची मूढ व दुष्ट जनांनीं विटंबना चालविली. कोणी त्याचा त्रिदंड हिसकीत, कोणी कमंडलु ओढीत, कोणी आसन नाहींतर रुद्राक्षाची माळ किंवा कंथा ओढीत, अशा प्रकारें ते त्याचा छळ करूं लागले. ते क्षुद्र जीव तो जेवायला बसला म्हणजे त्याच्या पानांत मुतत व खांकरून त्याच्या डोक्यावर थुंकतही! त्यानें मौन धरलें तर त्याला बोलायला लावीत व तो बोलूं लागला म्हणजे त्याच्या बोलण्याचा विपर्यास करून त्याला मार देत. 'यतवाचं वाचयंति ताडयंति न वक्ति चेत्!' कोणी हा चोर आहे म्हणून त्याला शब्दांनीं भिववीत. कोणी त्याची अवहेलना करून निंदा करीत व 'एष धर्मध्वजः शठः' म्हणजे हा पोट भरण्यासाठीं धर्माचें ढोंग करणारा महाठक आहे असें म्हणून त्याच्याविषयीं लोकांचें मत चांगलें होऊं न देण्याविषयीं खटपट करीत! अशा प्रकारें दुर्जनांनीं दिलेलें दुःख शांतचित्तानें तो भिक्षु सोशीत असे. सात्विक धैर्य धरून राहिलेल्या त्या पुरुषाला त्याच्या सुनिश्चळ पदापासून ढळविणाचा त्यांनीं

खूप प्रयत्न केला, पण तो सर्व फुकट गेला.

५ अशा वेळीं आपल्या चित्ताचें सूक्ष्म परीक्षण करून आत्मपर्दी तो अढळ राहिला व त्यानें सुंदर ' गाथा ' गायिली. ह्या गाथेचे १६ श्लोक मूळ भागवतांतून पाहून ते सतत डोळ्यांपुढें ठेवण्याचा व तदनुरूप नित्य वर्तन ठेवण्याचा आपण सर्वजण म्हणजे लेखकवाचक जर प्रयत्न करूं, तर दुर्जनांच्या निंदारूप शस्त्रांपासून आत्मरक्षण करणारें एक उत्तम कवच आपण संपादिलें असें होईल. ह्या प्रपंचांत दुर्जनांच्या छळापासून कोण सुटला आहे ! व कोण सुटूं शकेल ? खोड्यानाड्या कंड्या पिकवाव्या, अपशब्द बोलावेत, द्वेष माजवावा हे त्यांचे ढंग सतत चाललेच आहेत, मात्र आपण भिक्षूचा निर्मळ व उदात्त कित्ता गिरवण्याचा अभ्यास ठेवावा. हें काम फार कठिण आहे. ' दुरुक्तैर्भिन्नमात्मानं यः समाधातुमीश्वरः ' म्हणजे दुष्टांच्या दुरुक्तींनीं क्षुब्ध झालेल्या आपल्या मनाला शमविण्याला समर्थ असा सत्पुरुष विरळ आहे. तथापि आपण अभ्यास ठेवावा, आत्मपरीक्षण करीत असावें म्हणजे साधतां साधतां साधेल. असो. भिक्षुगीतांतले ४।२ बहारीचे श्लोक आज आपण आपल्या मननासाठीं घेऊं.

(१) **नायं जनो मे सुखदुःखहेतुर्न देवतात्मा ग्रहकर्मकालाः ।**
**मनः परं कारणमामनन्ति संसारचक्रं परिवर्तयेद्यत् ॥ ४३ ॥**

**अर्थः**—जन, देवता, आत्मा, ग्रह, कर्म व काल हे माझ्या सुखदुःखांला कारण नाहींत, तर केवळ मन हें त्याला कारण आहे. मनच संसारचक्र फिरवितें. जन हे तर त्रिविध आहेतः—सुजन, दुर्जन व साधारण किंवा शत्रु, मित्र व उदासीन. जन हे माझ्याचसारखे जन्ममरणवान् सुखदुःख भोगणारे आहेत. ते व मी एकच असल्यामुळें समान आहोंत. ते माझ्या सुखदुःखांला कारण नाहींत. देवता कल्पित असल्यामुळें त्याही माझ्या सुखदुःखाला कारण होऊं शकत नाहींत. आत्म्याच्या ठिकाणीं द्वैतभाव नसल्यामुळें तो सुखदुःख देऊं शकत नाहीं. ग्रहांची पीडा कोण नाहीं म्हणतो ? पण " ग्रहांची ग्रहगती देहांतवरी । मनाची ग्रहगती त्याहून थोरी । दुःख भोगवी नानाप्रकारीं । जन्मजन्मांतरीं सोडींना.'

ग्रह प्रतिकूळ झाले तर देहांतापर्यंत छळतील, पण मनोग्रह हा जन्म-जन्मांतरीं लोळवणारा अतएव अत्यंत प्रबळ आहे. काळही सुखदुःखें देणारा नाहीं, कर्मही नाहीं, मनावांचून दुसरें कोणी प्रबळ नाहीं. संसारचक्रावर फिरवणारें व सुखदुःख देणारें एक मन आहे.

**(२) मनो गुणान्वै सृजते बलीयस्ततश्च कर्माणि विलक्षणानि ।**
**शुक्लानि कृष्णान्यथ लोहितानि तेभ्यःसवर्णाः सृतयो भवंति ॥४४॥**

**अर्थः**—मन आपल्या सत्तेनें अनेकानेक वृत्ति उत्पन्न करितें. त्या वृत्तींचे मुख्य भाग तीन. शुक्ल ह्म० पांढरी अर्थात् सात्विक, कृष्ण ह्म० काळी अर्थात् तामस व लोहित ह्म० तांबडी अर्थात् राजस अशीं त्रिविध कर्में त्यापासून उद्भवतात व त्या कर्मांमुळें त्यांच्या सवर्ण ह्म० सारख्यावर्णांच्या अशा उत्तम, अधम व मध्यम अशा देव, तिर्यक् व नर इत्यादि गति त्यांना मिळतात.

मनाची चपलता व प्रौढी काय सांगावी! तें मनोरथांच्या उतरंडी क्षणांत रचतें व उतरतें. मनाचा बलात्कार एवढा प्रचंड आहे कीं, तें निर्गुणाला गुणांच्या फांशांत पाडून त्याला जीवपणाची झोंप आणतें व संसाराच्या भोंवऱ्यांत गिरक्या घ्यायला लावतें ! नाथसाहेब म्हणतातः

**मनाचा बलात्कार कैसा। निर्गुण पाडी गुणांच्या फांसा ।**
**लावूनि जीवपणाचा झांसा । संसारवळसा आवर्ती ॥ ६१७॥**

**(३) दानं स्वधर्मो नियमो यमश्च श्रुतं च कर्माणि च सद्व्रतानि ।**
**सर्वे मनोनिग्रहलक्षणांताः परो हि योगो मनसः समाधिः ॥ ४६ ॥**

**अर्थः**—दान, स्वधर्माचरण, यमनियम उर्फ शमदम, वेदशास्त्राध्ययन,सत्कर्म,व्रताचरण इत्यादि हीं केवळ बहिरंग साधनें आहेत, व यांनीं साध्य काय म्हणून म्हणाल तर मनोनिग्रह. तो होण्यास हीं साह्य करीत असतील तरच यांची किंमत आहे, नाहींतर हीं व्यर्थ आहेत. मनाचा निग्रह होऊन वृत्ति उपशम पावल्या व क्षणक्षणा रंग पालटणाऱ्या अनेक वृत्ति एका ब्रह्माच्या ठिकाणीं लीन झाल्या म्हणजे ह्या साधनांचा उपयोग झाला असें म्हणावें. मनाची समाधि ह्म०मनोनिग्रह हाच परमयोग होय. आत्मा व्यापक सर्वभूताशयस्थित व एक असल्यामुळें व चराचर तोच असल्यामुळें दुजेपणाला कोठेंच वाव नाहीं. आपण

दुसऱ्यावर कां रागावतो ? देहाभिमान घेऊन औटहाताच्या मढ्याला ' मी ' म्हणायला जेव्हां तयार होतों तेव्हांच ना दुसऱ्याच्या भाषणाचा रागलोभ वाटतो ! पण आपण सतत आत्मानुसंधान ठेवण्याचा जर अभ्यास ठेवला तर द्वैतभान नाहींसें होऊन जाईल. आपल्याच दांतांनीं आपलीच जीभ चावली तर त्या वेदनेबद्दल रागवायचें कोणीं कोणावर ! अ व ब जर एकच आहेत तर अ व ब एकमेकांवर म्हणजे आपले आपल्यावर कसे बरें रागावतील ? तात्पर्य. ह्या परात्मनिष्ठेचा आश्रय करून मोठमोठे ऋषि आजपर्यंत तरले, तसा मीही श्रीहरिचरणांच्या कृपेनें भवसागर तरून जाईन. अशी ही भिक्षूची निष्ठा कायम राहिली व तो उद्धरून गेला. ' अवघी भूतें साम्या ' येऊन माझा द्वैतभाव निःशेष मावळूं दे व मला आपल्या स्वरूपीं मिळवून घे अशी श्रीपांडुरंगचरणीं ' मुमुक्षू ' ची नित्य प्रार्थना आहे.

———

३

आपत्ती मोह उडवून जगाचें नश्वरत्व प्रतीतीला आणतात, आपत्तींमुळें व ह्या विश्वाच्या जंजाळापासून क्षणभर तरी दूर सरून आपला आपण विचार करितों, आपत्तीमुळें वैराग्याची शीतळ छाया अनुभवतां येते, आपत्तींमुळें ज्ञानांजन डोळ्यांत पडतें, आपत्तींमुळें अहंकाराचें भूत पळून जातें, आपत्तीमुळें ताठरलेलें मन नम्र होतें, आपत्तीमुळें परमेश्वर आठवतो ! अशा या आपत्ति आपल्या कल्याणार्थच देवानें धाडल्या आहेत असें विवेक आपणांस शिकवतो.

४

' मातृवत्परदारेषु ' हा देवाचा कायदा आहे; पण डोळा कधीं तरी पाप करितो कीं नाहीं ? ' परस्त्रीतें म्हणतां माता । चित्त लाजवीतें चित्ता ' हा अनुभव बहुतांचा आहे. या पापामुळें देवानें आंधळे केले तर देवाच्या न्यायीपणास बाध येईल काय ? पण हा आज नाहीं उद्यां सुधरेल असें मनांत आणून देव आमचे अपराध पोटांत घालीत असतो; यावरून देवाचा दयाळुपणाच स्पष्ट होतो.

# २४. सत्संगाची आवड.



**देव वसे ज्याचे चित्तीं । त्याची घडावी संगती ॥ १ ॥**
**ऐसें आवडतें मना । देवा पुरवावी वासना ॥ २ ॥**

—श्रीतुकाराम.

१ संग हा घातक असून तूं निःसंगपणानें रहा असें सर्व महात्मे सांगत असतात. संग टाक म्हणजे स्त्रीपुत्रादिकांचा बाह्यसंग सोडच असें नव्हे, तर चित्तानें. बाह्य प्रपंचाच्या पसाऱ्यावर ममत्वसंबंध ठेवला आहेस तो सोडून दे. ममत्व म्हणजे माझेपण, माझेपणाची कल्पना. ही प्रथम देहावर दृढ झालेली असते व देहामुळें देहसंबंधीं जीं मनुष्यें, जे पदार्थ, किंवा जीं स्थानें तीं चिंतनामुळें ममत्वबुद्धि उत्पन्न करितात व ही ममत्वबुद्धि घातक आहे असें संतांचें सांगणें आहे.

२ बृहदारण्यक श्रुतीनें स्पष्ट सांगितलें आहे कीं, पत्नी पतीसाठीं पतीवर प्रेम करीत नसून आपल्यासाठीं पतीवर प्रेम करिते व पतीही पत्नीसाठीं पत्नीवर प्रेम करीत नसून आपल्यासाठीं पत्नीवर प्रेम करितो. सर्व संबंध असेच आहेत. धनासाठीं धन, घरासाठीं घर, पुत्रासाठीं पुत्र, प्रिय वाटत नसून आपल्यासाठीं धन, घर व पुत्र आपल्यास प्रिय आहेत. आपणास आपणच प्रिय आहोंत. आपण ह्म० अंतरात्मा. ह्यावर जीवमात्राचें निरतिशय प्रेम आहे, मात्र तें ओळखून पाहिजे. प्रेम करितो आत्म्यावर, पण आपण अनात्म्यालाच आत्मा समजतो ! महात्मे व प्राकृत जीव यांच्या केवळ समजुतींत असा फरक आहे. बाकी देहाच्या बाजूनें पाहूं जावें तर दोघेही सारखेच दिसतात. प्राकृत जीव अहंभाव ह्म० मी—माझेपणाचें ओझें डोक्यावर वागवून सुखदुःख भोगतो व महात्मा कर्तृत्वभोक्तृत्वरहित होत्साता निरहंकार होऊन केवळ आनंदरूप असतो ! सत्पुरुष तुह्मां आम्हांसारखाच बाह्यतः दिसतो, मात्र अंत-

रंगांत निराळा असतो. " येऱ्हवीं आणिकांचिये परी । तोही एक शरीरीं । अशेषाही व्यापारीं वर्ततु दिसे ॥ ४० ॥ तोही नेत्रीं पाहे । श्रवणीं ऐकत आहे । परी तेथिचा सर्वथा नोहे । नवल देखे ॥ ४१ ॥ स्पर्शासि तरी जाणे । परिमळ सेवी घ्राणें । अवसरोचित बोलणें । तयाही आथी ॥ ४२ ॥ आहारातें स्वीकारी । त्यजावें ते परिहरी । निद्रेचिया अवसरीं । निद्रिजे सुखें ॥ ४३ ॥ " महात्म्याचे देहव्यापार सामान्य-जनांसारखेच चालत असतात. तोही डोळ्यांनीं पाहतो, कानांनीं ऐकतो, स्पर्श जाणतो, त्याच्या घ्राणेंद्रियाला सुवासकुवास कळतो, प्रसंगोचित बोलणें त्यालाही समजतें. महात्मा खातो, पितो, निजतो, सर्व कांहीं ( म्हणजे विहित कर्में ) करितो, इतरांसारखे त्याचेही श्वासोच्छ्वासादिक चालतात, पण " पार्था तयाचे ठायीं । हें आववोंचि आथि पाहीं परि तो कर्ता नव्हे कांहीं । प्रतीतिबळें ॥ ( ज्ञानेश्वरी अ० ५ ). तो कर्तृत्व आपल्याकडे घेत नाहीं, अहंममता धरीत नाहीं व जो परमात्मा विश्व चालवितो व चराचरांत भरून उरला आहे त्याच्या चिंतनांत तन्मय होऊन जातो; अहंता व संग सोडून स्वसुखसुखी असतो.

३ अशा संतांच्या संगतींत राहण्याची मनाला आवड उत्पन्न झालेली नारायणा ! आपणच पुरवावी. ज्याच्या चित्तांत देव आहे त्याची संगति घडावी. ' चित्तांत ' हा शब्द मर्माचा आहे. ' हृदयांत' असें महाराजांनीं म्हटलें नाहीं. सर्वांच्या हृदयांत देव आहेच आहे. सर्व जीवांच्या हृदयांत देव आहेच आहे. ' ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति' असें श्रीमंतांचें गीतच आहे. ईश्वर सर्वांच्या हृदयांत आहे, पण सर्वांच्या चित्तांत नाहीं,तो फक्त भक्तांच्याच चित्तांत असतो. चित्ताचा धर्म चिंतन करणें हा होय. आपलें सर्वांचें चित्त संसाराच्या चिंतनांत गुंतलेलें असतें. अभिलाष, क्रोध, लोभ इत्यादि विकारांच्या दर्पानें आमचें चित्त भरलें आहे, तर हीच घाण ज्याच्या चित्तांत आहे असे लोक संगतीनें आमच्या उद्धारास काय साह्य करणार आहेत ? ते योगी असोत, जपी असोत, तपी असोत, बुवा, महाराज किंवा गुरुजी ह्या कोणत्याही पदवीनें लोकादरास पात्र झालेले असोत, ते वेद-

पाठक असोत, शास्त्रज्ञ, पंडित किंवा कवि असोत, वक्ते असोत, त्यांच्या चित्तांत देव नसेल, ते निर्विकार व निर्मलचित्त नसतील, तर त्यांच्या संगतीनें शाश्वत सुखाचा लाभ मला कोठून होणार ! ते आपला रजतम मला देतील, तर माझ्यापाशीं अवगुण काय कमी आहेत ? ज्यांचे संगांत माझे दोष झडतील व नारायणीं प्रीति वाढेल अशांचाच संग देवा ! दे. अशा महात्म्याचा संग तुला देववत नसेल तर सर्व संगांपासून मुक्त करून मला निःसंग तरी कर. संगच नको पण कोणाचा तरी संग देणें असेल तर, हे नारायणा ! तूं ज्यांच्या चित्तांत कायम वस्ती केली आहेस अशा संतांचाच दे. त्यांचा संग झाला म्हणजे ते व तूं अभिन्न असल्यामुळें तुझी प्राप्ति अनायासें होईल. रजोगुणी व तमोगुणी लोकांच्या संगतीचा मला पुरा वीट आला आहे. जिकडे तिकडे तेच भरले आहेत. त्यांचा संग आजवर फार झाला, त्याला मन विटलें, कंटाळलें, त्रासलें, आतां सभाग्य व वैराग्यशील अशा प्रेमळ भक्तांचाच संग दे ह्मणजे मी सहज निःसंग होऊन हरिपद पावेन. “ तया अहं वाचा चित्त आंग । देऊनियां शरण रिघ । महोदधि कां गांग । रिघालें जैसें ॥ १३१९ ॥ मग तयाचेनि प्रसादें । सर्वोपशांतिप्रमदे । कांत होऊनि स्वानंदें । स्वरूपींच रमसी ॥ १३२० ॥” असा श्रीकृष्णप्रभूचा उपदेश माझ्या चित्तावर पूर्ण ठसो व तो दीनदयाळ भक्तवत्सल प्रभु मला आपल्या स्वरूपीं ठाव देवो ! !

---

## ११

असो मागचा विचार सोडा, पुढचे मनोरथ बांधूं नका, आज जें हातानें घडेल तें करीत जा. ‘ गृहीत इव केशेषु मृत्युना धर्ममाचरेत्’

Trust no future, however pleasant
Let the dead past bury its dead,
Act, act in the living present
Heart within, God overhead.

—Longfellow.

# २५. आमचे पुढारी संतच !



( १ ) खऱ्या धर्मबुद्धीच्या प्रेरणेनें लोककार्य करणारे लोकनायक आज भरतखंडाला पाहिजे आहेत. राजसकालांत राजस माणसांनीं चालविलेल्या राजस चळवळी चिरसुख देण्यास असमर्थ आहेत. सत्वगुणांच्या उच्च भूमिकेवर किंवा त्याच्याही पलीकडच्या ‘ गुणानेतानतीत्य त्रीन्’ ह्या वृत्तिशून्यपणाच्या पदावर आरूढ झालेले महात्मे लोककल्याण करण्यास पुढें सरसावतील तेव्हांच समाजाला योग्य वळण लागेल.

( २ ) साधूके साधू मिले हो गई दो दो बात ।
गद्धेकु गद्धा मिले हो गई दो लात ॥१॥

विचारवंत पुरुष एकत्र झाले, तर दोन विचाराच्या गोष्टी चालतात, पण गद्धे एकत्र मिळाले कीं, ‘ गाढवांचा गोंधळ आणि लाथांचा सुकाळ ’ होतो !

३ आज भरतखंडांत ज्या अनेक चळवळी शेंपन्नास वर्षें चालू आहेत त्यांचा इतिहास पाहिला ह्मणजे वरील प्रकाराशिवाय दुसरें काय बरें निष्पन्न झालेलें दिसेल ? एकीचा आक्रोश होतां होतां बेकी व लोकहिताचा डिंडिमा पिटतां पिटतां अन्योन्यकलह याशिवाय या चळवळींतून काय निष्पन्न झालें आहे ! ह्या राजस चळवळींनीं समाज अधिक फाटला आहे, विस्कळित झाला आहे, निष्पराक्रम झाला आहे.

४ आणि भगवंताचें अधिष्ठान सोडून मनुष्य ज्या ज्या चळवळी करील त्यांचा त्यांचा परिणाम असाच अनिष्ट व्हावयाचा ! अविचाराच्या हुलडीनें स्थिर देशकार्य होत नसतें.

५ जो जो तरणोपाय करावा तो तो अपाय होतो असा सर्वांनाच अनुभव आला आहे; पण ह्या अनुभवानें शहाणे होणारे लोक कोठें आहेत ? अहंकर्तृत्वाचा मद उतरला नाहीं तोंवर ‘ मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते ’ ह्या भगवद्वचनावर किंवा ‘ जो जो प्रयत्न रामा-

र्वीण। तो तो दुःखाशीं कारण ' ह्या समर्थोक्तीवर विश्वास बसत नाहीं.

६ हरिप्रेमाचा जिव्हाळा ज्यांच्या ठिकाणीं नाहीं, त्यांच्याबद्दल हरीला तरी प्रेमभर कसा यावा ? प्रेम करावें आणि करवून घ्यावें. प्रेमरज्जूनें हरीला स्ववश केल्यावर त्याला आपली चिंता लागते. आपण हरीचें चिंतन करावें म्हणजे हरी आपली चिंता वाहतो.

७ सर्व संसार हरीचा आहे, येथें माझें काय आहे—' मी ' म्हणून तरी कशाला म्हणूं ! ' मी कां देह, कां गेह कां काय ? ' मी ? मी ही एक वृत्ती आहे, कल्पना आहे. ओल्या मातीला ' मी ' म्हणणें धडधडीत अज्ञान आहे. ' घर दार स्थान माझे वाडे शेत मळे गुरे । पुत्र कन्या बंधु माझे सर्व सोडोनि चालला । ' असा संसार नश्वर आहे.

८ ' मी ' एक मारावा तरी नाहीं तर वाढवावा तरी. देहाला आणि जडसंघातला मी म्हणणें अयोग्य आहे असें पटलें म्हणजे ' मी ' गेलाच; व आत्मा मी असें जाणलें म्हणजे आत्मा सर्वव्यापी असल्यामुळें साडेतीन हातांच्या खोड्यांत अडकलेला तो ' मी ' नाहीं, तर सर्व ब्रह्मांड चराचरव्यापक ' तो मी ' असें निश्चित ज्ञान होतें; जीवपण जाऊन विश्वरूपता प्रतीत होते.

९ ' सर्वच मी ' असा अहंकार घेणें तर घ्यावा. स्त्री माझी नाहीं, पुत्र माझा नाहीं, इष्टमित्र माझें नाहींत, असें व्यतिरेकानें म्हणण्यापेक्षां स्त्री मीच, पुत्र मीच,इष्टमित्र मीच, माझे देशबांधव मीच, सर्व प्राणिजात किंबहुना चराचर विश्व मीच, असें अन्वयानें भावून ब्रह्मांडाएवढा ' मी ' व्यापक करावा व सारा ब्रह्मगोळ 'मी'नें भरून टाकावा. ' मी ' एवढा वाढवावा कीं पसरून नाहींसा करावा.

१० जीव जीवांत घालून आत्मा आत्म्यांत मिसळून सर्वांसीं आत्मभावानेंच वागतां यावें. अशा प्रतीतींत आपण राहिलों म्हणजे जें करूं ती आत्मसेवाच होईल,परोपकार ह्या शद्बाचा अर्थ व्यापकपणानें स्वसेवा असाच होईल, भूतमात्रांचें हित तेंच माझें हित असें वाटूं लागेल.

११ असा आत्मभाव वाढवून निरहंकारानें निष्काम कर्मयोग हरिप्रीत्यर्थ आचरतां येईल. विश्वाएवढा आत्मा व्यापक करणारे महात्मेच

विश्वाचें किंवा विश्वांगभूत अशा मोठ्या राष्ट्राचें खरें कल्याण करूं शकतील.

१२ हरि म्हणजे सर्वभूतांच्या अंतरीं एकत्वानें नांदणारा सर्वांचा प्रिय आत्मा होय. त्याला ब्राह्मणापासून चांडाळापर्यंत सर्वच प्रिय होत. कारण सर्वांच्या ठायीं समत्वानें त्याचीच व्याप्ति आहे. हिंदु, मुसलमान, पार्शी, ज्यू, ख्रिस्ती, आफ्रिकन्स सर्वांच्याच ठायीं हरीची व्याप्ति आहे. त्याला ब्राह्मण, महार सर्व सम आहेत. त्याच्या भूमिकेवरून, त्याच्या दृष्टीनें, सर्वांकडे ज्याला पाहतां येईल तोच संत लोककल्याणकर्ता होईल.

१३ 'जशास तसें' 'ठोशास ठोसा' इत्यादि राजस तत्वें रजोगुणी लोकांनाच साजतात. दुसऱ्याच्या विषमतेनें आपली समता ढांसळूं देतां नये. कर्माचरणाची जी किल्ली भगवंतांनीं गीतेंत अर्जुनाच्या हातीं दिली आहे ती गीतेंतच शोधावी म्हणजे हातीं लागेल. निष्काम कर्मयोगाचें रहस्य गीतेसारख्या दुसऱ्या कोणत्याही ग्रंथांत, कोणत्या देशांत व कोणत्याही भाषेंत प्रगट झालेलें नाहीं.

१४ कसाई हरि, बकरा हरि व सुरीही हरि ह्या भाषेचें मर्म ज्याला उमगेल 'हत्वापि स इमान् लोकान् न हन्ति न निबध्यते !' पण—ह्या भूमिकेवर आरूढ होण्यापूर्वी दीर्घकालची घोर तपश्चर्या हवी आहे.

१५ हरि वळला पाहिजे; तो वळेल पण तो आधीं कळला पाहिजे; तो कळेल पण तो आधीं शोधला पाहिजे; व तो शोधण्यास आपलें सर्वस्व वेंचण्यास कंबर कसलेला हरिप्रिय आस्थेवाईक असा 'मुमुक्षु' पाहिजे !

१६ अखंड हरिप्राप्तीची अंतरीं तळमळ ठेवून घरदार, सर्व इष्टमित्र, स्वदेश, परदेश यांच्या सर्व चिंता हरिपायीं वाहून हरीचेंच एकनिष्ठ भक्त बनण्यास तयार व्हावें. ज्यानें विश्व निर्माण केलें तो धर्माची, समाजाची, राष्ट्राची, कुटुंबाची चिंता वाहण्यास काय समर्थ नाहीं ? सर्व राष्ट्रकार्य हरीच्या चरणीं वाहून निश्चिंत व्हावें. निश्चिंत, निर्भय व निरपेक्ष असेल तोच भक्त, तोच ज्ञानी, तोच मुक्त, व लोककल्ल्याण करण्यास तोच समर्थ होईल. 'अहम्' मेला कीं होते ती हरिसेवाच होते.

१७ लोकहितकर्त्यांनीं आपल्या मनासच प्रश्न विचारावा "हें काम करण्याची मला हरि प्रेरणा करितो आहे काय ? मला ह्याच कामावर

त्यानें पाठविलें आहे काय ? मी देवाचा खास निरोप घेऊन आलों आहें काय ? कां मी आपल्याच अहंकारानें व कल्पनेनें हें काम करण्यास उद्युक्त झालों आहें ? ”

१८ आपल्या अहंकारावर आरूढ झालेले पुरुष समाजाच्या हिताचीं कामें अल्पस्वल्प प्रमाणानें करितील, पण निःसंदेह यश देणारीं थोर कृत्यें करायला देवाचे निरोपच पाहिजेत.

१९ देवाचा—विश्वनाथाचा, विश्वाच्या मालकाचा—निरोप झालेल्या भूतकालीन महात्म्यांचीं चरित्रें व उक्ति बारकाईनें पाहावींत व त्यांच्या चरित्रांत आपला मार्ग आपण शोधावा. संत हे मोक्षमार्गाचे वाटाडे आहेत, हे हरीचें मनोगत जाणून तदनुसार वर्तणारे त्याचे मूर्त मनोरथ आहेत. त्यांच्या उपदेशाचें मनन करून दृढ श्रद्धेनें, प्रेमानें व निष्ठेनें त्यांच्या पावलावर पाऊल देऊन चालण्यास कंबर बांधावी व ‘ हरेर्नामैव नामैव नामैव मम जीवनम् , अशा आनंदांत हरीचीं गुणकर्मं आठवीत चालूं लागावें म्हणजे आपल्या भागास आलेलें कर्म करावें.

२० आजवर गप्पा, गोष्टी, व्याख्यानें, पुराणें, चर्चा, भाषणें, पत्रें, सभासंडळें, पुष्कळ झालीं. त्यांना जरा दूर ठेवून एकांतीं हरीचा छंद घ्या, हरीला शोधा, संतांच्या मागोमाग चालून हरीचा पल्ला गांठा. आयुष्याची गाडी उतरणीला लागून कड्यावरून खालीं केव्हां कोसळून पडेल याचा नेम नाहीं, म्हणून आयुष्यभानु अस्तास जाण्यापूर्वीं हरिस्वरूप पहाण्याच्या उत्कंठेनें हरिनाम उचलत्या पावलीं घेऊं लागा; लोक निंदेला भिऊं नका, लोकछलाला डरूं नका, लौकिकाचा नाद सोडा व हरीचे होऊन हरीचें कार्य करा.

२१ देश, वेद, धर्म, समाज, वाङ्मय सर्व हरीच्या पायीं वहा. ह्या सर्वांचा गोप्ता हरि समर्थ आहे. यांच्यासाठीं अट्टाहास करणें सोडून आधीं हरीसाठीं अट्टहास करा. कायावाचामन नारायणास अर्पण करा. जगन्नाथ, जगच्चालक, जगाचा मालक परमात्मा सर्वांचें संगोपन करण्यास समर्थ आहे, हें पक्कें लक्षांत ठेवा. नारदमुनींच्या ‘ सर्वदा सर्वभावेन निश्चिन्तैर्भगवानेव भजनीयः स कीर्त्यमानः शीघ्रमेवाविर्भवति अनुभावयति भक्तान् ’ या उपदेशानें चालून कृतार्थ व्हा.

# १. खुळ्यांचा पाऊस !

एकदां एका राजापाशीं असलेल्या ज्योतिष्यानें राजास दिवाणासमक्ष सांगितलें कीं, 'उद्यां तिसऱ्या प्रहरीं जो प्रहरभर पाऊस पडणार आहे त्याचें पाणी ज्याचें पोटांत जाईल ते लोक खुळे होतील !' हें ऐकून राजानें गांवांत दवंडी पिटविली कीं, 'उद्यां पडणाऱ्या पावसाचा थेंब सुद्धां कोणी पोटांत घेऊं नये.' पण ह्या दवंडीचा परिणाम अगदीं उलट झाला ! तो हा कीं त्या पावसाचें पाणी प्यायल्याशिवाय राजा, दिवाण व जोशीबोवा याशिवाय एकही मनुष्य राहिला नाहीं. जी गोष्ट करूं नको म्हणून सांगावें ती हट्टानें करण्याचा मनुष्यमात्राचा स्वभावच आहे. त्या खुळ्या पावसाचें पाणी प्यायल्यामुळें त्या नगरींचे सर्व लोक खुळे झाले व नाचतउडत, धांवतपळत पिशांप्रमाणें हिंडूं लागले. आपल्या प्रजाजनांची ही स्थिति पाहून राजा मनांत फार भ्याला. ते खुळे राजवाड्यावर चालून आले तेव्हां प्रधानानें राजास सल्ला दिला कीं, "आपण आपलें शहाणपण मनांत ठेवून बाह्यतः ह्या खुळ्यांसारखें नाचूं उडूं लागावें, नाहींतर हे खुळे शहाणे ठरून आपणांसच खुळे ठरावें लागणार आहे !" ह्याप्रमाणें तो राजा त्या खुळ्यांत मिसळून खुळ्यासारखाच नाचूं उडूं लागला !! तेव्हां त्या खुळ्यांनाही आनंद झाला व हा आपल्यासारखा शहाणा आहे असें वाटून त्यांनीं त्याचें राज्यपद टिकूं दिलें. खुळे लोक खरेच खुळे झाले होते; त्यामुळें नाचतांना त्यांच्या अंगाला लागे, शरीर रक्तबंबाळ होई व त्यांतच ते विव्हळही होत. राजानें खुळेपणाचें केवळ सोंग पांघरल्यानें तो बेतानें तोल संभाळून आपलेपण न विसरतां नाचे उडे व ह्यामुळें त्याला सुखदुःखाचे घाय न लागतां त्या खुळ्यांप्रमाणें वागतां आलें. खऱ्या खुळ्यांना आपल्या खुळेपणाचें भानही नसे व खोट्या खुळ्याचें आत्मभान कधीं सुटलें नाहीं !

**तात्पर्य**:—विषयासक्त जीव विषयांशीं तन्मय होऊन आत्मभान विसरतात व म्हणून सुखदुःखांचे घाव त्यांना बसतात; व विषयेंद्रियप्राणांहून आपलें वेगळेपण ओळखून राहणारे जाणते संत विषयी लोकांप्रमाणें बाह्यतः वागत असले, तरी आंतून आपल्या वेगळेपणाची

प्रतीति कधींही सोडीत नाहींत व म्हणून सुखदु:खांचीं द्वंद्वें ते सोसतात. “ नटलेनि लाघवें । नटु जैसा न झकवे । तैसे गुणजात देखावे । न होनियां ” ह्या ज्ञानेश्वरमहाराजांच्या उक्तीप्रमाणें गुणांशीं तन्मय न होतां आपलें निस्त्रैगुण्य संत ओळखून प्रपंचाच्या रंगभूमीवर आपलीं कामें उत्तम करूनही ते संसाराटवींतून पार निसटून जातात.

## २. महार व मिशनरी.

एकदां एक मिशनरी एका महारास ‘ ब्राह्मणांनीं तुम्हांस असें बुडविलें व तसा छळ केला ’ इत्यादि गोष्टी सांगून येशूच्या कळपांत ओढण्याचा प्रयत्न करीत होता. तो महार वारकरी असून पंढरीच्या भजनसुखास लांचावलेला विठ्ठलभक्त होता. पंढरीस चोख्यामेळ्याच्या समाधीपुढें सर्व जातीचे लोक कसें नमतात, मोठमोठे स्वामी व ब्राह्मणही त्यापुढें भक्तिप्रेमानें कसे लवतात व महायात्रेच्या सुप्रसंगांत सर्व विठ्ठलमय झाले असतांना उच्चनीचादि भेद कसे नामशेष होतात हें त्यानें पाहिलें होतें. नाथांचें भागवत तो रोज वाचीत असे व त्याचें समाधान झालेलें होतें. त्या मिशनऱ्याचें व्याख्यान संपल्यावर तो महार त्यास म्हणाला, ‘ रेवरंडसाहेब, मी आपणांस विचारतों कीं, आपण आपली मुलगी एखाद्यास देऊन तिचें लग्न झालें व ती तेथें सुखासमाधानानें नांदूं लागली आणि नंतर आपणांस दुसरा एक श्रीमान् व सुखवस्तु गृहस्थ आढळला तर आपण तिला पहिल्या गरीब नवऱ्याच्या घरून काढून या दुसऱ्याच्या घरीं घुसवाल काय ? ’ यावर रेवरंड साहेबांनीं उत्तर केलें; ‘ कधींही नाहीं ! ’ नंतर त्या महारानें उत्तर केलें, “ तर मग देवानें आह्मांला महाराच्या कुळांत जन्मास घातलें तर त्या कुळाचा राग करून दुसऱ्याच्या कुळांत घुसण्याचा आह्मीं प्रयत्न करूं तर देवाच्या दृष्टीनें आह्मी दोषी होणार नाहीं काय ? जें देवाला आवडलें तें आह्मांला आवडलेंच पाहिजे. ज्यानें त्यानें आपल्या जातिधर्माप्रमाणें वागावें ह्मणजे देव सर्वांवर सारखी दया करितो असें आमचा हिंदुधर्म आह्मांस सांगतो. ’ येथें आपली डाळ शिजत नाहीं हें पाहून रेवरंडबोवा मुकाट्यानें चालते झाले.

भक्ति नाहीं असें कित्येकांस वाटतें, पण तें खरें नाहीं. अद्वैतांत भक्ति आहे इतकेंच काय पण अद्वैतांतच खरी भक्ति आहे ! 'अद्वैतीं भक्ति आहे। हें अनुभवाचि जोगें। नोहे बोला ऐसें।' असें ज्ञानेश्वरमहाराजांनीं ज्ञानेश्वरींत म्हटलें आहे. अमृतानुभवांतः—

**देव देऊळ परिवारु, कीजे कोरूनि डोंगरू।**
**ऐसा भक्ताचा वेव्हारु, कां न व्हावा ? ॥** प्र० ९-४१॥

असें त्यांनीं विचारलें आहे. देव, देऊळ, व डोंगर हे एकाच डोंगरांत कोरून करतात तसा ज्ञानी भक्ताच्याठिकाणीं देव, भक्त व भजन असा एकरसात्मक व्यवहार कां होणार नाहीं ? अलबत होईलच.

**अभेदूनि भेद राखियेला अंगीं। वाढावया जगीं प्रेमसुख ॥ १ ॥**

अद्वैताचा भक्तीशीं विरोध नाहीं इतकेंच काय पण त्यांचा अगदीं एकजीव आहे. तात्पर्य, अद्वयानंद आणि भक्तिप्रेम हे वेगळेपणानें काढतांच येत नाहींत. प्रेम हेंच ज्ञान—देव, जग व आपण तिन्ही एकरूपच आहोंत. सागर, फेंस व लहरी मिळून पाणीच, तसें सर्वच श्रीहरी. 'तयावीण कोठें रिता ठाव नाहीं.' त्या सर्वात्मक श्रीहरीला अनन्यभावानें म्हणजे त्याहून वेगळें न राहतां शरण जावें व त्याच्या प्रेममय सागरांत प्रेमलहरी होऊन नाचावें. हरिप्रेमावांचून कांहीं नकोसें वाटावें. श्रीहरिप्रेमानें केलेलीं सर्व कर्मे श्रीहरीला अर्पण होऊन भक्ताला बाधक होत नाहींत, व चित्तांत प्रेममय श्रीहरि प्रगट झाला कीं, सर्व इंद्रियांतून प्रेमच वोसंडून राहतें. श्रीएकनाथमहाराज भागवतांत म्हणतातः—

**प्रेमेवीण श्रुतिस्मृतिज्ञान। प्रेमेवीण ध्यानपूजन।**
**प्रेमेवीण श्रवणकीर्तन। वृथा जाण नृपनाथा ॥** अ० २-३३२ ॥
**हेतुक अथवा अहेतुक। वैदिक लौकिक स्वाभाविक।**
**भगवंतीं अर्पे सकळिक। या नांव देख भागवतधर्म ॥ ३४६ ॥**
**उदकीं तरंग अति चपळ। जिकडे जाय तिकडे जळ।**
**तैसें भक्ताचें कर्म सकळ। अर्पे तत्काळ भगवंतीं ॥ ३४७ ॥**
**दीपु लाविजे गृहाभीतरीं। तोचि प्रकाशे गवाक्षद्वारीं।**
**तेवीं मनीं प्रगटला श्रीहरी। तोचि इंद्रियांतरीं भजनानंदु ॥ ३६१ ॥**

प्रेमावांचून भाषण, प्रेमावांचून कीर्तन, प्रेमावांचून वाचन व प्रेमावां-

चून मनन सर्व छूट आहे. तें सर्व ढोंग आहे, प्रेमाहून हरी वेगळा नाहीं. चंद्र आणि चंद्रिका, जळ आणि शीतळता, सूर्य आणि प्रभा जशी एक, तसा हरि आणि प्रेम एकरूप आहेत. प्रेम शिकवीत नसेल तर तो वेदांत खोटा, प्रेमाचे कल्लोळ हृत्तरंगावर उत्पन्न होत नसतील तर तें ज्ञान खोटें. ज्ञान वेदांत भलतीच उदासिनिता व माणुसघाणेपणा उत्पन्न करीत नाहीं. पशुपक्षी, घरचे व दारचे, स्वकीय परकीय सर्व हरिमय भावून प्रेमाच्या भावनेनें पंचकोश भरून केले जावेत. असो. दादु पिंजारी हे महाभागवत म्हणतात:—....

### दोहरा

**बाते बिरह न ऊपजे बाते प्रीत न होय।**
**बाते प्रेम न पाइये भूल गये सब कोय ! ॥ १ ॥**

नुसत्या बाता झोडल्यानें व शब्दांची चर्पटपंजरी सुरू केल्यानें प्रेम उत्पन्न होत नाहीं पण जग कसें भुललें आहे पहा ! प्रेमसुख घ्यायचें सोडून शब्दाच्या चोयट्या चोखण्यांत तें गर्क होऊन गेलें आहे.

**दादु अच्छर प्रेमका कोइ पढेगा एक ।**
**दादू पुस्तक प्रेमबिन केते पढे अनेक ॥ २ ॥**
**दादू पोथी प्रेमकी बिरला बाचे कोय ।**
**वेद पुरान पुस्तक पढे प्रेम बिना क्या होय ! ॥ ३ ॥**

हजारो लोक प्रेमावांचून पुस्तकें वाचतात, पण प्रेमानें एक अक्षर वाचणारा मनुष्य धन्य होय ! वेदशास्त्रपुराणें पढून प्रेमसागर उचंबळत नसेल तर तें पढणें काय उपयोगाचें आहे ? प्रेम आणि तें हरीचें प्रेम चित्तांत उद्भवणें व त्या प्रेमानें सारें विश्व अखंड पाहणें हें भाग्य हरी-पाशीं मागावें. याहून दुसरें भाग्य कोणतें ?

———

# २६ प्रेमामृत माधुरी.



**प्रेम अमृताची धार। वाहे देवा ही समोर॥**

—श्रीतुकाराम.

१ प्रेम हीं एक दिव्य वस्तु आहे. ती एक दैवी ज्योत आहे. प्रेमावांचून सारेंच जीवित रुक्ष व दुःखदायक आहे. श्रीहरीचें प्रेम हें प्रेमांत मुख्य आहे. तेंच प्रेम भूतमात्रांच्या ठिकाणीं पहावें. स्त्री, मित्र, पुत्र इत्यादिकांवर, शेजाऱ्यांवर, दीनअनाथांवर, राजापासून रंकापर्यंत व ब्राह्मणापासून अंत्यजापर्यंत सर्वांवर सर्वकाळ सारखें प्रेम हीं नारायणाचीं स्वरूपें म्हणून ठेवावें. आपलें अंतःकरण प्रेममय करावें. प्रेम हें देह देहबुध्दीचें नसावें, आत्मबुद्धीचें प्रेम ठेवावें म्हणजे संयोगवियोगांच्या लाटांचा मारा असह्य होणार नाहीं. सृष्टीमध्यें सर्व प्रेम भरलेलें आहे, सर्व आनंद भरलेला आहे, तें प्रेम व तो आनंद सर्व श्रीहरीचा आहे; किंबहुना प्रेम व आनंद हें हरीचेंच स्वरूप आहे. श्रीहरि प्रेममय आहे, सुखमय आहे, आनंदमय आहे, असें नित्य भावावें. प्रेमावांचून ज्ञान फुकट आहे. नाथमहाराजांनीं एके ठिकाणीं म्हटल्याप्रमाणें प्रेमावांचून ज्ञान ह्मणजे तो केवळ रांडेचा शृंगार आहे! चित्तांत, वाणींत, डोळ्यांत अखंड प्रेम असावें. तें अखंड प्रेम ज्या द्वैतकल्पनेनें वेळोवेळीं भंग पावण्याचा संभव असतो ती द्वैतकल्पना काढून टाकून अद्वयानंदाचा नित्य अनुभव घेत जावें. आंत हरि, बाहेर हरि, सर्वच हरिमय आहे. आपण त्या भूमिकेवरच रहावें, ( खालीं मुळीं येऊंच नये ) "दुजे खंडे तरी। उरला तो अवघा हरी। आपणाबाहेरी। नलगे ठाव धुंडावा" हें तुकाराममहाराजांचें ह्मणणें अभ्यासांत आणावें. दुजेपणा हें सर्व दुःखाचें बीज आहे. दुजेपणाची कल्पनाच न येईल अशा अद्वयानंदांत नित्य रमावें. दुजेपणांत सारा संसार आहे, म्हणून आपण विवेकानें तो मोडून एकपणांत रंगून जायचा सतत

अभ्यास ठेवावा. अभ्यास ठेवतां ठेवतां तें आपलें सहजस्वरूप बनून जातें. प्रेम हें रामाचें म्हणजे विश्वाला रमविणाऱ्या श्रीहरीचें स्वरूप आहे. 'रमन्ते योगिनो यस्मिन् रमणाद्राम इत्यपि' म्हणजे ज्याच्या ठिकाणीं योगी रमतात तो किंवा जो सर्वांच्या सुखाचें निधान आहे म्ह० सर्वांना रमवितो तोच राम होय. राम तर सर्वांच्या हृदयांत भरून राहिला आहे. त्याला दडपण्याचा अहंकार-रावणाचा प्रयत्न सतत चालू असतो. या झगड्यांत आपण रामपक्षीय व्हावें. त्या अहंकारराक्षसाच्या वाऱ्यालाही उभें ठाकूं नये. "अहंकाराचा वारा न लागो राजसा। माझ्या विष्णुदासा भाविकासी" त्याचा वारा सुद्धां घेऊं नये. त्या बाजूलाच जाऊं नये. 'मी' डोकें वर काढूं लागला कीं हरीचें नामस्मरण चालवावें! रामनामाला भूत भितें असें पोराबाळांस आजीबाई सांगत असतात! रामनामाला, रामाच्या स्मरणाला, रामाच्या संचाराला एकच काय पण पंचमहाभूतें भितात!! राम हें महद्भूत आहे. तें अन्य भूतांना दवडून आपणच अंगांत संचरतें, तें सुखमय आहे म्हणून त्याला तेवढें अंगांत संचरूं द्यावें कीं बाकीचीं सारीं भूतें दूर पळून जातात. राम आणि भूत एकत्र कधींच असायचीं नाहींत. राम हा भूतांचा शास्ता आहे. त्या पंचाक्षऱ्यापुढें पंचमहाभूतांचें कांहीं चालत नाहीं, आपण त्याच्या पोटांत शिरावें.'लपावें अती आदरें रामरूपीं' राममय व्हावें, रामरूप सृष्टि पहावी, रामच डोळ्यांत दिसावा. रामच अंतरांत प्रकाशावा, स्त्रीपुत्रादि सर्व रामरूपच वाटावें. राम होऊन रामांत रहावें. मासा जळांत राहतो, त्याचें अन्न जळ, पाणी जळ, घर जळ, सर्वच जळ. खालीं, वर, आंत, बाहेर मागें पुढें, माशाला जसें जळ तसें आपण सर्वत्र रामच राम करून टाकावें. 'नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते नमोऽस्तुते सर्वत एव सर्व' सर्वच राम आहे. मासा सर्वथा जळमय असतो, तसें अद्वय श्रीहरीच्या स्वरूपांत सर्वकाळ राहून आपला सेवकपणा तेवढा मौजेनें राखून ठेवावा.मासा पाण्यांत राहून पाण्याहून निराळा भासतो तसें श्रीहरीच्या सर्वगत सर्वरूपांत मिसळून जाऊन पुनः भजनानंद भोगण्यापुरती वेगळिक वाटेल तोंवर ठेवावी. अद्वैतांत-

घोरांत सर्व व्यवहार जो करीत आहे, " हा जनक हे माता । हा मी गौर हीन पुरता । पुत्र वित्त कांता । माझें हें ना ! " अशा भव स्वप्नानें जो स्वरूपाच्या जागृतीला मुकला आहे तो जीव ' पतित ' ह्या नांवाला पात्र आहे. साडेतीन हातांचा देह तोच ' मी ' व ह्या देहाचे संबंधी ते माझे असा भ्रम ज्याला अहोरात्र अंतरीं नाचवींत असून जो आपल्या चैतन्यरूपाला विसरला आहे तो पतित. स्त्री ' धन ' व मान हे ज्याच्या मानगुटीला बसलेले असून ज्याला हवे तसे वांकवितात; विकारांचीं भूतें ज्याच्या हृदंगणांत पाहिजे तसा नाच करितात; जो जन्ममृत्यूसवें आलागेला असें समजून हर्षशोकान्वित होतो असा देहोद्भव विकारांचा जो गुलाम तो पतित होय. हे सर्व डिप्रेस्ड क्लासेसमध्येंच येत नाहींत काय ? आतां ह्या सर्व ' पतितांचा ' उद्धार करणारे कोण व त्यांचें ' मिशन ' कोणतें ? पंढरीच्या वाळवंटांतला संतमेळा व तेथें होणारा नामघोषाचा गजर पाहून आम्हांला वाटलें कीं, खरा पतितोद्धार करणारे आमचे ' निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई, एकनाथ, नामदेव, तुकाराम, ' इत्यादि संत हेच होत. पतितोद्धाराचा मार्ग म्हणजे गीताभागवतांतील रहस्यांचा सर्व जीवांच्या कळवळ्यानें डांगोरा पिटणारा परमोदार भागवतधर्म होय.

४ पतितांचा उद्धार करणारे कोण ? व पतितोद्धाराचें मिशन कोणाचें ? जे स्वतः उद्धरले असतील तेच पतितांचा उद्धार करूं शकतील ! आपण तरून दुसऱ्यास तारणारे उद्धारक म्हणजे संतच होत. ज्ञानेश्वर, नामदेव, जनाबाई, गोरा कुंभार, सांवता माळी, रोहिदास चांभार, सेना न्हावी, कान्हुपात्रा, कबीर, नानक, चैतन्य, नरसी मेहता, मिराबाई, तुळशीदास, सुरदास, एकनाथ, तुकाराम, निळोबाराय, कृष्णचैतन्य, रामदास, रामकृष्ण परमहंस हेच पतितोद्धारक होत त्यांचा डिंडिमः—

**यारे यारे धरूं हरिनामतारूं । सुखाचा सागरू भय नाहीं ॥ १ ॥**
**साधुसंत गेले आनंदीं राहिले । हरिनामीं झाले कृतकृत्य ॥ २ ॥**
**एकाजनार्दनीं मांडिलें दुकान । देतो मोलेंवीण सर्व वस्तु ॥ ३ ॥**

५ उद्धारक संत सर्वकाळीं, सर्व देशांत व सर्व जातींत उत्पन्न झाले आहेत व होणार आहेत. देहाभिमानाच्या पोटांत राहणारे सर्व अभिमान त्यांचे गलित झालेले असतात. कडू भोपळा टाकून दिला कीं त्याबरोबर त्याच्या पोटांतल्या सर्व कडु बिया टाकल्या जातात, त्याप्रमाणें एक देहबुद्धि सुटली कीं इतर सर्व प्रकारचे मिथ्या अभिमान गळून पडतात. म्हणून संत प्रथम देहाभिमानावर प्रहार करितात. तळचा रांजण फुटला कीं त्यावरील सर्व रांजण धडाधड खालीं येतात, त्याप्रमाणें एक देहभाव सुटला कीं, त्याबरोबर सर्व मायिकभाव नष्ट होतात. ‘ देहाचा विसर पाडीं मज ’ असें भक्त देवाला आळवितात तें यासाठींच. एक देहभाव गळाला कीं, ‘ उरला तो अवघा हरी ! ’ म्हणून संतांच्या मिशनचें मुख्य काम देहात्मबुद्धीचें खंडन करून आत्मभावाचा विकास करणें हें असतें. त्यांच्या एकात्मभावनेंत हा उच्च, हा नीच हा भेद नसतो.

**मग हा मशकु हा गज । कीं श्वपच हा द्विज ।**
**पैल इतर हा आत्मज । हें उरलें के । ? ॥ ९३ ॥**
**ना तरी धेनु हें श्वान । एक गुरु एक हीन ।**
**हें असो कैंचें स्वप्न । जागतया ? ॥ ९४ ॥** ज्ञाने० ४.

देहभावाचा जेथें अभाव होतो तेथें हे ब्राह्मण व हे अंत्यज हा भेद कोठून राहणार ? व एकास दूर करावें, दुसऱ्यास कवटाळावें ही भावना तरी कोठें सांपडणार ? म्हणून संतांच्या मिशनमध्यें जातिभेदाचें प्रस्थ नसतें.

६ जुने कर्मठ अभिमानी ब्राह्मण हे जर ब्राह्मणेतरांला तुच्छ लेखीत असतील तर ते,व नवे लोक ब्राह्मणेतरांच्या कैवारानें ब्राह्मणांना निंदीत व छळीत असतील तर ते–हे दोघेही संतांच्या दृष्टीनें हीनच ठरणार. ब्राह्मण म्हणून ब्राह्मणांला पूज्य मानणारे किंवा अंत्यज म्हणून अंत्यजांना कवटाळणारे असे कोणत्याही प्रकारचे अहंकारी पुरुष असले तरी त संतांच्या मार्गाला सोडून वागणारे आहेत असेंच म्हटलें पाहिजे. पतित, मग तो ब्राह्मण असो वा अंत्यज असो, संतांच्या दयेचा विषय असतो. उद्धारकर्माच्या वेळीं हा ब्राह्मण हा शूद्र व हा अंत्यज हा

# २७ ‘ डिप्रेस्ड क्लासेस मिशन ’
## उर्फ
# पंढरीचा भागवतसांप्रदाय.



### लेखांक १.

**कथा हें भूषण जनांमध्यें सार । तरले अपार बहुत येणें ॥ १ ॥**
**नीचिये कुळींचा उंचा वंद्य होय । हरीचे जो गाय गुणानुवाद ॥२॥**

—श्रीतुकाराम.

१ सांप्रत ‘ डिप्रेस्ड क्लासेस मिशन ’ च्या कामाचा चोहोंकडे डांगोरा पिटूं लागलेला असून अनाथोद्धार, पतितोद्धार, निराश्रित समाजाच्या उन्नतीचे प्रयत्न, अंत्यजोद्धार इत्यादि नांवानें तो मोडला जात आहे. या शब्दांचा खरा अर्थ काय व खरा उद्धार कोणता याचा थोडासा उहापोह करण्याचें आम्हीं योजिलें आहे. गेल्या कार्तिकीच्या यात्रेंत पंढरपूरच्या वाळवंटांतला नामघोष कानांवर पडत असतांना हा विषय आमच्या मनांत आला, व त्या वेळीं पतितोद्धाराचें खरें कार्य आमच्या संतमंडळानें किती उत्तम केलें आहे हें लक्षांत घेऊन त्या धोरणावर आजचे जाणते लोक वागतील तर किती मौज होणार आहे असें वाटलें.

२ ‘ डिप्रेस्ड क्लासेस ’ म्हणजे वरच्या वर्गानें आपमतलबीपणानें ‘ जाणूनबुजून निकृष्ट स्थितींत ठेवलेला खालचा वर्ग असा त्या इंग्रजी शब्दांचा अर्थ करून ब्राह्मणादि उच्च वर्णांस शिव्या देणें म्हणजेच त्या ‘डिप्रेस्ड’ वर्गाचा उद्धार करणें असा ‘मिशन’ शब्दाचा अर्थ करणारे जर कोणी असतील तर त्यांच्या नादीं लागण्याची आमची इच्छाच नाहीं. शिव्या, द्वेष, तिरस्कार इत्यादि निकृष्ट भावना पतितोद्धारासारख्या उच्चतम पवित्र कार्यांत केव्हांही कोणीही आणूं नयेत,व त्या पोटांत ठेवून उद्धाराचें काम करूं पाहणें म्हणजे विष पिऊन अमर होण्याची इच्छा

करण्यासारखें विपरीत होणार आहे. उद्धार हा सर्वांस पाहिजेच आहे. उद्धार कशाला म्हणायचें व तो कोणत्या साधनांनीं घडून आणायचा एवढाच विचार पाहूं. साधुसंतांनीं पूर्ण कळवळ्यानें उद्धाराचा जो मार्ग काढला तोच खरोखर उदात्त स्वरूपाचा असून यशस्वी होणारा आहे. तो कोणता तें आपण पाहूं या.

३. आमच्या 'डिप्रेस्ड क्लासेस'मध्यें सर्वच जीव येतात.क्लासेस् व मासेस् म्हणजे उच्च व नीच सर्व स्थितींतले बहुतेक सर्व जीव 'डिप्रेस्ड' म्हणजे पतितच आहेत. आपल्या शुद्ध स्वरूपाचा विसर पडून जीवभावाला येणें हेंच पतितपणाचें मुख्य लक्षण आहे ! जीवपणा पांघरणारे अज्ञ जीव तत्वतः सारेच पतित आहेत.आपलें मूळचें शुद्ध स्वरूप विसरून कामक्रोधादि विकारांच्या स्वाधीन झालेले झाडून सर्व जीव पतित होत.ह्या पतितपणांत पायऱ्या लावायला जागाच नाहीं. ब्राह्मण,क्षत्रिय,वैश्य,शूद्र,अतिशूद्र,म्लेंच्छ इत्यादि व्यवस्था देहाची व व्यवहारांतली आहे. मी देह असें घेऊन जो उठतो तो जीव पतित या संज्ञेस पात्र आहे—मग तो राजा असो वा रंक असो, पंडित असो वा मूर्ख असो, नागर असो वा गांवढळ असो, ब्राह्मण असो वा महार असो ! काम, क्रोध, लोभ, द्वेष, असूया, मद, मत्सर इत्यादि विकारांमध्यें बुजबुजणारा जीव--पतित खरा मग तो कौंसिलमध्यें बसून राष्ट्राच्या उलाढालीवर व्याख्यानें देणारा मोठा नामदार असो किंवा रात्रंदिवस चतकोर भाकरीसाठीं खपणारा एखादा हमाल असो. काळाच्या तोंडीं सर्वच देह पडणारे आहेत. मृत्यूनें सर्वच नामरूपावर आपलें भक्ष्य म्हणून अक्षता टाकलेल्या आहेत. रचेल तें खचेल, होईल तें जाईल, जन्मेल तें मरेल, असा सृष्टीचा अप्रतिहत प्रवाह चाललेला असून सर्व नामरूपात्मक विश्व नाशवंत आहे. ह्या गोष्टींची ज्याला विस्मृति झाली आहे व घर, गांव, देश, स्त्री, पुत्र, धन, देह या सर्वांना जो मीपणाच्या बुद्धीनें कवटाळीत आहे तो जीव पतितच आहे. स्वरूपापासून पडलेला, पतन पावलेला, च्युत झालेला, वेगळेपणानें राहणारा तो पतित. आपण शुद्ध बुद्ध सच्चिदानंद आत्मरूप आहोंत याची ज्याची आठवण बुजाली आहे, ' मी माझें ह्या

येईल ? ज्या संगतींत मिथ्या देहाच्या अभिमानाचा उठाव होतो ती सत्संगती नव्हे; ज्या सभा, परिषदा, संमेलनें, क्लबस्, सोसायटीज्, वर्तमानपत्रें, मासिकें, वक्ते, व शाळा खोट्या अभिमानाचा उठाव करून जातिद्वेषादि पिकवीत असतील तीं सर्व साधनें समाजाचा व राष्ट्राचा उद्धार करणारीं आहेत असें ह्मणणें तरी सयुक्तिक कसें होईल ? म्हणून संत हे त्या मार्गाला जात नाहींत व तो मार्गच बंद करून टाकतात. एकनाथमहाराज म्हणतातः—

**देहींचीं कर्मे अदृष्टें होतीं । मी कर्ता म्हणतां तीं बाधती ।**
**भक्तां सर्वकर्मीं अनहंकृती । परमात्मप्रतीतीभजनयोगें ॥ ७०८ ॥**
**ज्यासी नाहीं देहाभिमान । तो हातीं न धरी देहाचा वर्ण ।**
**तैसाचि आश्रमाचा अभिमान । भक्त सज्ञान न धरी कदा ॥७११॥**
**जाती उंच नीच असंख्य । परी तो न ह्मणे हे माझीचि एक ।**
**जेवी गंगातीरीं गांव अनेक । परी गंगा माझा एक गांव न म्हणे॥७१४॥**
**तो जेव्हां पावे जन्मप्राप्ती । तेव्हां त्यासवें नाहीं वर्णाश्रमजाती ।**
**जन्मअभिमानें माथां घेती । कुळगोतजाती पै माझी ॥७१७॥**
**समूळ देहाभिमान झडे । तो देहींच देवासी आवडे ।**
**ते भक्त जाण वाडेंकोडें । लढवाळे हरीचे ॥ ७२१ ॥ अ०२ ॥**

हरिला प्रेम पाहिजे, शुद्ध भक्ती पाहिजे, तो बाह्य उपांगाला भुलणारा नसून अंतरंगाला भुलणारा आहे. तें अंतरंग निर्मळ करून हरिप्रेमाला पात्र होण्याचा अधिकार सर्व जीवांस सारखाच आहे. हरि बाह्यरंगाकडे बिलकूल पाहत नाहीं. प्रल्हादानें दैत्यपुत्रांस उपदेश करितांना ( स्कंद ७ ) म्हटलें आहे:—

**नालं द्विजत्वं देवत्वं ऋषित्वं वाऽसुरात्मजाः ।**
**प्रीणनाय मुकुंदस्य न वृत्तं न बहुज्ञता ॥ ५१ ॥**
**न दानं न तपो नेज्या न शौचं न व्रतानि च ।**
**प्रीयतेऽमलया भक्त्या हरिरन्यद्विडंबनम् ॥ ५२ ॥**

परमात्म्याच्या संतोषाला द्विजत्व, देवत्व, ऋषित्व, बहुश्रुतपणा, सच्छील, वगैरे कांहीं पुरे पडत नाहींत, हे असले म्हणजे तो प्रसन्न होतोच असें नाहीं. दानानें नाहीं, तपानें नाहीं, यज्ञानें नाहीं, पवि-

त्रपणानें नाहीं, व्रतानें नाहीं, तर निर्मलभक्तीच्या योगानेंच हरि प्रसन्न होतो. अमलभक्ति हेंच हरिप्रेमाचें जर मुख्य साधन आहे, व हरिप्राप्ति हेंच नरदेहाचें जर मुख्य सार्थक आहे तर भक्तिमार्गच सर्व जीवांच्या उद्धाराचा मुख्य मार्ग आहे हें उघड सिद्ध झालें.

१० ज्ञानेश्वरमहाराजांनींही ज्ञानेश्वरींत स्पष्ट ह्मटलें आहे कीं, कुळाचा चोखटपणा, आभिजात्य म्ह० कुलीनपणा, व्युत्पत्तीचा सोस, रूपवयसंपत्ती इत्यादि असले तरी ' एक भाव नाहीं माझा । तरी पाल्हाळ तें ! ' कणावांचून कणसें वस्तीवांचून नगरें, पाण्यावांचून सरोवरें, पुष्पफळावांचून झाडें:—

**' तैसें सकळ तें वैभव । अथवा जातिकुळगौरव ॥**
**जैसें शरीर आहे सावेळ । परि जीवचि नाहीं ॥**
**तसे माझिये भक्तीविण । जळो तें जियालेपण ॥**
**अगा पृथ्वीवरी पाषाण । नसती काई ? '** ( ज्ञाने० अ० ९–४३५।३६ )

११. हिंवराच्या सावलीला सज्जन जसे उभे राहत नाहींत तशीं पुण्यें अभक्ताच्या वाऱ्यासही उभीं राहत नाहींत. निंबवृक्ष निंबोळ्यांनीं मोडून आला तरी तो कावळ्यांच्याच उपयोगाला जातो, त्याप्रमाणें भक्तिहीन मनुष्य दोषदुर्गुणांच्याचसाठीं वाढत असतो. षड्रस खापरांत वाढून ठेवले तर ते कुत्र्यांच्याच उपयोगाचे, त्याप्रमाणें भक्तिहीनाचें जिणें संसारदुःखांच्याच उपयोगीं पडायचें इ० दृष्टांत देऊन ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात कीं " कुळ उत्तम नोहावें । जाती अंत्यजही व्हावें । वरी देहाचेनि नांवें । पशूचेंहि लाभो " ह्म० मनुष्ययोनींतला कोणताही देह मिळाला फार काय पण पशूचा देह मिळाला तरी चालेल पण हरीचे भक्त व्हावें ! जगांतल्या लाखों उठाठेवी करण्यापेक्षां आपल्या देहचालकाला ओळखून त्याचें सख्य जोडणें हें साधलें तरच जन्माचें सार्थक होय. पिंडब्रह्मांडांच्या चालकाला ओळखणें याहून नरदेहाचें सार्थक दुसरें कोणतें आहे ? त्याला कोणतीही जात आड येत नाहीं. मद्यमांसाहार करून नाटकतमाशांत व विषयांच्या चिखलांत अखंड लोळणारे प्राणी मग ते देहानें ब्राह्मण असोत वा अंत्यज असोत,

विचार संतांच्या मनाला शिवत सुद्धां नाहीं.मुळीं देहहाच विटाळाचा गोळा आहे. ब्राह्मणाचा देह हा पवित्र व अंत्यजाचा देह अपवित्र असें न मानतां देह हीच अमंगळ चीज असून सर्व देहांतला चैतन्यनाथ जो आत्मराज तो मात्र पवित्र आहे असें संत सर्वांस सांगत आले आहेत. ब्रह्मदेवापासून मुंगीच्या देहापर्यंत ओतप्रोत भरलेली जी संवित् म्ह० ज्ञानकला तोच भगवदंश आहे व तो माझ्या व सर्वांच्या देहांत सारखाच भरून राहिला आहे हें ओळखा असें सर्वांना निक्षून सांगणें हेंच संतांचें मिशन आहे. देव, विश्व, व मी हे तीन भिन्न नसून एकच आहेत. अर्थात् , आंत हरि बाहेर हरी । हरिनें घरीं कोंडिलें ' हाच सिद्धांत आहे. पंढरी, आळंदी, देहू, पैठण इत्यादि भागवतधर्माच्या युनिव्हर्सिट्यांतून हेंच शिक्षण हजारों जनांना मिळत आहे. संत हें शिक्षण बहुजनसमाजाला कसे देत आले आहेत याचा विचार पुढलि लेखांत करूं.

——

## लेखांक २

**निष्ठावंत भाव भक्तांचा स्वधर्म । निर्धार हें वर्म चुकों नये ॥१॥**
**निष्काम निष्फळ विठ्ठलीं विश्वास । पाहों नये वास आणिकांची ॥२॥**
**तुका म्हणे ऐसा कोण उपेक्षिला । नाहीं आयकिला ऐसा कोणी ॥ ३॥**

७ देहबुद्धि सोडून आत्मबुद्धि धारण करा असें सर्व संतांनीं जनतेस सांगितलें आहे.देह कोणाचाहि कोठेंहि असो,कोठेंही पडो, सृष्टिप्रवाहानुरूप त्याचें बरेंवाईट कांहींही होवो, त्याच्याविषयींच्या विचारांत कालक्षेप करण्यांत आयुष्य न दवडितां ' तुका म्हणे घडी घडीनें साधावी । त्रिगुणाची गोंवी उगवूनी ' अशा तांतडीनें मनुष्यदेह आहे तोंवर हरिप्राप्तीची धडपड करा व जीवपणाच्या बंधनांतून मुक्त व्हा, व निर्विकल्प आत्मसुख भोगा असें संतांचें कळकळीचें सांगणें आहे.

८ देहच मुळीं विटाळाचा गोळा असल्यामुळें हा देह ब्राह्मणाचा, हा शूद्राचा, हा अंत्यजाचा असला भेदाभेद करून त्यांत उच्चनीच अशा पायऱ्या लावण्याचा व त्याच्याच प्रीत्यर्थ तंटेभांडणें करण्याच्या धडपडींत पडण्याचा उपद्व्याप न करितां आलेल्या देहांत, प्राप्त झालेल्या परिस्थितींत व मिळालेल्या सामुग्रींत हरिप्राप्तीचें मुख्य ध्येय

लवकर कसें मिळवितां येईल याचाच सुजनांनीं विचार करावा. मी ब्राह्मण का व मी अंत्यज कां, मी थोर कां व मी नीच कां असले क्षुद्र प्रश्न घेऊन त्यांची काथ्याकूट करीत बसल्यापासून उभयपक्षीं अहंपणा मात्र वाढेल व परस्पर वैरभाव उत्पन्न होऊन देहबुद्धीचें पोषण होईल आणि जीव आपल्या खऱ्या स्वहितास मुकेल; म्हणून देहबुद्धि वाढण्यास वावच न मिळेल असा हरिभक्तीचा व हरिभक्तीच्या अंगानें थोर होण्याचा राजमार्ग साधुसंतांनीं घालून दिला आहे.

९ हरीच्या प्राप्तीला जाति, वर्ण, आश्रम हे आड येत नसून यांच्या संगामुळें उत्पन्न होणारे रागद्वेषादि अभिमानजन्य विकार आड येतात. भागवतांत ( स्कंध ११ अ० २ ) मध्यें स्पष्ट म्हटलें आहे.—

**न यस्य जन्मकर्मभ्यां न वर्णाश्रमजातिभिः ।**
**सज्जतेऽस्मिन्नहंभावो देहे वै स हरेः प्रियः ॥५१॥**

जन्मकर्मांचा व वर्णाश्रमजातींचा अभिमान ज्याच्या देहांत उत्पन्न होत नाहीं तो निरभिमानी पुरुष हरीला प्रिय असतो. माझा जन्म अमक्या जातींतला, अमक्या कुळांतला, मी अमक्या वर्णाचा, म्हणूनच मी थोर अगर नीच—असला बाष्कळ अभिमान ज्याला शिवत नाहीं तोच हरीला प्रिय आहे; मी ब्राह्मण म्हणून ब्राह्मणपणाचा अभिमान वाहणारा, मी क्षत्रिय म्हणून क्षत्रियपणाचा अभिमान वाहणारा, मी शूद्र किंवा अतिशूद्र म्हणून आपापल्या जातीचे अभिमान वाहणारे असें सर्वच अभिमानी पुरुष पतित आहेत. जाति, वर्ण किंवा आश्रम तारीत नाहींत व मारीतही नाहींत, यांचा अभिमान मारतो व निरभिमान तारतो ! केवळ ब्राह्मणपणाचा मिथ्या अभिमान वाहणारे ब्राह्मण जसे अधोगतीला जातात तसे कोणत्याही जातीचा अभिमान वाहणारे किंवा आपापल्या विशिष्ट जात्याभिमानामुळें अन्य जातींचा द्वेष व मत्सर करणारे पुरुषही अधोगतीलाच जवळ करितात ! केव्हांहि जात्यभिमानाचा उठाव करणारे पुरुष हे आपले मित्र व हितकर्ते आहेत असें कोणीही समजूं नये. मुळीं अभिमानच जर नरकाला नेणारा आहे तर अभिमानाचा उठाव करणारे पुरुष आपले मित्र आहेत असें कसें म्हणतां

येण्याचें भय आहे, इतकेंच काय पण आत्मत्वाच्या अंगानें आपण एक आहोंत हें परमार्थांतलें उदात्त व शुद्धतत्व मात्र ह्या राजस चळवळींमुळें सर्वांस दुरावलें जात असून आपण खऱ्या हितापासून च्युत होत आहोंत. एकीच्या ठिकाणीं एकी करा, अभेदाच्या ठिकाणीं अभेद पहा, भेदाच्या ठिकाणीं भेदपणा जो आहे तो कोणालाही नाहींसा करतां येणार नाहीं. एकी करण्याचा तो मार्ग नव्हे. त्यानें स्त्रीपुरुषांत किंवा बापलेकांत सुद्धां एकी होणार नाहीं! व्यवहार भेदमय आहे व नित्य भेदमयच राहणार. भेदांत अभेद पाहणें हेंच मनुष्यजन्माचें मुख्य ध्येय आहे. भेदवस्तु कालवल्यानें अभेद होत नाहीं, तर भिन्न वस्तूंच्या पोटांत जें एकपण आहे त्या एकपणाच्या भावनेंत ऐक्य आहे. हातपाय, नाकडोळे, पाठपोट हें सर्व एका देहाचे अवयव आहेत म्हणून हें सर्व मोडून यांची एक गठडी करावयाची नाहीं तर हें सर्व एका आत्म्याच्या अधिष्ठानावर आपापलीं भिन्न भिन्न कार्यें कशीं करतात हें पाहून एकरसानुभव अंतःकरणांत घ्यावयाचा आहे. भात, भाजी, वरण, तूप, पोळी, मीठलिंबू, साखर हे पदार्थ पानांत पडले म्हणजे त्यांचा एक काला करावयाचा नाहीं (काला करणारा एक तर वेडा किंवा परमहंस होय!) तर सर्व पदार्थांत अन्नरसाची तृप्ति एक आहे हें ओळखायचें आहे, अनुभवायचें आहे, एकत्वाचा आनंद सर्वांनीं चाखावयाचा आहे. असाच निरनिराळ्या जातींचा विचार आहे. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र किंवा ब्राह्मण, प्रभू, सुतार, सोनार, शिंपी, लोहार, परीट, न्हावी, महार, मांग, चांभार, भंगी ह्या निरनिराळ्या जाति राष्ट्ररूपी विराट् पुरुषाचें निरनिराळे अवयव आहेत. त्या सर्वांचाच उपयोग आहे. त्या सर्वांची मिळून एकी करणें म्हणजे त्यांची कालवाकालव करून संकर करणें नव्हे! संकर हिंदुधर्माच्या विरुद्ध आहे. संकर करण्याला कोणत्याही ऋषीनें, धर्मशास्त्रकारानें किंवा साधूनें सांगितलें नाहीं. ‘संकरो नरकायैव’ हा भक्तोत्तम पार्थाचा सिद्धांत आहे. सध्यां ज्या लोकांना संकर पाहिजे आहे ते हिंदुधर्माच्या व साधुसंतांच्या उपदेशाच्या विरुद्ध वागत आहेत. हिंदुधर्म जातिभेद व वर्णभेद मानतो

हें खरें, पण हेंही तितकेंच खरें आहे कीं परस्परांशीं अत्यंत सलोख्यानें, प्रेमानें व समतेच्याच काय पण एकात्मतेच्या भावनेनें कसें वागावें हेंही शिकवणारा त्याच्या इतका उदात्त धर्मही जगांत दुसरा आढळणार नाहीं ! तुमच्या नवीन राष्ट्रीयपणाच्या उदार कल्पनांत ऐक्य करण्याची जी शक्ति नाहीं, ती शक्ति भेदभाव सशास्त्र आहे असें प्रतिपादणाऱ्या व जातिभेदाचें अस्तित्व सिद्ध करणाऱ्या हिंदुधर्माच्या ठिकाणीं सिद्ध आहे ! पुण्यांत राहणारे,सारखे देशभक्त,सारखे विद्वान्, ब्राह्मण व पुनः कोंकणस्थ असे जे टिळक आणि गोखले हे दोघेही पट्टीचे देशभक्त असून त्यांच्या मनामनाची मिळणी जन्मांत झाली नाहीं पण तीच मनाची मिळणी ईश्वरभक्ति संतसज्जनांत तात्काळ उत्पन्न करूं शकते. संतांचें अवतारीपण क्षणभर बाजूला ठेवून आम्हीं स्पष्ट म्हणतों कीं, पांडुरंगांच्या भजनानंदांत व आत्मभावाच्या एकरसानंदांत निमग्न झाल्यामुळें ज्ञानेश्वर, नामदेव, गोरा कुंभार, सावंतामाळी, नरहरि सोनार, रोहिदास चांभार, जनाबाई, मुक्ताबाई, चोखामेळा, चांगदेव इत्यादि निरनिराळ्या जातींच्या संतांच्या अंतःकरणांत जी ऐक्यबुद्धी, जें प्रेम, जो विश्वास, जी कळवळ, जी कार्यक्षमता वसत होती त्याचा सहस्रांश सुद्धां तुमच्या शंभर कांग्रेसना शंभर वर्षांत उत्पन्न करितां येणें शक्य नाहीं ! भेदाच्या ठिकाणीं भेद ठेवून अभेदपणाचा आनंद व ऐक्य भोगणें काय अशक्य आहे ? शिवाजी व रामदास हे कधी एका ताटांत जेवत होते काय ? तथापि त्यांच्या चित्तांची जी ग्रंथि पडत असे तिचा कितवा अंश एका ताटांत जेवणाऱ्या कॉस्मापॉलिटनांच्या अंतःकरणांत वास करित असतो ? सहभोजनें व संकर हीं ऐक्यवृद्धीचीं साधनें नसून अभेददृष्टि व प्रेमाचें वर्तन हींच मुख्य व अवश्य आहेत. 'शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः ' ह्या चरणांत ' समभोजिनः ' असें पद नाहीं ! स्थूळदृष्टीला भोजनांतच ऐक्य वाटतें ! एका ताटांत भोजन करण्यानें ऐक्य होतें तर नवराबायकोंत कां भांडणें होतीं ? एका ताटांत न जेवणें व भिन्नजाति राहणें हें चित्तैक्याच्या आड येतें तर नारायणराव पेशव्यांच्या अंगावर पडून स्वामिनिष्ठ चाफाजी टिळेकर कां प्राणावर उदार होता !

सारख्याच किंमतीचे आहेत. व्यवहारापुरत्या जाति, बाकी श्रेष्ठत्व भक्तीनेंच येणारें आहे. ' म्हणोनि भक्ति एथ सरे । जाति अप्रमाण. ' नैसर्गिक किंवा संपादित कोणतेही गुण असोत त्यांचें बीज नारायणाच्या प्राप्तीतच आहे, " तैसें उत्तमत्व तैंचि तरे । तैंचि सर्वज्ञता सरे । जैं मनोबुद्धि भरे । माझेनि प्रेमें " असें सांगून ज्ञानोबाराय म्हणतात:—

**तैसे क्षत्री वैश्य स्त्रिया । कां शूद्र अंत्यजादि इया ।**
**जाति तत्वचि वेगळालिया । जवें न पवती मातें ॥ ४६० ॥**
**यालागीं पापयोनीही अर्जुना । कां वैश्य शूद्र अंगना ।**
**मातें भजतां सदना । माझिया येती ॥ ४७४ ॥**

१२. असो. सर्व संतांनीं जागोजाग याच गोष्टी परोपरीनें सांगितल्या आहेत. " तरीच जन्मा यावें । दास विठ्ठलाचें व्हावें ॥ १ ॥ नाहीं तरी काय थोडीं । श्वानसूकरें बापुडीं ॥ २ ॥ " हें त्यांच्या उपदेशाचें सार आहे. सर्व शास्त्रांचें शास्त्र The science of sciences म्हणजे अध्यात्मशास्त्र हेंच आहे. मी कोण, देव कोण व विश्व—काय कसें कशाचें कोणाकडून केव्हां झालें—ह्या तीन प्रश्नांत सर्व ज्ञान आहे. आमचे अध्यात्मग्रंथ व संतांचे अनुभव असे आहेत कीं, जीव, देव व जग हे तीन भिन्न नसून एकच आहेत व ह्या तिहींतला अभेदपणाचा जो एकत्वरूप दोरा तो तदाकार होऊन पाहणें म्हणजेच हरिरूप होऊन राहणें हेंच जिण्याचें सार्थक आहे. विश्व हें ब्रह्मावरचें आवरण म्हणा, विवर्त म्हणा, आहे म्हणा किंवा नाहीं म्हणा, पण ब्रह्म ही एकच वस्तु आहे. माया खरी असो वा खोटी असो, विश्व सत्य असो वा मिथ्या असो, एकमेवाद्वितीयं ब्रह्म सत्य आहे हा एकच सिद्धांत अबाधित आहे. विश्व मिथ्या मानलें तर त्याचा प्रश्नच उरत नाहीं, सत्य मानलें तरी ब्रह्माहून तें वेगळें नाहीं. सर्व हरिमय आहे असाच सर्व संतांचा अनुभव आहे. ब्रह्म, परब्रह्म, परमात्मा, आत्मा, चिदात्मा, हरि, नारायण, शिव, दत्त, विठ्ठल, राम, कृष्ण, देवी—काय हवें तें नांव द्या; हव्या त्या रूपानें त्याला भजा; तो एक आहे व त्यावांचून दुसरें कांहीं नाहीं असें भागवतसांप्रदाय व त्याचे प्रवर्तक संत जगाला सांगत आले आहेत.

असें आहे तथापि वेदशास्त्रसंमत असलेले वर्णाश्रम गुंडाळून ठेवून सब-गोलंकार करावा असें कोणीही संत बिलकूल सांगत नाहींत. वर्ण, आश्रम व जातिव्यवस्था हिंदुसमाजरचनेच्या मुळाशीं असल्यामुळें 'आला भागासी तो करी वेवसाय । परी राहो भाव तुझ्यापायीं ' ह्या तुकोबा-रायांच्या उक्तीप्रमाणें हिंदुमात्रानें वागणें जरूर आहे. जातिवर्ण-व्यवस्था मोडावयाची नाहीं हें हिंदुधर्माचें तत्वच आहे.

---

## लेखांक ३.

**यालागीं कर्म आपुलें । जें जातिस्वभावें असें आलें।**
**तें करी तेणें । जिंतिलें कर्मबंधातें ॥ ज्ञानेश्वरी अ० १८-९३२ ॥**

१३ भागवतसांप्रदायी संतमंडळानें एका आत्मचैतन्याच्या ठिकाणीं सर्वांचीं दृष्टि स्थिर होऊन त्यांचा उद्धार व्हावा म्हणून कोणत्या तत्वाचा बोध केला हें मागील दोन लेखांकांत सांगितलें. देहबुद्धी मावळून आत्मबुद्धीचा उदय करण्यास त्यांनीं जीवांस शिकविलें व आत्मत्वाच्या ठिकाणीं आपण सर्व एकाच अधिकाराचे किंबहुना एकच आहोंत हें त्यांनीं लोकांच्या मनावर ठसवल्यामुळें सहजच सर्वत्र एकभावाचा उदय झाला. हा आत्मत्वाच्या अंगानें उत्पन्न होणारा एकभाव, निरनिराळ्या जाती एकवटून एकराष्ट्रीयत्वाच्या ज्या ध्येयाकडे सांप्रतचे चळवळे लोकांस नेत आहेत त्याहून, किती तरी वरच्या दर्जाचा व निष्कलंक होय! सध्या ब्राम्हणसभा, हिंदुसभा, सारस्वत परिषद्, कायस्थसभा, वीर-शैवपरिषद, मराठापरिषद, लिंगायतपरिषद, महिलापरिषद, जैनपरिषद, मॉस्लेमलीग, नामदेवपरिषद, इत्यादि नाना जातींच्या परिषदा, सभा व संमेलनें यांना ऊत आला आहे व त्यामुळें एकराष्ट्रीयत्वाच्या नवीन कल्प-नेची वाढ होत असून राष्ट्र मोटारच्या वेगानें उन्नतिशिखराकडे चाललें आहे! आम्हांस खास वाटतें कीं, यामुळें अतिरिक्त खोट्या जात्यभिमानाचा मात्र प्रसार होत असून त्यायोगें एकत्वाच्या खऱ्या भावनेला विरोध

तात्पर्य, आमच्या हिंदुधर्मानें वर्णभेद व जातिभेद ह्या समाजसंस्था सर्व समाजरूपी विराट् पुरुषाच्या संरक्षणासाठींच निर्माण केलेल्या आहेत. जातिभेद कधींही मोडायचा नाहीं ! व मोडून जायलाही नको आहे. जातिद्वेष दूर करा. परंपरेनें नानाविध धंद्यांची उर्जितावस्था व विशिष्ट संस्कारांचें पोषण जातीनेंच होतें. जातींनीं आमच्या राष्ट्राचें पुष्कळ कल्याण केलें आहे. लावालावी करणारे पुरुष जेव्हां जात्यभिमानाचा उठाव करितात तेव्हां विविध जाति परस्परांचा नाश करून सर्वच लय पावतात. हिंदुस्थानांत जाति जन्मासिद्ध आहेत, इतर देशांत त्या द्रव्यादिकांच्या कमीजास्ती प्रमाणांवर असतात. सारी सृष्टि भेदमय आहे, भेदाचा नाश करणें शक्यच नाहीं. एकीकडून भेद मोडाल तर तो दुसरीकडून डोकें वर काढील. भेदबुद्धिमुळें उत्पन्न होणाऱ्या उच्चनीच-पणाच्या भावना, मीपणाचा गर्व, अभिमान, असूया, द्वेष, मत्सर, तिरस्कारादि क्षुद्रविकार हे मोडा. हे दुष्ट मोडतील असें शिक्षण द्या. प्रेम-भावाचा प्रसार होईल अशा संस्था काढा. हें काम संतमंडळानें किती उत्तम केलें आहे तें आजही पंढरपुरासारख्या ठिकाणीं उत्तम दिसतें. एकमेकांच्या अंगांवर खुर्च्या फेंकून शिवीगाळ करण्यासारखे प्रसंग आजच्या पहिल्या रांगेंतल्या श्रेष्ठ पुरुषांमध्येंही येतात ! त्यानें राष्ट्रहित नाहीं, समाजहित नाहीं, जातिहित नाहीं व आत्महितही साधत नाहीं. असले वेडे खेळ न खेळतां निरभिमानी होऊन संतांच्या मार्गानें जा, संतांना विचार पुसा, संतांना गुरु करा, संत तुम्हांस ऐहिक व पारमार्थिक वैभव बिनबोभाट व मुक्त मिळवण्याचा मार्ग दाखवितील. त्यांचा खेळ खेळायला लागा. तो खेळ शिकण्यासाठीं पांडुरंगाचे पाय जवळ करा. विठोबाच्या अध्यक्षतेखालीं भरणाऱ्या पंढरपूरच्या कांग्रेसमध्यें जमा. तेथें अध्यक्षाच्या जागेसाठीं भांडणें होत नाहींत, तेथच्या सीटसाठीं १० रुपये व ५ रुपयांचीं तिकिटें विकत घ्यावीं लागत नाहींत, तेथल्या मंडपासाठीं दरसाल हजारों रुपयांचा चूर उडत नाहीं, तेथें खानपानांचा सांवळागोंधळ व भांडणेंतंटें होत नाहींत, साध्या तिकिटाचे लोक खालच्या खुर्च्यांवर व बडे लोक ' रिझर्व ' खुर्च्यांवर

असा जातिभेद तेथें दिसत नाहीं, ठरावांच्या शब्दांबद्दल तेथें हाणामाऱ्या चालत नाहींत. राजापासून रंकापर्यंत व ब्राह्मणापासून अंत्यजापर्यंत सर्वांना तेथील खेळांत सारख्या आनंदानें सामील होतां येतें. क्रोधमत्सरादि खऱ्या 'अंत्यजांना' तेथें येऊं दिलें जात नाहीं, तेथें नटणें थाटणें यांत वेळ न घालवितां सर्वच सारख्या आनंदकल्लोळांत समरस होऊन जातात. त्या खेळांत सामील व्हा म्हणजे खरा पतितोद्धार होईल, निकृष्ट जातींचा (जीवांचा) उद्धार त्यानें होईल. त्या खेळाचें वर्णन श्रीतुकाराममहाराज असें करितातः—

## अभंग.

**खेळ मांडियेला वाळवंटीं घाई । नाचति वैष्णव भाई रे ॥**
**क्रोध अभिमान केला पावटणी । एक एका लागतिल पायीं रे ॥ धृ० ॥**
**नाचति आनंदकल्लोळीं । पवित्र गाणें नामावळी रे ॥**
**कळिकाळावरी घातलीसे कास । एक एकाहुनि बळी रे ॥ १ ॥**
**गोपीचंदन तुळसीच्या माळा । हार मिरविती गळां रे ॥**
**टाळमृदंगघाई पुष्पवरुषाव । अनुपम्य सुखसोहळा रे ॥ २ ॥**
**लुब्धली नादीं लागली समाधि । मूढजन नरनारी लोकां रे ॥**
**पंडित ज्ञानी योगी महानुभवी । एकचि सिद्धसाधका रे ॥ ३ ॥**
**वर्णाभिमान विसरली याती । एकएकां लोटांगणीं जाती रे ॥**
**निर्मळ चित्तें जालीं नवनीतें । पाषाणा पाझर सुटती रे ॥ ४ ॥**
**होतो जयजयकार गर्जत अंबर । मातले वैष्णव वीर रे ।**
**तुका म्हणे केली सोपी पायवाट । उतरावया भवसागर रे ॥ ५ ॥**

———

गंगेला ओहळ येऊन मिळाले तर गंगा ओहोळांना आत्मपद देते, आपण त्यांच्यामुळें हीन होत नाहीं. "ब्रह्मरूप त्यांच्या क्रिया ब्रह्मरूप" कशा होतात हें यावरून कळेल. पाणी गंगेत असतें, पाण्यांत गंगा नसते, आणि या कारणास्तवच ओहोळ गंगारूप होतात. महात्मे, सिद्धपुरुष विषय भोगतात पण ते भोगतांना स्वतः विषयरूप बनत नाहींत तर उलट विषयांनाच आत्मरूप करतात!

# २८ मूर्तिपूजेची महती.



१ हिंदुस्थानांत मूर्तिपूजा कित्येक शतकांपासून चालू असून सगुणप्रेमा भाविकमंडळीच्या मनांत उत्पन्न करण्यास तिचा फार उपयोग झाला आहे, होत आहे व होणार आहे. कांहीं परधर्मी लोक व त्यांच्या छंदानें नाचणारे आमच्यांतले कांहीं पंडित यांनीं मूर्तिपूजेवर पुष्कळ अविचारीपणाचे हल्ले केले, तरी हिंदुलोक मूर्तिपूजा कधींही सोडणार नाहींत. ‘ थोर लोक मरून जाती । त्यांच्या सुरता करूनि पाहती । ऐसीच आहे रीती । उपासनेची ’ ही समर्थ रामदासांची उक्ति मननीय आहे. ‘ विटेवरी उभा नीट कटींवरी कर । तुका म्हणे आम्हां हेंचि ध्यान निरंतर ’ अशी आवडी तुकोबारायांनाही होती. मोरया गोसावी गणेशमूर्तीचें असेंच ध्यान करून स्वस्वरूपाप्रत पावले. सगुण-निर्गुण ह्यांच्यांत अभिन्नता आहे; देवभक्तांत, व्यक्ताव्यक्तांत अभेद आहे हें मर्म सत्सहवासावांचून कळणार नाहीं. उपासनेचें रहस्य सद्गुरुकृपेनें ज्यांना कळलें आहे ते मूर्तिपूजेवर तुटून पडणार नाहींत. स्वामी विवेकानंदाना एकानें ‘ मूर्तिपूजेनें मोक्ष मिळेल काय ? ’ असा प्रश्न केला होता. यावर त्यांनीं उत्तर केलें:—

Idol-worship cannot directly give Mukti; it may be an indirect cause, a help on the way. Idol-worship should not be condemned; for, with many, it prepares the mind for the realisation of Adwait which alone makes man perfect. ”

२ स्वामींच्या म्हणण्याचा भावार्थ असा:—“मूर्तिपूजा ही स्वतंत्रपणें प्रत्यक्ष मोक्ष देणार नाहीं, पण तिचा अप्रत्यक्ष पुष्कळ उपयोग आहे. मोक्षमार्गाला नेण्यास पुष्कळांना तिचें साह्य चांगलें होतें. मूर्तिपूजेचा केव्हांही धिक्कार करूं नये, कारण अद्वैतबोधानेंच मनुष्यांत पूर्णत्व येतें हें खरें असलें तरी पुष्कळ लोकांना अद्वैतसिद्धि होण्यासारखें मन

मूर्तिपूजेनें निःसंशय तयार होतें!' श्रीमद्भागवताच्या ११ व्या स्कंधापैकीं २७ व्या अध्यायांत पूजाविधीचें जें सशास्त्र व सविस्तर वर्णन केलें आहे तें वाचकांनीं नाथांच्या टीकेवरून नीट समजून घ्यावें. (१) शैली म्ह० पाषाणमय, (२) दारुमयी म्ह० काष्ठमय. (३) लौही म्ह० धातुमय (४) लेप्या म्ह० चंदनादिकांच्या लेपानें काढलेली. (५) लेख्या म्ह० चित्रमयी (६) सैकती म्ह० वालुकामय. (७) मनोमयी व (८) मणिमयी. अशा आठ प्रकारच्या प्रतिमांच्या द्वारें नारायणाची पुजा होते. मूर्तिपूजा म्ह० सर्वस्व नसलें, तरी भक्तिभावोद्दीपनाच्या कामीं मूर्तिपूजेचें अत्यंत साह्य होतें ही गोष्ट अनुभवसिद्ध आहे. नाथांनीं विवेकानंदांच्या वरील अभिप्रायाप्रमाणेंच म्हटलें आहे कीं:—

**उपासनाकांडींचा निर्वाहो। मी सर्वांभूतीं देवाधिदेवो।**
**हा ज्यासी न कळे मुख्यभावो। त्यासी मूर्तिनिर्वाहो द्योतिला॥३७१।**
**हो कां माझी प्रतिमामूर्ति। तेही मी चिदात्मा निश्चिती।**
**तेथ करितां भावें भक्ती। भक्त उद्धरती उद्धवा॥ ३७२॥**

३ वेदांत मूर्तिपूजा नाहीं म्हणून ठांसून म्हणणारे लोक आहेत; पण वेदांत देव एक आहे, सर्वभूतांतरात्मा, सर्वव्यापी, सर्वभूताधिवास असा तो आहे असें वर्णन आहे. आणि असें जर आहे तर तुकाराममहाराजांच्या खडखडीत वाणीनें आम्ही मूर्तिपूजानिंदकांस विचारतों कीं, 'अवघें ब्रह्मरूप रिता नाहीं ठाव। प्रतिमा तो देव कैसा नव्हे ?।' अर्थात् प्रतिमा तो देव आहेच! मूर्तिपूजक तरी मूर्तिद्वारें जगन्नायक एकमेवाद्वितीय अशा ब्रह्माचीच उपासना करतात, ध्याननिष्ठेसाठीं व प्रेमसुख वाढविण्यासाठीं ते जरी एका विशिष्ट सगुणदेवाची पूजाअर्चा करितात, तरी तोच देव परमात्मा आहे असें ते भावतात. उपनिषदांत ज्याला आत्मा म्हटलें आहे त्यालाच मोरया गोसाव्यांनीं गणेश, समर्थांनीं राम, वारकऱ्यांनीं विठ्ठल, व दत्त भक्तांनीं दत्त म्हटलें आहे! या सर्व नावांनीं व इतरही अनंत नांवांनीं प्रतिपाद्य वस्तु एकच असतां मूर्तिपूजेच्या नांवानें खडे फोडणें गैर आहे. कोट्यवधि लोकांनीं मान्य

केलेल्या मूर्तिपूजेच्या उदात्त स्वरूपाकडे पहा. आपले देशबांधव क्वचित् अतिशयोक्तीच्या कल्पनांनीं फसत असतील तर प्रेमानें त्यांना यथार्थ ज्ञानोपदेश करून आपल्या रमणीय आचरणानें स्वोद्धाराचा मार्ग दाखवा. नुस्ता शब्दछल, शुष्क कोट्या, विपर्यस्त दृष्टि यांनीं आपल्या परमप्रिय पण तूर्त पोरक्या झालेल्या समाजसंस्थांकडे व धर्माकडे पाहूं नका. समाजांत व लोककल्पनांत मुळींच दोष नसतील असें नाहीं, पण कोणता समाज निर्दोष आहे ! विचित्र कल्पना व विचित्र रूढी कोणत्या समाजांत नाहींत ? पुरीचा जगन्नाथ किंवा पंढरीचा विठोबा आज शेंकडों वर्षें हजारों लोकांच्या चित्तवृत्ती आपल्याकडे आकर्षून घेत आहे. सगळे अडाणीच या सांप्रदायांत पडले आहेत असें समजून आत्मवंचक बनूं नका. समर्थांनीं रामसेवा वाढवून रामाचीं व मारुतीचीं कित्येक मंदिरें बांधलीं आहेत. ज्ञानदेव, एकनाथ, नामदेव, इत्यादि शेंकडों सिद्ध पुरुषांनीं पंढरीच्या विठ्ठलाचा सांप्रदाय वाढविला आहे. शिवाय रामदेवराव जाधवापासून तों महादजी शिंद्यापर्यंत हजारों कर्त्या पुरुषांनीं मंदिरांना वर्षासनें श्रद्धाभक्तीनें लावून दिलीं आहेत ही गोष्टही विसरून अंध होऊं नका. आपले सर्वच पूर्वज मूर्ख होते व ४ इंग्रजी बुकें वाचून आपण शहाणे झालों अशी घमेंड बाळगूं नका ! मूर्तिपूजा भगवद्भक्तीचें प्रेमसुख वाढविण्याचें उत्तम साधन आहे असें अनेक लोकांच्या अनुभवांसह ‘ मुमुक्षु ’ निश्चयानें सांगण्यास तयार आहे. विठ्ठलमूर्तीचें दर्शन होतांच हजारों भाविक व ज्ञात्या स्त्रीपुरुषांची जी तल्लीन वृत्ति होते तिचा अनुभव पंढरीस जाऊन पहा ! मूर्तिपूजकांच्या एकनिष्ठतेबद्दल मूर्तिपूजा न करणाऱ्यांचा सुद्धां कबुली जबाब आहे. अत्यंत पूज्यता दाखवावयाची असतांना With an idolatrous veneration असें म्हणण्याची चाल आहे ! भवानी मातेच्या मूर्तिपुढें बसणाऱ्या व भक्तिनम्र होऊन कार्यस्फूर्ति मागणाऱ्या शिवरायांना विसरूं नका. ‘ तुज पाहतां विठ्ठला । देहभाव हारपला ’ ही तुकोबारायांची तल्लीनता स्मरा व इष्ट उपास्यमूर्तीची मनोभावें यथाशास्त्र पूजाअर्चा करा म्हणजे तीच उपास्यमूर्ति तुम्हांला ब्रह्मभावोपदेश निश्चयानें करील.

४. तुकोबारायांनीं ‘ करोनि राहो जरी आत्माचि प्रमाण । निश्चय नोहे मन काय करूं ? ’ असें एके ठिकाणीं ह्मटलें आहे. आत्मा नित्य आहे, अव्यय आहे, चिद्रूप आहे, सर्वव्यापी आहे, विभु आहे ही गोष्ट सत्य आहे; पण चंचल मनाची काहणी सांगायला, आपलीं सुखदुःखें निवेदन करायला, आपल्या पाठीशीं आपला संरक्षक आहे व तो ‘ कृपाळुपणानें अल्प धारिष्ट पाहत ’ आहे असा भरंवसा वाटायला—पाहिजे आहे. असा सगुण परमात्मा आपलें निर्गुणत्व न गमावतां आपला सांभाळ करीत आहे अशी भावना शुद्ध जीवाच्या हृदयांत सहज आहे. विवेकानंदाला एकदा एकानें विचारलें कीं ‘तुह्मी मूर्तिपूजक आहांत काय ? ’ त्यांनीं आश्चर्यदर्शक मुद्रेनें उत्तर केलें; “ हें काय विचारतां ! माझे गुरु रामकृष्णपरमहंस यांना ब्रह्मप्राप्ती कालीमातेच्या कृपाप्रसादानेंच झाली व ते कालिमातेच्या मूर्तीपुढें तासचे तास बसून तिच्या मूर्तीचें ध्यान करीत, तिच्या नामस्मरणाचा घोष चालवीत, तिच्यापुढें रडिवाळपणानें लोटांगणें घालीत व तिला नित्य भक्तिभावानें आळवीत; असें होतां होतांच त्यांना परब्रह्मसाक्षात्कार झाला व ते जीवन्मुक्त झाले असें जर आहे तर मूर्तिपूजेला नांवें ठेवण्यास कोठें जागा आहे बरें ? ” मूर्तिपूजा होतां होतांच रामकृष्णपरमहंसाप्रमाणेंच हजारों संतांना आजपर्यंत आत्मसाक्षात्कार झाला आहे. ही गोष्ट इतकी उघड असून हिंदु लेखकांचीही लेखणी मूर्तिपूजेची हेळणा करितांना कशी चालते याचें आम्हांस आश्चर्य वाटतें ! परमात्मा सर्वव्यापी आहे असें म्हणायचें व तो मूर्तींत तेवढा नाहीं असा अट्टहास करायचा हें तर्कशास्त्र तरी कोठलें ? परमात्मा सर्वत्र आहे व भावाचा भुकेला आहे असें म्हणायचें आणि मूर्तीच्या द्वारें त्याची केलेली पूजा व स्तुति त्याला पोंचत नाहीं असें प्रतिपादायचें ही विचारसरणी कोठली ? परमात्मा सर्वशक्तिमान् आहे असें म्हणावयाचें आणि सगुणरूप तेवढें धारण करण्याची त्याला शक्ति नाहीं असें प्रतिपादन करायचें ही बुद्धि कसली ? परमात्मा विभु व सर्वव्यापी आहे असें जर श्रुति सांगते तर तो मूर्तींत कसा नाहीं ? तो

मूर्तींत नाहीं असें म्हटल्यानें त्याच्या विभुत्वाला व सर्वव्यापित्वाला बाध येईल, म्हणजे मूर्ति तेवढी आपल्यांत त्याला येऊं देणार नाहीं तर मग मूर्ति परमात्म्याहून अधिक बळवान् आहे असाच तर्क काढावा लागेल ! ! सर्वव्यापी परमात्मा आणि भक्तांनीं प्रेमानें स्थापन केलेली मंगलमूर्तींची, विठ्ठलाची किंवा कोणत्याही उपास्याची मूर्ति यांत कांहींएक भेद नाहीं. जो अव्यक्त तोच व्यक्त, जो निराकार व निर्गुण तोच साकार व सगुण, जो अमूर्त तोच मूर्त यांत बिलकूल शंका नाहीं.

५ उमरावती येथें सनातनधर्मसभा व आर्यसमाज यांच्यांत 'मूर्तिपूजा वेदमान्य आहे कीं नाहीं' या विषयावर इ० स० १९०९ च्या फेब्रुवारी महिन्यांत ना. रा. ब. मुधोळकर यांच्या अध्यक्षतेखालीं वादविवाद झाला. अध्यक्षांनीं उभय पक्षांचें म्हणणें ऐकून घेऊन आपला निर्णय मागाहून लेखी प्रसिद्ध केला. आर्यसमाजातर्फें रुद्र दत्तशर्मा यांनीं भाषण केलें व सनातनधर्मसभेतर्फें रामनारायणजी यांनीं भाषण केलें. अध्यक्षांनीं इंग्रजींत वादाचा निर्णय प्रसिद्ध केला. त्याचें तात्पर्य असें:—" दोन्ही पक्षांच्या पंडितांनीं इंग्रजींत व हिंदींत भाषणें केलीं. पूर्वपक्ष उत्तरपक्ष होऊन दोन दिवस वाद चालला. पुराणांतील प्रमाणें न घेतां केवळ वेद आणि वेदांगें ( संहिता, ब्राह्मण व उपनिषदें ) यांतीलच आधार उभयपक्षीं घेण्याचें आधींच ठरलें होतें, त्याप्रमाणें झालें. आर्यसमाजाला आपल्या मताचें समर्थन करितां आलें नाहीं. यजुर्वेद अ० ३१ मधील व्याख्येवर त्यांची फार भिस्त होती. पण ती सप्रमाण सिद्ध झाली नाहीं. 'प्रतिमा' या शब्दाच्या उदात्त अर्थाची त्यांनीं फार हेलना केली. मूर्तिपूजेचा निषेध करणारा कोणताही आधार त्यांना दाखवितां आला नाहीं ! सनातन धर्मीयांतर्फें रामनारायणजी यांचें भाषण सरळ व मुद्देसूत होतें. त्यांनीं आपल्या समर्थनार्थ शुक्ल यजुर्वेदाच्या कात्यायन सूत्रांतील दुसरी व तिसरी ऋचा देऊन शिवाय शतपथ ब्राह्मणांतीलही आधार दिला व म्हणाले कीं, **मूर्तिपूजा वेदकालीं होती व तिचा स्पष्ट निर्देश संहितेंत केलेला आढळतो.** आर्यसमाजाला आपले मुद्देच सिद्ध करितां आले नाहींत एवढेंच मी जाहीर करितों."

## भक्तिप्रभाव.



चाल—भक्ति ग वेणी । माझी गुंफा०.

भक्ति भक्ताला । नेतसे मुक्तिपंथाला ॥ ध्रु० ॥
साधन भक्तीचें हें साधें,
क्षुधा तृषा त्या तिळहि न बाधे,
डुलत राहे आत्मानंदें,
साधु तुकयाला । संसारपाश नच जडला ॥ १ ॥
भक्तशिरोमणि जे जे झाले,
अघटित लीला दावुनि गेले,
नश्वर सौख्या तिळहि न भुलले,
कसा हरि झाला । श्रीखंड्या पाणीवाला ॥ २ ॥
चालविली ती भिंतहि कोणी,
रेड्यावदनीं वेदहि वाणी,
मृतपितरां कुणि भूवरि आणी,
रीण मुष्टीला । व्याजांत हेमनगरीला ॥ ३ ॥
निष्काम करूं या तरि ती भक्ती,
हेतु जिच्यांतिल तो जगजेठी,
जाणुनि देइल हो सुखशांती
आत्मभक्ताला । बाळगूं नको शंकेला ॥ ४ ॥ —गंगापुत्र.